*आंतरभारतीय पुस्तकमाला*

# समकालीन हिंदी कथा

संपादक

**धनंजय वर्मा**

अनुवाद

**निशिकांत ठकार**



**नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया**

# अनुक्रमणिका

# समकालीन कथेची ओळख

समकालीन कथेतून स्पष्ट होणारे माणसाचे चित्र तपासून पाहायचे आणि ते चित्र समकालीन माणसाचे आहे का नाही हे ठरवायचे हा या कथेच्या सच्चेपणाची पारख करण्याचा सरळ मार्ग होऊ शकतो. समकालीन कथेच्या माध्यमातून बरोबर अशा माणसाची ओळख किंवा त्या ओळखीमधून समकालीन कथेच्या सच्चेपणाची पडताळणी या दोन्ही गोष्टी वरवर पाहता फार सोप्या वाटतात पण त्यात धोकेही तेवढेच आहेत. कारण त्यासाठी या मार्गावरच्या अनेक गुंतागुंतीच्या गोष्टी आणि मुद्दे आपल्याला स्पष्ट करून घ्यावे लागतील.

समकालीन कथेतून ज्या माणसाचे चित्र स्पष्ट होते आहे तो कोण आणि कसा आहे हे आधी ठरवावे लागेल. तो आजच्या खऱ्या माणसाच्या रूपाशी कितपत मिळताजुळता आहे, का वेगळा आहे ? सर्वप्रथम आपण असे म्हणू शकतो की कथेतून जो माणूस दिसतो तो लेखकच असतो. आपल्या कृतीतून जे लेखक स्वत:लाच स्पष्ट करतात, रचतात किंवा विणतात त्यांना आत्म-आविष्कारवादी म्हटले जाते. ते स्वत:ला व्यक्तिस्वातंत्र्याचे अग्रणी म्हणवतात. पण आपल्या कृतीतून समकालीन आणि सामान्य माणसाला डोकावू देण्याचे स्वातंत्र्य द्यायला तयार नसतात. कृती ही आपल्या स्वत:ची मूर्ती घडवण्याचे आणि पुन: पुन: घडवण्याचे माध्यम मानतात. गंमत म्हणजे मानवाच्या मूल्यांची आणि नियतीची चिंता करण्याची मुद्राही त्यांनी सांभाळलेली असते. काही का असेना कथा इतकी आत्मसीमित आणि व्यक्तिवादी बनवली जावी या गोष्टीचे समर्थन आपल्यापैकी अधिकांश लोक करणार नाहीत. ही दिशा आणि हा दृष्टिकोण कथेने खूप पूर्वीच सोडून दिलेला आहे. आता तर ती आपल्या माध्यमातून काळाला, समाजाला, परिस्थितीला आणि संपूर्ण पर्यावरणाला साकार करण्याचे, त्यांच्या समोरासमोर येण्याचे, त्यांच्यात सामील होऊन त्यांची आव्हाने स्वीकारण्याचे आणि त्यांच्याशी टक्कर देण्याचे हत्यार झालेली आहे; या दिशेने ती सतत विकसित झालेली आहे आणि होत आहे. आपला काळ, आपले वर्तमान, आपला भोवताल आणि संघर्ष करणारे जग यामधून आकारास येणाऱ्या प्रतिबिंबाद्वारेच आता कथेच्या सच्चेपणाची पारख होऊ शकते.

लेखकाने पाहिलेले-भोगलेले वास्तव कितीही खरे असले, त्याचा अनुभव किती प्रामाणिक आहे त्याची तपासणी वा परीक्षा आपण समकालीन आणि सामान्य माणूस

भोगत असलेल्या वास्तवाच्या आणि अनुभवांच्या साक्षीनेच करणार.या निमित्ताने आपल्याला कोणताही आदेश द्यायचा नसतो, तो तर काळच तुम्हाला देत असतो आणि देत राहील. आपण फक्त तो अधोरेखितच करू शकतो. शिवाय तेवढे प्रतिबिंबच पुरेसे नसते. त्या संबंधात तुमची भूमिका काय आहे, दिशा कोणती आहे, दृष्टिकोण कोणता आहे आणि त्यामधून तुम्ही कुणाशी जोडले गेला आहात हे पाहणे पण आवश्यक आहे...

ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे आणि समकालीन कथाकार या बाबतीत चांगलाच जागरूक आहे. एखाद्या सामान्य नागरिकापेक्षा आपली योग्यता किंवा दर्जा वेगळा आहे असे तो मानत नाही. प्रत्येक दिवशी आणि प्रत्येक क्षणी येणारे अंतर्बाह्य अनुभव त्याला वारंवार आणि निरंतर एका भयावह युद्धात आणून सोडतात. आपली कथा ही केवळ आपलीच न राहता आपण ज्यांच्यामध्ये राहतो व रचना करतो त्या आपल्या भोवतालच्या सर्व लोकांची व्हावी—यासाठी त्याचा प्रयत्न असतो. समकालीन कथेत कथाकार हा परिस्थितीकडे डोळे उघडे ठेवून पाहणारा निव्वळ साक्षीदार नसतो तर तो त्या परिस्थितीचा भागीदार असतो आणि तिच्यातून निर्माण होणाऱ्या विसंगतींचा आणि शोकात्मिकांचा सहभोक्ताही असतो. समकालीन कथेत जो बदल घडून आलेला आहे त्याचे हे मूलभूत कारण आहे. या गोष्टीकडे म्हणूनच आपण नीट लक्ष दिले पाहिजे. समकालीन माणसाप्रमाणेच आजच्या परिस्थितीत जगत आणि तिच्याशी झगडत, प्राप्त होणाऱ्या अनुभवांची रचना करणारी कथाच आजच्या संदर्भात सच्ची कथा होऊ शकते. मानवाच्या आविष्काराच्या सर्व रूपाकारांना नवी शक्ती आणि सार्थकता सामान्य माणसाच्या जगण्याच्या क्षेत्रात आल्यावरच मिळू शकते. आपण जे जगतो आहोत त्याचे बिंब-प्रतिबिंब जर त्यांच्यात पडत नसेल तर कोणत्याही व्यवस्थेच्या कटकारस्थानांचा बीमोड आपल्याला करता येणार नाही. परस्परसंबंधात येणारा जडपणा असो किंवा मूल्यांचे होत असलेले अवमूल्यन असो, ते काही हवेत होत नसते. त्याची स्पष्ट कारणे आणि मुळे व्यवस्थेतच असतात.

आजची खरी कथा ही गोष्ट ओळखून आहे असे वाटते. तिच्यात विरोधाचे राजकारण आणि राजकारणशून्य संधिसाधुपणाचा बुरखा ओढून काढलेला आढळून येईल. वस्तू आणि संबंध यांची बदललेली लय स्पष्ट करून तिच्यामध्ये समकालीन जीवन केंद्रस्थानी आणले गेले आहे हे दिसून येईल. तिच्यात खूप तीव्र आणि प्रखर असा विवाद आहे. सामान्य माणसाची चीड, उद्विग्नता आणि आक्रमकपणाही तिच्यात आहे. समकालीन कथा ही प्रतिवाद आणि प्रतिरोध करणारी कथा आहे... समकालीन माणसाच्या संकटाचे कारण बनणाऱ्या प्रत्येक वस्तूशी तिचा प्रतिवाद आणि प्रतिरोध आहे. असहमती दाखवणाऱ्या गोष्टी या आधी लिहिल्या गेल्या नाहीत असे मुळीच नाही; पण समकालीन असहमतीची मनोवृत्ती आता वेगळी आहे. आधी नकाराची एक

मुद्रा होती आणि तिच्या पाठीमागे होता भूतकाळाशी लगटून राहण्याचा संस्कार, त्यामुळे एक विचित्र प्रकारची द्विधावस्था निर्माण झालेली होती. तिने कृत्रिम द्वंद्व आणि विरोध जन्माला घातलेला होता. परिस्थितीच्या माध्यमातून व्यक्तीकडे जाणे किंवा व्यक्तीच्या माध्यमातून परिस्थितीकडे जाणे अथवा वर्तमान वास्तवात व्यक्तीची प्रतिष्ठापना करण्याची जुनी प्रतिज्ञा या गोष्टींकडे पाहिले म्हणजे त्यांत परिस्थिती आणि व्यक्ती या दोन वेगळ्या गोष्टी मानल्या गेल्या आहेत आणि सामाजिक वास्तव व वैयक्तिक वास्तव यांचे वेगळे कप्पे मानलेले आहेत असे नाही का वाटत ? याचाच परिणाम म्हणून लोकप्रिय कथा आणि साहित्यिक कथा अशी विभागणी केली गेली आणि वाङ्मयीन राजकारणात वक्तव्यांची एक बहारदार लढाई सुरू झाली. वास्तवाच्या आविष्काराला महत्त्व देणारी माणसे गुपचूप आविष्काराच्या वास्तवाला शरण गेली... पण हा काळही निघून गेला. आता जुन्याला चिकटून राहण्याचा मोह राहिलेला नाही, त्यामुळे कुणाचा मोहभंग होत नाही आणि आता वास्तवाकडेही कुणी सामाजिक व वैयक्तिक अशा विभागणीच्या दृष्टीने पाहत नाहीत. कथेत आता संश्लिष्टतेचा आणि अंगांगी असण्याचा दृष्टिकोण विकसित झालेला आहे आणि कथेच्या जाणीवा, ह्या समग्र सामाजिक जाणीवेचे अंग आणि अंश म्हणून आविष्कृत होत आहेत.

समकालीन कथेत कृत्रिम द्वंद्वे आणि विरोध यातून मुक्त होण्याचा आणखी एक स्तर प्रकट झालेला आहे. तो म्हणजे एका व्यापक ढोंगाशी संघर्ष करण्याचा. विद्रोह, आक्रमकपणा आणि चीड यांचे ढोंग. सगळे वातावरण संवादहीनता, एकटेपणा, परात्मभाव, भय यासारख्या शब्दांच्या आवाजांनी भरून गेलेले होते. काहीजण तर अजूनही त्यांचे नामस्मरण करीत आहेत. ह्या जपाबरोबरच एक प्रकारची चीड आणि आक्रमकपणा यांची मुद्राही या दरम्यानच्या काळात कथेत साकार होऊ लागली होती आणि तिचे केंद्र होते फक्त स्त्री-पुरुष संबंध. या संबंधात निर्माण झालेले ताण आणि थंडपणा यातून मोडतोड होत होत शेवटी एका भयंकर जगात येऊन ठेपल्याचा दावा ही कथा करू लागली. या लेखकांचा सगळा प्रयत्न हा आपली हरवलेली अस्मिता शोधण्याचा होता. आम्हीच काय ते खरे समकालीन आहोत असा त्यांचा दावा होता; पण खरी गोष्ट अशी होती की त्या कथा म्हणजे केवळ या लेखकांच्या अत्यंत खाजगी विश्वाच्या, त्यांच्या अंधारलोकाच्या किंवा एखाद्या विशिष्ट घडणीतून वा साच्यातून घडलेल्या माणसांच्या होत्या. ही माणसे 'माणसे' नव्हती तर 'व्यक्ती' होत्या. वस्तूंच्या, संबंधांच्या, आणि स्थितींच्या बाबतीत घडून येणारे बदल किंवा वर्तमान-काळाचा क्रूरपणा आणि भयानकपणा याविषयी लिहिण्याचा आव आणणाऱ्या या कथांतून लेखकांचे सपाट चेहरेच साकारले जात आहेत हे खूप लवकरच कळून आले. या चेहऱ्यांवर जीवनात कराव्या लागणाऱ्या स्वाभाविक संघर्षांच्या खुणा कुठेही दिसत नव्हत्या. त्यांच्यावर दिसत होता फक्त एक बौद्धिक मुखवटा. आपल्या परिस्थितीत

एकटेपणा, परात्मभाव, भय कधी कुठे नव्हते असे आम्हाला म्हणायचे नाही; पण ते तुम्ही कुठे केंद्रित करता आहात हा खरा प्रश्न आहे. कोणत्या परिप्रेक्ष्यातून तुम्ही ते पाहत आहात ? त्यांच्याविषयी तुमचा ॲप्रोच कोणता, दृष्टिकोण कोणता ?... मौजेची गोष्टी ही की या गोष्टी जेथे आकारास येत होत्या तिथे ह्या कथा आणि त्यांचे लेखक हजरच नव्हते. ते आपल्या व्यक्तिवादाच्या खोळीत लपून कुठल्यातरी रहस्यपूर्ण, नामहीन भयाचा जप करीत बसलेले होते किंवा या सर्व गोष्टींवर अध्यात्माचे आणि तत्त्वज्ञानाचे आवरण चढवू पाहत होते. आधुनिक परिस्थितीत होत असलेले समकालीन अमानुषीकरण, परात्मभाव, तुटलेपणा, एकटेपणा आणि भय यांचे कारण एक व्यवस्था आहे आणि भांडवलवादी देशात या सर्व गोष्टी परम सीमेला पोहोचलेल्या आहेत; कारण तिथे औद्योगिकीकरण आणि यांत्रिक प्रगती झालेली असली तरी त्यात सामान्य माणूस भागीदार झालेला नाही ही वस्तुस्थिती ते समजून घेऊ इच्छित नाहीत. ते स्वत:च आपल्या श्रमापासून अलग आणि अपरिचित होऊन गेलेले आहेत.

आपल्याकडचा सामान्य मनुष्य चौकात, बसमध्ये, ट्राममध्ये, कारखान्यात, ऑफिसात, झोपडपट्टीत, फुटपाथवर, रेशनच्या लांबलांब रांगांत, आर्थिक अभावाशी झगडत, कौटुंबिक अडचणी झेलत राहिला; पण हे लेखक त्याला 'गर्दी' समजले, त्याच्याशी असणाऱ्या संबद्धतेला राजकारण असे नाव देऊन त्यांनी आपले नाक मुरडले. त्याची नियती ही आपल्या नियतीपेक्षा वेगळी आहे असे मानून आपली अस्मिता शोधत राहिले—कलेच्या सुरक्षित प्रदेशात. त्यांनी विद्रोह केला—आपल्या म्हाताऱ्या आईबापांशी नाहीतर प्रेयसीशी. ते आक्रमक झाले—रिकाम्या बिछान्यावर, त्यांची चीड व्यक्त झाली—पत्नीवर. मध्यमवर्गातून आलेल्या या लेखकांच्या वर्गजाणिवांना अर्धांगवायू झाला आणि वर्गसंघर्षाच्या ऐवजी त्यांनी वर्गसामंजस्य आणि सहअस्तित्व यांची निवड केली. अनुभव आणि लेखन यांच्या पातळीवर म्हणूनच त्यांच्या मनोवृत्तीत एक दरी निर्माण झाली आणि कलावंताचा तटस्थपणा, किंवा भोक्ता रचनाकार व स्रष्टा मन यात वेगळेपणा मानणारी कलावादी विचारसरणी यांचा आधार घेऊन ती दरी लपवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. जगण्याच्या अस्सल, प्रखर आणि कटू अनुभवातून जाणारा लेखक आपल्या सभोवारच्या क्रूरपणाशी फक्त वैचारिक पातळीवरच नव्हे तर जीवनाच्या पातळीवरही लढत असतो. तो तटस्थ राहू शकत नाही. आणि विचारांच्या पातळीवर लढण्याची ताकदही शेवटी जीवनाच्या पातळीवर लढल्या जाणाऱ्या लढाईतूनच येत असते.

समकालीन कथेच्या या एकूण दृश्यात काही काळपर्यंत एक 'समांतर कहानी' नावाची चळवळ चाललेली होती. तिचा झेंडा फडकावीत एक लेखक महाशय म्हणाले होते— 'आजचा लेखक कलावादी, सौंदर्यवादी मूल्यांसाठी लढत नाही. तो लढतो आपल्या विचारांसाठी. सामान्य माणसाच्या नियतीचा निर्णय अजून व्हायचा आहे

आणि त्यासाठी आजचा लेखक मोर्चात सर्वांच्या पुढे आहे हे विसरता कामा नये...'

ही खासच युद्धाची शब्दावली आहे आणि असे असावे असे कुणाला वाटणार नाही ? आणि जर हीच समकालीन कथेची ओळख असेल तर जी कथा सामान्य माणसाच्या नियतीत आणि निर्णायक संघर्षात सामील नाही ती समकालीन कथाच नव्हे असे आपण सरळसरळ उद्घोषित केले पाहिजे. आजही जे लेखक कलावादी आणि सौंदर्यवादी मूल्यांचे रक्षण करण्यासाठी छाती बडवून घेत आहेत आणि भूक व दुष्काळ यासारखे व्यापक भारतीय अनुभव आणि वास्तव कवितेच्या अमूर्त आणि थरथरणाऱ्या भाषेत सादर करीत आहेत, त्यांना आपण कुठवर समकालीन म्हणू शकणार आहोत ? आजचा माणूस विचारांसाठी नव्हे तर आपल्या अस्तित्वासाठी लढतो आहे ही गोष्ट आपण नाकारणार आहोत का ? आज त्याचा संघर्ष तात्त्विक नाही, तर आर्थिक आहे. आणि वरवर जी लढाई विचारसरणीची, आयडियालॉजीची आणि विचारांची दिसते आहे तिच्यामागेही वर्गहितसंबंधच सक्रिय आहेत. म्हणूनच जे लोक तात्त्विक आणि वैचारिक संघर्ष हीच शब्दाची पहिली प्रतिज्ञा आहे असे मानतात त्यांच्या राजकीय, सामाजिक आणि वैचारिक बांधिलकीचे स्वरूप आपण समजून घेतले पाहिजे. लेखनातून प्रकाशित होणारे त्यांच्या वर्गहिताचे स्वरूप पण पाहिले पाहिजे. लेखकाने आपली जवळीक आणि बांधिलकी कुणाशी आहे हे घोषित करून लेखनातील आपली प्रतिज्ञा स्पष्ट करण्याची वेळ अजूनही आलेली नाही का ?

'लेखक हा लेखनाशी बांधील असतो,' आणि 'त्याची प्रतिज्ञा रचनाच असते,' असे म्हणून सहअस्तित्वाची आणि तडजोडवादाची नीती स्वीकारली गेली त्या गोष्टीला काही फार काळ झालेला नाही. रोमँटिक आणि गूढवादी कविलेखकांना बरोबर घेऊन चालण्याचा धोका वाङ्मयातील पुरोगामी चळवळीने स्वीकारला होता. रचनात्मक पातळीवर या गोष्टीसाठी बराच मोठा दंड आपल्याला भोगावा लागला होता. तुम्ही आपल्या लेखनाशी आणि रचनेशी बांधील आहात, प्रतिज्ञा त्यांच्यासाठीच आहे तुमची, ही चांगली गोष्ट आहे पण तुमच्या लेखनाची आणि रचनांची बांधिलकी कुणाशी आहे ? त्यांची निष्ठा कुणाशी आहे ? त्या कुणाची बाजू घेतात ? कोणत्या बाजूला जातात ? हा प्रश्न विचारायचा हक्क आम्हाला किंवा वाचकांना आहे की नाही ? आज माणसाच्या संपूर्ण नियतीचा विचार, तिची जाण आणि दिशा राजकारणाच्या भाषेत ठरविली जात आहे, अशा वेळी लेखकाची उघड किंवा दांभिक, जाणीवपूर्वक किंवा अजाणता राजकीय जवळीक कुणाशी आहे हे आपण काय म्हणून विसरायचे ? राजकारणाबद्दल बेफिकिर आणि त्यापासून तुटलेला लेखक जागरूक तरी कसा म्हणता येईल ? लेखन आणि राजकीय जवळीक या दोन गोष्टी आपण कुठवर वेगवेगळ्या कप्पयात ठेवणार आहोत ? 'लेखनामुळे कसलीही क्रांती होत नसते' यासारख्या घोषणा देऊन लेखनातून परिवर्तनाची आणि क्रांतीची मनोवृत्ती तयार करण्याची आणि

सामाजिक बदल घडवून आणण्याची भूमिका आपण कुठवर नाकारत राहणार आहोत ? कथा आपल्या व्यापक संवेदनशीलतेमुळे एका विशाल मानव समाजाशी जोडली जाते. तिची जी प्रतिक्रिया होते आणि जो प्रभाव पडतो तो आपण दुर्लक्षित करणार आहोत का ? समकालीन कथेत हस्तिदंती मनोरे असू शकत नाहीत—असणारही नाहीत—किमान हिंदी कथेच्या स्वत:च्या राष्ट्रीय परंपरेत तरी नाहीच नाही.

म्हणून मूळ मुद्दा आहे : माणसाच्या संघर्षाशी जवळीक असण्याचा, जीवनाच्या समग्र जाणीवेचा, सामाजिक वास्तवतेच्या व्यापक अनुभवाचा. गजानन माधव मुक्तिबोधांनी अगदी स्वच्छपणे म्हणून ठेवलेले आहे, ''जे लोक शुद्ध साहित्याबद्दल किंवा साहित्यातील व्यक्तिस्वातंत्र्याबद्दल बोलतात, ते आपली रचना सामाजिक-सांस्कृतिक भूमीपासून तोडून टाकू पाहतात.'' ...समकालीन हिंदी कथेचे जे चित्र आज दिसते त्यात अशा प्रकारचे लोक होते, आहेत, आणि असतीलही, हे सांगायला नको; पण त्यासाठीच बरोबर आणि चुकीचे ठरविणारा विवेक, प्रखर समीक्षात्मक विवेक आवश्यक आहे. लक्षपूर्वक पाहिले तर आपल्याला असे आढळून येईल की घाटाची जाणीव आणि कलात्मकता यांची जोरजोरात वकिली करणारे हेच लोक असतात. पण त्यांचा घाट आणि कलात्मकता त्यांच्या एकूण मनोवृत्तीशी आणि समकालीनत्वाशी मुळीच जुळत नाही. बदललेल्या समकालीन परिस्थितीकडे त्यांची नजर जातेच, तिचे ते काही प्रमाणात वास्तववादी चित्रणही करतात; पण ही परिस्थिती का बदलली हे जाणून घेण्याचा ते कधी प्रयत्न करीत नाहीत. या बदलाला जबाबदार कोण आहे याचा विचार करीत नाहीत. कथेत हा निसर्गवाद मरून खूप दिवस झाले. त्याला आता पुन्हा जिवंत करता येणार नाही. काही कथाकार माणसा-माणसाच्या संबंधात निर्माण झालेल्या संकटाचे खूप चांगले चित्रण करतात; पण या संकटाच्या मागे कोणत्या शक्ती आहेत त्या जाणून घ्यायची त्यांची बहुधा इच्छा नसते; कारण तसे केले तर त्यांना सरळच आर्थिक व्यवस्थेच्या आणि राजकीय कट-कारस्थानांच्या विरोधात उभे राहावे लागेल. हा सरळ संघर्ष टाळून आपला विरोध ते शाब्दिक, तात्त्विक किंवा आध्यात्मिक पातळीवरच बहुधा व्यक्त करतात. समकालीनता आणि वर्तमान यांच्या संघर्षाची जी उणीव आणि कमतरता जाणवते ती घाटाच्या आणि भाषेच्या चतुराईने ते लपवू पाहतात; पण कोणत्याही प्रकारची चलाखी आशयाची जागा घेऊ शकत नाही.

समकालीन हिंदी कथा घाट आणि भाषा यांच्या बाबतीत जागरूक नाही असा याचा अर्थ नाही. नव्या प्रयोगांबाबत तिचा सावधपणा आता समग्र स्वरूपाचा झाला आहे. आशयाचा सच्चेपणा आणि तात्कालिकतेची निकड यामुळे जगण्याच्या साक्षात संघर्षाची भाषा आणि सहजता तिच्यामध्ये आलेली आहे. जो अनुभव पूर्वीचे लोक विचारांच्या किंवा चिंतनाच्या वाटेवर त्याला भरकटत नेऊन सादर करीत असत, तो अनुभव समकालीन कथाकार आपल्या भोवतालच्या जगण्याच्या कुठल्या ना कुठल्या

तरी भागात होत असलेल्या प्रतिक्रियेचे एक आवश्यक अंग म्हणून सादर करतो. तो व्यवस्थेच्या आणि राजकारणाच्या कट-कारस्थानांवर सरळ घाव घालतो.

समकालीन कथेत आणि तिच्या भाषेत जो लढाऊ बाणा आणि प्रखर प्रत्यक्षपणा आलेला आहे तो काही फक्त वरवरचा बदल नाही. त्याच्यामागे सामान्य माणसाच्या दैनंदिन अनुभवांचे जळजळीत विश्व उभे आहे. कथेत त्याची भाषा, त्याचा बाणा आणि त्याच्या प्रतिक्रिया यांचेच साक्षात प्रतिबिंब पडलेले आहे. आपल्या आसपास घडत असलेल्या अनुभवविश्वात कथाकाराने असे परत येणे हे वस्तुत: कथेच्या मूळ मनोवृत्तीकडेच परत येणे होय. तेथे महत्त्व असते ते अनुभवाच्या समकालीनत्वाला आणि त्याच्या चमचमत्या वर्तमानाला. समकालीन कथेचा आशय आणि तिची दृष्टी दोन्ही समकालीन माणसाचे जग आणि त्याचा संघर्ष यातून निर्माण झालेली आहे. आणि त्याच्याच जगण्यातले निर्णायक लढे आणि अनुभव तिच्यात प्रकट होत आहेत. समकालीन कथा आपल्या काळाकडे आणि परिस्थितीकडे व्यक्तिवादी झरोक्यातून पाहत नाही. ती त्यांच्याकडे मुक्त आणि वस्तुनिष्ठ क्षेत्राचा विस्तार म्हणून पाहते आणि तिच्यातून दिसणारा माणूस हा आपल्या काळाचा आणि संघर्षाचा नुसता साक्षीदार किंवा प्रतिनिधी नसतो तर लढाऊ समर्थक असतो. त्याने केलेला तीव्र राजकीय आणि सामाजिक प्रतिवाद, समकालीन परिस्थितीबद्दलचा त्याचा वैताग, त्याची चीड, त्याचा राग हे सगळे आजचे जळजळीत अनुभव आहेत. समकालीन कथा हा अनुभव आपल्या सहज आणि सरळ आशयाच्या माध्यमातून वाचकांपर्यंत पोहोचवते, अनायासपणे त्यांना सहभागी करून घेत त्यांच्याशी सरळ संवाद साधते आणि आपली सामाजिक व्याख्याही सादर करते. या कथांचा आविष्काराचा ढंग साधा पण सावध असतो. वास्तवाचा शोध घेण्याच्या किंवा समकालीन मनुष्याला केंद्रित करण्याच्या प्रयत्नात त्या सरळच वास्तवाला आणि केंद्रीय मनुष्याला अधोरेखित करतात. क्रूर आणि भयंकर अशा समकालीन वर्तमानाचे चित्र त्या तटस्थपणाने सादर करीत नाहीत. मानवाच्या नियतीवर संकटाचे सावट पडलेला हा जो काळ आहे, त्यात एक निश्चित बाजू घेऊन क्रांतीची आकांक्षाही त्या प्रकट करतात. आपल्या काळाची आव्हाने जिंकण्यासाठी तिचा बाणा ताठ, भाषा सरळ टोचणारी आणि आविष्कार अगदी साक्षात झालेला आहे. तिची आवाहकता व्यापक आहे ती याच मूलभूत कारणामुळे. आज माणूस वर्गांमध्ये विभाजित केला गेला आहे. अशा काळात सामान्य माणूस म्हणून दैनंदिन जगण्याच्या प्रक्रियेत अनुभवास येणारे सर्व प्रकारचे धोके कथेच्या माध्यमातून सादर करणे आणि आपल्या सभोवार असणाऱ्या आपल्यासारख्याच असंख्य माणसांमध्ये स्पंदन निर्माण करणे हाच तिचा हेतू आहे हे समकालीन कथाकाराने मान्य केले आहे.

तशा समकालीन हिंदी कथेच्या अनेक पातळ्या आहेत. अनेक परिमाणे आहेत. अनेक वादी आणि संवादी स्वरांनी तिची रचनात्मकता झंकारलेली आहे आणि अनेक

प्रवृत्तींची आणि प्रवाहांची बहुध्वन्यात्मकता ही तिच्या समृद्धीचीही निशाणी आहे.

**हे संकलन**

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडियातर्फे प्रकाशित 'हिंदी कहानी' या संग्रहाच्या पुढचा आणि पूरक असा हा संग्रह आहे. मागचा संग्रह हा हिंदी कथेच्या प्रवासाच्या प्रारंभबिंदूपासूनच जवळपास सुरू झाला होता आणि त्यात चंद्रधर शर्मा गुलेरी, प्रेमचंद, जयशंकर प्रसाद, जैनेंद्रकुमार, यशपाल, रांगेय राघव, फणीश्वरनाथ रेणू, राजेंद्र यादव, कमलेश्वर, मोहन राकेश, अमरकांत, निर्मल वर्मा, श्रीकांत वर्मा, ज्ञानरंजन आणि काशीनाथ सिंह यांच्यापर्यंतच्या कथा संग्रहित केल्या गेल्या होत्या. तरीही हिंदी कथेचे चित्र त्यात पूर्णपणे साकार होत नव्हते. हिंदी कथेच्या विकासाचे आणि सृजनात्मक समृद्धीचे प्रतिनिधित्व करणारे कितीतरी महत्त्वाचे कथाकार त्यात समाविष्ट होऊ शकले नव्हते. जुन्या आणि मधल्या पिढीचेच नव्हे; तर तरुण पिढीचेही अनेक प्रातिनिधिक लेखक राहून गेले होते. स्वातंत्र्यानंतर हिंदी कथेत नयी कहानी, अकहानी, वायू कहानी, अचेतन कहानी, सचेतन कहानी, समांतर कहानी यासारख्या अनेक चळवळी झाल्या, त्यांचे रचनाधर्मी प्रतिनिधीही त्यात समाविष्ट होऊ शकले नव्हते. कदाचित हे शक्यही नव्हते. प्रत्येक संग्रहाच्या काही मर्यादा असतात. दुसरे काही नाही तरी आकार आणि पृष्ठसंख्या यांच्या बंधनामुळेही अनेक मर्यादा पडतात. तूर्त...

या संग्रहात गजानन माधव मुक्तिबोध यांच्यापासून ते मंजूर एहतेशामपर्यंतच्या कथा समाविष्ट आहेत. एकीकडे हरिशंकर परसाई, भीष्म साहनी, अमृतराय, कामतानाथ, रमाकांत आणि स्वयंप्रकाश आहेत; तर दुसरीकडे धर्मवीर भारती, रामकुमार, कृष्ण बल्देव वैद, महीपसिंह, राजी सेठ, रमेश बक्षी, गोविंद मिश्र आणि सत्येनकुमार आहेत. समकालीन कथेतील वैविध्य शक्य तेवढ्या समग्रपणे सादर करण्याच्या या प्रयत्नात म्हणूनच वैचारिक जवळीक, विचारप्रणालीशी बांधिलकी आणि रचनात्मक ताजेपणा तसेच समृद्धी आणि शक्यता ध्यानात घेतली आहेत. रूपात्मक विविधतेसाठीच नव्हे; तर हिंदी कथेचे स्वत:चे देशीय वैशिष्ट्य रेखांकित करण्यासाठी वैचारिक मतभेद असूनही काही कथाकारांच्या कथा 'वास्तववादाच्या विजया'चा पुरावा म्हणून समाविष्ट केल्या आहेत.

समकालीन हिंदी कथेच्या आतापर्यंतच्या विकासाचे स्वरूप कळावे म्हणून 'नयी कहानी' नंतरच्या महत्त्वाच्या चळवळीतील कथाकारांच्या कथाही यात समाविष्ट केल्या आहेत आणि चळवळी-चर्चा इ. पासून दूर राहून आपल्या रचनेला निष्ठा अर्पण करणाऱ्यांच्याही कथा घेतल्या आहेत.

शक्य तेवढ्या वस्तुनिष्ठ पद्धतीने हिंदी कथेचे समकालीन दृश्य शक्य तेवढ्या समग्रपणे सादर करण्याचा पुरेपूर प्रयत्न आम्ही केला आहे. या प्रयत्नात काही

प्रातिनिधिक व ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या कथाकारांचे सहकार्य आम्हाला लाभले नाही. अन्यथा संकलन जास्त समृद्ध व समग्र झाले असते. पण जे झाले नाही त्याचे दु:ख कशाला ? नाही झाले एवढेच.

एम्.-433, ई-7, अरोरा कॉलनी,
भोपाळ-462016

**धनंजय वर्मा**

# उत्सव दुष्काळाचा

**हरिशंकर परसाई**

भेगा पडलेली सपाट कोरडी जमीन नपुंसक पतीच्या संतानेच्छू पत्नीसारखी बेचैन आणि उघडीवाघडी पडलेली आहे.

दुष्काळ पडलेला आहे.

जवळच एक गाय दुष्काळाच्या बातम्या असलेले वर्तमानपत्र खाऊन पोट भरते आहे. कोणीतरी 'सर्व्हे' करणारा ऑफिसर ते टाकून गेला असावा. या बाबतीत माणूस गायबैलापेक्षाही मागासलेला म्हणावा लागेल. गाय तर हे वर्तमानपत्रही खाऊन टाकते; पण अमेरिकेतून अन्नधान्याची जहाजे निघालेली आहेत अशी बातमी छापलेले वर्तमानपत्रसुद्धा माणूस खाऊ शकत नाही. मी एकदा खाल्ले होते. एका कॉलमची सहा ओळींची बातमी होती. मी ती कापली आणि पाण्याबरोबर गिळून टाकली. दिवसभर भूक लागली नाही. सध्या वर्तमानपत्राची निम्मी पानं दुष्काळाच्या आणि उपासमारीच्या बातम्यांनी भरलेली असतात. दुष्काळग्रस्त माणसाने रस्त्यावर पडलेले वर्तमानपत्र उचलून तेवढी पानं खाल्ली तर त्याला महिनाभर भूक लागणार नाही. पण ह्या देशातला माणूस मूर्ख आहे. त्याला उपासमारीच्या बातम्या खायला नकोत.

प्रत्येक वर्षी वसंत येतो. प्रत्येक वर्षी मंगलमय वर्षा येते. प्रत्येक वर्षी शरदोत्सव येतो.

प्रत्येक वर्षी दुष्काळ येतो, जसा प्रत्येक वर्षी स्वातंत्र्यदिन आणि प्रजासत्ताकदिन येतो. हे मंगल उत्सव आपोआप येतात. हे अमृतघटा, उत्सवासाठी अमृताची बरसात कर, अशी विनंती चंद्राला शरदामध्ये करावी लागत नाही.

पण दुष्काळासाठी खूप प्रार्थना आणि मोठी अनुष्ठानं करावी लागतात. दुष्काळासाठी इंद्रपूजा करावी लागते. पूर्वी पावसासाठी इंद्रपूजा केली जात असे. पण सध्या बिनपावसासाठी इंद्रपूजा केली जाते. कृष्णाच्या गोवर्धन पर्वताची थोड्याच दिवसात धूळधाण होऊन जाईल. इंद्राचा कोप सध्या अतिवृष्टीच्या रूपात नाही तर अनावृष्टीच्या रूपात प्रकट होतो. तस्कर लोक गोवर्धनला युरोपात नेऊन विकून टाकतील.

मोठी प्रार्थना होते. साठेबाज आणि नफेबाज वर्षभर अनुष्ठान करतात. तस्कर महाकाळाला नरमुंड वाहतात. इंजिनियरची बायको भजन गाते— 'देवा, दुःख हरी सकलांचे.' परमेश्वरा, गेल्या वर्षी दुष्काळ पडला होता तेव्हा तुम्ही सक्सेना आणि राठोड ह्यांच्यावर मदतकार्य सोपवले होते. देवा, यावर्षीही इकडे दुष्काळ पडू दे आणि आमच्या 'ह्यांना' मदतकार्याचे इनचार्ज कर. मामलेदारीण, प्रांतीण, ओव्हरसियरीण वगैरे सगळ्या प्रार्थना करतात. आमदार-पत्नी आणि मंत्री-प्रेयसी याही अनुष्ठानं करतात असे कानावर आले आहे. चौकशी कमिशन नेमले गेले असले तरी मी असला पाजी विचार मनात आणीत नाही. एवढ्या सर्व अनुष्ठानांमुळे इंद्रदेव प्रसन्न होतात आणि ह्या प्रदेशाकडे असलेल्या नळाचे कनेक्शन तोडून टाकतात.

प्रतिवर्षी वसंत !

प्रतिवर्षी शरद !

प्रतिवर्षी दुष्काळ !

मग दुष्काळाचा उत्सव का करू नये ? अन्य उत्सवांप्रमाणे हा उत्सव साजरा करण्याचा विधी ठरलेला आहे. प्रजासत्ताक दिनी परेड होते. दुष्काळात स्वस्त धान्याच्या रेशन दुकानावर परेड होते आणि तीही जास्त उत्साहाने. प्रजासत्ताकाची परेड काही तासच चालते. दुष्काळाची परेड महिन्यातल्या प्रत्येक दिवशी चालू असते. रेशन दुकानापाशी रिकाम्या पिशव्या घेऊन उभ्या राहिलेल्या सैनिकात त्या सैनिकांपेक्षा जास्त उत्साह असतो.

वर्षातले दहा महिने पैलवान घोषणा करीत असतो—ह्या वर्षी अशी काही तालीम केली आहे की माझ्याशी दोन हात करायला मैदानात कुणीही उतरू शकणार नाही. माझं आव्हान आहे—एप्रिल-मे महिन्यात कुणीही सामना करावा. पण पैलवानाला एप्रिल महिन्यातच टायफॉइड होतो आणि मग तो म्हणतो—आता माझा इलाज नाही. टायफॉइडनं सगळा बदाम जिरवून टाकला.

मंत्रीगण ह्या पहिलवानासारखे असतात... नऊ महिने दंड थोपटतात... धान्याचा अभाव आमच्यापुढे असूच शकणार नाही. इतके लाख क्विंटलचा स्टॉक करू ! 'लेव्ही' वसूल करू. कोणीही साठेबाज लढायला येऊ दे... खाली पाडू त्याला.

पण मे महिना आला की त्यालाही टायफॉइड होतो. मग तो म्हणतो—काय करू ? साठेबाजीचा टायफॉइड सरकारलाच झाला आहे. विरोधकांचे तर जाऊ द्या, आपल्याच पार्टीच्या लोकात या रोगाचे किटाणू शिरले आहेत. माणूस पाठवलाय अमेरिकेला औषध आणायला. मे महिन्यात वीर मंत्र्यांचाही बदाम जिरून गेलेला असतो.

अलीकडे माझ्या असे पाहण्यात आले आहे की उलटी 'लेव्ही' घेतली जाऊ लागली आहे. एका शहरातील भारतीय महामंडळाच्या गोडाऊनमधून खोटी नंबर प्लेट

लावलेल्या एका ट्रकमधून दीडशे गव्हाची पोती नेली जात होती. फाटकावर चौकीदाराने तो ट्रक पकडला. त्याने विचारले, ''हा 'लेव्ही'चा गहू कुठे चालला आहे ?'' खात्यातला माणूस म्हणाला— ''तुला नवा कायदा ठाऊक नाही ? नव्या कायद्याप्रमाणे खाद्य महामंडळालासुद्धा आपली लेव्ही भरावी लागते ! तीच ही लेव्ही आहे. ही साठेबाजांना दिली जाते. नव्या ऑर्डरी काय आहेत त्या जरा विचारीत चला.''

मी एका आमदाराला विचारले— ''दुष्काळाची परिस्थिती कशी काय आहे ?''

तो काळजीत पडतो. दुष्काळामुळे तो काळजीत पडला आहे असे मला वाटते.

मला खूप समाधान वाटते.

तो उत्तर देतो— ''होय, दुष्काळ तर आहे, पण तसा जास्त नाही. प्रयत्न केला तर त्याच्यावर मात करता येईल. फक्त अकरा आमदार जर आम्हाला येऊन मिळाले तर आमची मिनिस्ट्री होऊ शकेल.''

प्रत्येक माणसाचा आपला स्वत:चा दुष्काळ असतो. ह्यांचा आपला एक वेगळाच दुष्काळ आहे. ह्यांना फक्त अकरा 'क्विंटल' आमदार मिळाले की ह्यांची दुष्काळाची समस्या सुटली... म्हणजे सत्तेची.

दिवसा असे विचार चालू असतात अन् रात्री मग मला विचित्र स्वप्नं पडतात.

एके रात्री मला स्वप्न पडलं—राष्ट्राने दुष्काळोत्सव साजरा करायचं ठरवलं आहे. अनेक ठिकाणी तो साजरा होत आहे. स्वप्नात मी एक दुष्काळोत्सव पाहिला.

आसपासच्या चारपाच गावातले शेतकरी, स्त्रिया, पोरंबाळं एकत्र जमलेली होती.

मंडप सजवलेला होता. दुष्काळोत्सवाच्या उद्‌घाटनासाठी मंत्री येणार होते. तलाठ्यानं उपाशी लोकांच्याकडून वर्गणी गोळा करून शहरातून गुलाबाचे हार आणवून घेतले होते.

स्त्रिया रिकाम्या मंगलकलशात आटून गेलेल्या ओढ्याकाठचे गवत घालून ओळीने चालल्या होत्या. त्या गात होत्या—

'औंदा रे मेघा, नको रे बरसू, पडू दे मंगल दुष्काळ ।'

ओव्हरसियर आणि त्याचे साथी त्यांच्यामधून आपली निवड निश्चित करीत होते.

—सायेब, ती बघा, कशी ठुमकतेय.

—अरे, पण ती समोरची बघ तरी ! दोन्ही वेळेला सबंध भाकरी खायला मिळाली तर परीसारखी होऊन जाईल.

—पन सायेब, मामलेदारसायबाला बी नाद हाय म्हनं..

—अरे, मग थ्रू प्रॉपर चॅनल ! आम्ही काय सरकारी नियम थोडेच मोडणार आहोत ?

हाडंच हाडं ! कुठल्या डिंकानं ही हाडं जोडून माणसांचे पुतळे उभे केले आहेत कुणास ठाऊक ?

हा जगण्याच्या इच्छेचा डिंक आहे. तो हाडं जोडतो. आतडी जोडतो.

डोकं मैलभर दूर पडलं असलं तरी जोडतो.

जगण्याच्या इच्छेचा डिंक फार शक्तिशाली असतो.

पण वाटतं, हे कशासाठी जगताहेत ?

हे मरण्याची इच्छा खाऊन जगताहेत. हे रोज म्हणतात— यापेक्षा मरण आलं तर बरं !

पण मरण्याची इच्छा खाऊन टाकतात. मरण्याच्या इच्छेत पोषक तत्त्वं असतात.

शरीर जोडलेलं राहतं, ते जगण्याच्या इच्छेच्या डिंकानं.

दुष्काळोत्सव सुरू होतो.

उत्सव म्हटलं की कवी पाहिजेतच. ते उत्सवाचा 'मूड' आणतात. दोन कवी प्रसंगानुरूप कविता घेऊन तेथे आले होते.

आमदारांनी छोटंसं भाषण केलं— ''आज आपल्या येथे मंत्रीमहोदय आलेले आहेत ही फार भाग्याची गोष्ट आहे. त्यांना अनेक उत्सवांची आमंत्रणं आलेली होती, पण या भागातल्या दुष्काळावर त्यांचं विशेष प्रेम असल्यामुळे ते इथं आले. आम्ही त्यांचं स्वागत करतो.''

हार अर्पण झाले आणि टाळ्या वाजल्या.

सर्वात छान टाळ्या वाजवल्या मंत्र्यांच्या आजूबाजूला बसलेल्या साठेबाजांनी, नफेखोरांनी, चोरबाजारवाल्यांनी आणि या सर्वांच्या सरकारी भाऊबंदांनी. मग मंत्रीमहोदयांनी भाषण केले—

''या दुष्काळोत्सवाच्या उद्घाटनासाठी आपण मला निमंत्रण दिले याबद्दल मी आपला आभारी आहे. दुष्काळ ही प्राचीन भारतीय परंपरा आहे. प्रभू रामचंद्रांच्या राज्यातही दुष्काळ पडला होता हे आपणास ठाऊक आहेच. आमच्याही राज्यात दुष्काळ पडला आहे. आम्ही गांधीजींच्या आदेशानुसार रामराज्य आणतो आहोत. दुष्काळ हा रामराज्याचा पाया आहे. जर दुष्काळ पडला नसता तर मर्यादापुरुषोत्तम प्रभू रामचंद्र हे रामराज्याचा स्वर्ग आणूच शकले नसते. म्हणून दुष्काळाचं स्वागत केलं पाहिजे. दुष्काळाशिवाय रामराज्य येऊ शकत नाही. आमचे विरोधी पक्षातले मित्र भारतीय संस्कृतीचे पुजारी आहेत. दुष्काळ हे आमच्या महान भारतीय संस्कृतीचे एक मुख्य तत्त्व आहे या माझ्या मताशी ते सहमत होतील. द्रोणाचार्यासारखे वीरसुद्धा उपाशी मरत होते...

''तुम्ही मोठ्या आनंदाने दुष्काळोत्सव साजरा करावा अशी माझी इच्छा आहे. घोर संकटातसुद्धा आनंदात राहणारी आपण माणसं आहोत. आपल्या प्रियजनांच्या मृत्यूनंतर आपण श्राद्ध करतो तेव्हा तूप शुद्ध आहे की नाही याची पारख आपण ते हातावर चोळून करतो आणि मग त्या तुपाचे लाडू खातो हे आपण जाणताच.

"मी आपला जास्त वेळ घेणार नाही; कारण रेस्ट हाउसवर माझ्यासाठी कोंबडी शिजून तयार असेल. उत्सव यशस्वी होवो अशी इच्छा मी व्यक्त करतो."

ते बसले.

त्यानंतर दोन कविता झाल्या—एक गंभीर आणि दुसरी विनोदी.

गंभीर कवी वाचू लागला—

*स्वागत हे दुष्काळा ! स्वागत हे दुष्काळा !*
*भारतीय गौरवाचे प्रतीक तू*
*गांधींच्या स्वप्नाचे प्रतीक तू*
*सुरक्षित अरे गुदामातल्या*
*हरित क्रांतीचे प्रिय प्रतीक तू*
*रवंथ करित हा मनुही बसला !*
*स्वागत हे दुष्काळा ! स्वागत हे दुष्काळा !*

नंतर, कवी 'मामा' ह्यांनी विनोदी कविता म्हटली—

*मामी म्हणाली मामाला अहो पाहा पाहा*
*मेल्या मांजरीने पोळी केली की हो स्वाहा*
*मामा म्हणे परत मिळविण्या गे पोळी*
*तू गट्टम कर ना मांजरीला पटकन अहा !*

यानंतर काही औपचारिक गोष्टी झाल्या आणि समारंभ संपला. कारण रेस्ट हाउसमध्ये शिजलेल्या कोंबड्यांनी बांग द्यायला सुरवात केली होती.

दुसऱ्या दिवसापासून मदत कार्यास सुरवात झाली.

मला खूप स्वप्नं पडतात.

स्वप्नात मला दिसतं— भुकेनं माणसं कळवळू लागली आहेत. त्यांना पुरेशी मजुरी मिळत नाहीय. मजुरी मिळाली तर धान्य मिळत नाहीय. मिळालं तर फार महाग मिळतंय. महाग मिळालं तरी त्यात कसला कसला कचरा मिसळलेला असतो कोण जाणे !

भुकेले आणि अर्धपोटी लोक आक्रोश करीत आहेत— भाकरी नाही तर उत्सव कसला ! उत्सव फेल झाला आहे !

आणखी एक स्वप्न पडतं. दुसऱ्या पार्टीचे काही लोक शेठसावकारांना, साठेबाजांना, नफेबाजांना घेऊन जाताहेत आणि लोकांना म्हणताहेत—

"तुम्हाला भाकरी मिळत नाही. भाकरी मिळत नाही याचं कारण तुम्हाला

अन्नधान्य मिळत नाही. अन्नधान्य का मिळत नाही याचं कारण हे जे लोक इथं आलेले आहेत ह्यांचा धान्यसाठा सरकारनंच दाबून ठेवलाय. अन्यायानं दाबून ठेवलाय.

तुम्हीच सांगा— ''गेल्या कित्येक पिढ्यांपासून तुम्ही धान्य कुणाला विकत होता ?''

लोक म्हणाले—''ह्या तुमच्याबरोबर आलेल्या लोकांना. पण हे लोक...''

नेतेमंडळी म्हणाली—'' 'पण'बीण आता पुरे. ह्या सरकारनं ह्यांची खरेदी बंद करून टाकली आहे. आता सांगा—धान्य तुम्ही कुणाकडून घेत होता ?''

लोक म्हणाले— ''ह्याच लोकांच्याकडून पण...''

नेते म्हणाले— ''पण सरकारनं ह्यांना विकायलाही बंदी केलीय्.''

लोक म्हणाले—''मग आता आम्ही काय करावं ? कुणाच्या प्रामाणिकपणावर विश्वास ठेवावा ?''

नेते म्हणाले—''आता आम्ही सांगतो ते ऐका. ह्या सरकारचा दुष्काळोत्सव तर तुम्ही भोगलात. आता हे सरकार बदलून टाका. आता आम्हाला व्होट द्या. आम्हाला विधानसभेत आणि लोकसभेत पाठवा. आमचे सरकार बनू द्या. मग तुम्ही सगळे सुखी व्हाल. ज्यांना खरेदी करायची आहे ते खरेदी करतील. ज्यांना विकायचं आहे ते विकतील. आदिकाळापासून हेच चालत आलेले आहे. हाच सनातनधर्म आहे. आमच्या दुष्काळ उत्सवाबद्दल तुम्हाला तक्रार करायला जागाच उरणार नाही.''

लोक म्हणाले—''पण...''

नेते म्हणाले—''तुम्ही सारखं पण पण काय चालवलं आहे ? असे अगर-मगर म्हणण्यापेक्षा मगरमच्छ का म्हणत नाही ?''

पुन्हा मला स्वप्न पडतं. ह्या स्वप्नांमुळे मी फार त्रस्त झालो आहे. ज्यांना स्वप्नं पडत नाहीत ते लोक किती सुखी म्हणावे. ज्याला स्वप्नं पडत नाहीत तोच सुखनिद्रा घेतो असे मला वाटू लागले आहे. पूर्वी मला असं वाटायचं की डुक्कर आणि कुत्रा ह्या दोन प्राण्यांना स्वप्नं पडत नसावीत. पण अलीकडे अन्नाचा कण न मिळाल्यामुळे उंदरांनाही स्वप्नं पडत असली पाहिजेत.

भुकेली माणसं वेगवेगळी सरकारं बनवताहेत असं मला स्वप्नात दिसू लागतं. दुष्काळोत्सवही साजरा करताहेत. मोठा आनंद आहे. पण भाकरी मिळत नाही. धान्य मिळत नाही.

''अथातो ब्रह्म जिज्ञासा !'' मी तत्त्वज्ञानी बनतो. ऋषी शिष्याला ब्रह्माच्या स्वरूपासंबंधी चिंतन करायला सांगतो. जिज्ञासू शिष्य उपास करून चिंतन करू लागतो. मग तो भुकेला ब्रह्मचारी म्हणू लागतो— ''गुरुजी, अन्नं ब्रह्म ! अन्न हेच ब्रह्म आहे. गुरुजी ! अन्न ! अन्न ! ते मिळाल्यानंतरच आनंद ब्रह्म येते.''

इकडे गडबड वाढू लागली आहे.

जे सरकार दुष्काळोत्सव साजरा करते ते भाकरी देणार नाही असं ह्या लोकांना कोण समजावून सांगत आहे कुणास ठाऊक.

पण लोकांना उत्सव साजरा करायची सवय जडलीय.

उत्सवाचे स्वरूप बदलेल पण हे उत्सव साजरा करतीलच.

मला भयंकर स्वप्न पडते.

दुष्काळोत्सवाच्या मूडमध्ये लोक भुकेले, अर्धपोटी, ढोल बडवीत, गात, नाचत राजधानीत आले आहेत. एक भयंकर दृश्य मला दिसू लागते.

एक ओळखीचा आमदार भेटतो. त्याला एक हात नसतो. त्याच्या बाहीतून रक्त टपकत असते.

मी विचारतो—''हे काय झालंय् ?''

तो म्हणतो—''त्या दुष्काळोत्सवाच्या लोकांनी माझा हात खाऊन टाकला.''

दुसऱ्या एका आमदाराची तंगडी खाल्ली गेली. कुण्या मंत्र्याचं नाक चावून खाल्लंय, तर कुणाचा कान !

गर्दी वाढू लागते.

आमदार आणि मंत्रिगण पळू लागताहेत.

अचानक लोक शेकडो साठेबाजांना आणि नफेबाजांना पकडून आणताहेत आणि त्यांना भाजताहेत. म्हणताहेत—''तुमची भूक तर इतकी मोठी आहे की तुम्ही स्वत:चं मांस भाजून खाल्लं तरी तुमचं पोट भरणार नाही.''

''आम्हाला खाल्ले तर तुम्ही उपाशीच राहाल. आमच्यात खाण्याजोगं काही राहिलेलंच नाही.''

आता ते पोलिसांची आणि बंदुकांची वाट पाहताहेत.

आमदार निवासात शुकशुकाट !

लोकसभेत आणि प्रांगणात शुकशुकाट !

आता ह्या भुकेलेल्यांनी खायचं काय ? भाग्यविधात्यांचं आणि जीवनाच्या ठोक व्यापाऱ्यांचं नाक खाल्लं, कान खाल्ले, हात खाल्ले, तंगडी खाल्ली. ते सगळे पळून गेले. आता काय खायचं ?

आता काय खायचं ! शेवटी त्यांनी विधानभवनाच्या आणि लोकसभेच्या इमारतींच्या विटा आणि दगड तोडून खायला सुरवात केली.

भयंकर स्वप्न ! माझी झोप मोडली. मी घामानं भिजून चिंब झालो. भीती वाटू लागली. काय करू ? स्वप्नच तर आहे असा विचार करून स्वत:चं समाधान करून घेऊ लागलो.

पण मनाला शांतता नाही. 'रामचरितमानसा'चे चतु:शती वर्ष आहे म्हणून मी मोठ्या श्रद्धेने मानसाचा पाठ करण्याच्या विचाराने 'रामचरितमानस' हाती घेतले. त्यामुळे तरी शांतता मिळेल.

सहजच एक पान उघडतो.

योगायोगाने 'लंकाकांड' निघते.

मी वाचतो. अशोकवनात त्रिजटा सीतेला धैर्य धारण करण्यास सांगते आहे.

त्रिजटेला पण माझ्यासारखेच स्वप्न पडले होते.

त्रिजटेला माझ्यापेक्षा जास्त दिसत आणि समजत होते. तिला पुढचे खूप दिसत होते. ती म्हणते—

मी म्हणते गं विचार करूनी ।
हे स्वप्न व्हायचे सत्य, चार दिसांनी ।।

# गुलकी नवरी

**धर्मवीर भारती**

''ए, जा मर काळतोंड्या !'' केरकचरा टाकण्यासाठी घेघात्याने अचानक दरवाजा उघडला आणि ओट्यावर बसून गात असलेल्या मिरवाकडे पाहात ती म्हणाली, ''तुज्या पोटामंदी फोनोगिराफ उगवलाय का काय म्हनावं, सक्काळधरनं सुदिक गळा फाडाया लागलाय. रातच्याला हेचा डोला कसा लागत असंल देव जाणे !'' घेघात्या सगळा कचरा आपल्याच डोक्यावर पालथा करणार या भीतीने मिरवा थोडासा बाजूला सरकला आणि घेघात्या आत जाताच पुन्हा ओट्याच्या पायरीवर येऊन बसला. पाय हलवीत त्यानं वेडंवाकडं गाणं सुरू केलं, ''*तुमें बछ याद कलते हम छनम तेली कछम !*'' मिरवाचा आवाज ऐकताच झिपरी कुत्री पण कान आणि शेपूट झाडत कुठून तरी आली आणि खाली रस्त्यावर बसून अगदी हिज मास्टर्स व्हॉइसच्या रेकॉर्डवरच्या चित्रासारखी ऐकू लागली.

गल्लीत ह्या वेळी शुकशुकाट होता. सगळ्यात आधी मिरवाला जाग यायची. (त्याचं खरं नाव मिहिरलाल.) डोळे चोळीत चोळीत तो घेघात्याच्या चौथऱ्यावर येऊन बसायचा. त्याच्या पाठोपाठ झिपरी कुत्री, मग मिरवाची धाकटी बहीण मटकी आणि मग एकएक करीत गल्लीतली सगळी पोरं भेळवाल्याचा मुलगा मेवा, ड्रायव्हरसाहेबांची मुलगी निरमल, म्यानेजरसाहेबांचा मुन्ना बाबू—सगळे जमा व्हायचे. घेघात्याच्या ओट्यावर गुलकीने भाजीचं दुकान थाटलं तेव्हापासून ही पोरं गोळा व्हायला लागली होती. आधी ती हकीमजींच्या चौथऱ्यावर खेळत असत. उन्हं वर येताच गुलकी घाऊक बाजारात जाऊन भाजी खरेदी करायची, आपल्या कुबड्या पाठीवरून ते ओझं काठी टेकीत टेकीत घेऊन यायची आणि दुकान मांडायची. मुळे, लिंबं, भोपळा, दुध्या, घोसाळी; तर कधी स्वस्त फळं ! मिरवा आणि मटकी ही जानकी वस्तादाची मुलं. तो एका भयंकर रोगानं झिजून मेला आणि त्याची दोन्ही पोरंही विकलांग, विक्षिप्त आणि रोगट अशी जन्माला आली. झिपरी कुत्री तेवढी त्यांच्याजवळ बसायची आणि गुलकीशिवाय कोणी त्यांना दाराशी किंवा दुकानाशी उभं करीत नसे.

आजसुद्धा गुलकीला येताना पाहिलं तेव्हा सर्वांत आधी मिरवानं गाणं गायचं

सोडून म्हणाला, ''छलाम गुलकी !'' आणि पानथरीने फुगलेल्या पोटावरून खाली घसरणारी चड्डी सावरीत मटकी म्हणाली, ''एखादा मुळा दे न ! ए गुलकी !''

गुलकी कशामुळे चिडलेली होती कुणास ठाऊक. मटकीला झिडकारून टाकीत ती आपलं दुकान मांडू लागली. झिपरी जवळ गेली तशी तिनं काठी उगारली. दुकान मांडून झाल्यावर आपली कुबडी पाठ वाकवून ती खाली बसली आणि तोंडाने पुटपुटत कुणाला तरी शिव्या देऊ लागली. मटकी एक क्षणभर गप्प उभी राहिली आणि मग पुन्हा तिनं आपलं तुणतुणं सुरू केलं. ''एक मुळा ! ए गुलकी ! एक...'' गुलकीने तिला पुन्हा झिडकारले तेव्हा ती गप्प झाली आणि एका बाजूला उभी राहून मोठ्या लोभीपणाने स्वच्छ धुतलेल्या पांढऱ्याशुभ्र मुळ्यांकडे पाहू लागली. या वेळी ती काहीच म्हणाली नाही. त्या मुळ्यांच्या दिशेने तिने हळूच आपला हात सरकवला. तोच गुलकी ओरडली, ''हात बाजूला घे. शिवू नको कोडफुटली मेली ! खायप्यायची वस्तू दिसली की चिकटलीच जळूसारखी. चल जा तिकडे !'' मटकी आधी थोडी मागे सरकली पण अदम्य अभिलाषेमुळे हात पुढे करून तिने एक मुळा ओढून काढलाच.

गुलकीचा चेहरा लाललाल झाला. तिने बांबूची एक कामटी घेऊन तिच्या हातावर चटकन मारली. मुळा खाली पडला आणि ''आई ग ! आई ! आई !'' करीत दोन्ही हात झाडीत मटकी पाय आपटून आपटून रडू लागली. ''जा तुझ्या घरला जाऊन रड ! माज्या दुकानातच मरायला येत्यात मेली गल्लीतली समदी पोरं'' गुलकी ओरडली !

''आमी तर दुकान देऊन संकटच इकत घेतलं म्हनायचं. द्येवाचा पूजापाठ करावा म्हनलं वाइच तर तेवड्यात बी ह्यो गोंधळ !'' आतून घेघात्याचा आवाज आला. मोठाच गोंधळ माजला. त्यात झिप्रीपण उभी राहून उदात्त स्वरात भुंकू लागली.

''लेफ्ट राइट ! लेफ्ट राइट !'' चौकातून तीनचार पोरांची मिरवणूक येऊ लागली होती. सगळ्यात पुढे ब तुकडीत शिकणारे मुन्नाबाबू लिंबाचा फाटा झेंड्यासारखा धरीत मिरवणुकीचे नेतृत्व करीत होते. त्यांच्यामागे होते मेवा आणि निरमल. मिरवणूक दुकानापाशी येऊन थांबली. गुलकी सावध झाली. शत्रूची ताकद वाढलेली होती.

स्फुंदत स्फुंदत मटकी म्हणाली, ''आमाला गुलकीनं मारलं. अं... अं...! आमाला नालीमंदी ढकलून दिलं. आई ग !'' निरमल, मेवा, मुन्ना सगळेजण तिच्या जवळ जाऊन तिला किती लागलंय ते पाहू लागले. मुन्नाने सगळ्यांना मागे ढकलले आणि फाटा हातात धरून ताठपणे उभे राहत विचारले, ''हिला कुणी मारलं ?''

''म्या मारलं !'' मोठ्या कष्टाने उभी राहत कुबडी गुलकी म्हणाली, ''काय करनार हैस ? मस्नी मारनार हैस ?''

''का नाही मारणार ?'' मुन्नाबाबू ताठपणे म्हणाले.

गुलकी काही उत्तर देणार एवढ्यात पोरं तिच्याभोवती गोळा झाली. मटकीनं जीभ बाहेर काढून तिला वेडावलं.

मेवा तिच्या पाठीमागे जाऊन म्हणाला, ''ए कुबडी, ए कुबडी, बघू तुझं कुबड !'' आणि मूठभर माती तिच्या पाठीवर उधळत तो पळून गेला. गुलकीचा चेहरा लाल झाला आणि दाटून आलेल्या गळ्यानं विव्हळत ती काय म्हणाली कुणास ठाऊक; पण तिच्या चेहऱ्यावर भीतीच्या सावल्या खूप दाटून आल्या होत्या.

पोरं मूठमूठ माती घेऊन गोंधळ करीत धावू लागली तेव्हा अचानक घेघात्याचा आवाज ऐकू आला, ''ए मुन्नाबाबू, आता जातोस का ताईला सांगून दोन-चार कानपिचक्या द्यायला लावू ?''

''निघालोय ना !'' मुन्ना ताठपणे म्हणाला, ''ए मिरवा, बिगुल वाजव !'' दोन्ही हात तोंडावर जुळवत मिरवा म्हणाला, ''धुतु-धुतु-धू.'' मिरवणूक निघाली आणि कॅप्टननं घोषणा दिली—

अपने देश में अपना राज !

गुलकीच्या दुकानावर बायकॉट !

घोषणा देत मिरवणूक गल्लीत वळून निघून गेली. कुबडीने डोळे पुसले. भाज्यांवर पडलेली धूळ झटकली आणि त्यावर ती पाणी शिंपडू लागली.

गुलकीचं वय काही फार नव्हतं. असेल जास्तीत जास्त पंचवीस नाहीतर सव्वीस. पण चेहऱ्यावर सुरकुत्या पडू लागलेल्या होत्या आणि कमरेत इतकी वाकली होती की जणू काही ऐंशी वर्षांची म्हातारी असावी. पोरांनी तिला गल्लीत प्रथम पाहिले तेव्हा त्यांना आश्चर्यही वाटले आणि थोडी भीतीही वाटली. ही कोठून आली ? आधी कुठे होती ? इथे कशी आली ? या बाबतीत त्यांना काहीच अनुमान करता येत नव्हते. निरमलने मात्र आपली आई ड्रायव्हर वडिलांना सांगत असताना ऐकले होते— ''हे एक संकट आणखी येऊन उभं राहिलंय. नवऱ्यानं हाकलून दिलं म्हणून आम्ही थोडंच हे लोढणं गळ्यात बांधून घेणार ? बापानं तर आपलं देणं बुडवलंच आहे. सुना वारला तेव्हा आपण तिचं घर कब्जात घेऊन टाकू या भीतीनं आपल्या नवऱ्याला सोडून आलीय. खबरदार, तुम्ही तिला किल्ली दिली तर.''

''असलं काय कोतेपणाचं बोलतेस. तिच्या बापानं रुपये घेतले म्हणून काय आपण तिचं घर बळकवायचं ? मी किल्ली देऊन टाकलीय. पाचदहा दिवस पुरेल एवढं अन्नपाणी पण पाठवून द्यायचं तिच्याकडे.''

''तर तर. सगळं घरच पाठवून द्या ना. ऐकते आहेस ना घेघात्या ?''

''अग, त्यात काय बिगडलं म्हनते मी. निरमलच्या बाबाची आन तिच्या बापाची लई मैतरी व्हती,'' घेघात्या म्हणाली. ''बिचारी बापाची एकुलती एक पोर. लगीन केलं आन तिचा सत्यानास झाला. आन कसल्या कसायाच्या हाती दिली बग. पाच वरसात हिचं कुबड की गं निगालं.''

''साला इकडं आला तर हंटरनं फोडून काढीन,'' ड्रायव्हरसाहेब म्हणाले. ''पाच

वर्षानं पोर झालं. आता मेलेलं पोर जन्माला आलं त्यात हिची काय चूक ? साल्यानं जिन्यावरून ढकलून दिलं हिला. जन्माची कुबडी होऊन बसली. आता हिची गुजराण कशी होणार ?''

''पोरा, तिला एक दुकान काढून दे. आमचा ओटा रिकामाच असतुया. दे म्हनावं रुपया दोन रुपये भाडं आन् बस दीसभर माल इकीत. आमी काय नगं म्हनतुया ? यवडा मोठा ओटा गल्लीतल्या लोकांच्या कामास आला तर बरंच हाय की. आमी काय छातीवर बांदून घिऊन जानार हाय व्हय ? पर, त्येवडं एक रुपया भाडं मातुर द्याया होवं.''

दुसऱ्या दिवशी ही खळबळजनक बातमी सर्व पोरात पसरली. तसं पाहिलं तर हकीमजींचा चौथरा मोठा होता पण तो पक्का बांधलेला नव्हता. आणि त्याच्यावर छतही नव्हतं. आत्याचा ओटा लांबट होता. तो दगडांनी बांधलेला होता. लाकडाचे खांब होते. त्यावर पत्रे घातलेले होते. अनेक प्रकारचे खेळ खेळायची सोय होती. खांबाच्या पाठीमागे खेळण्यासाठी रेघा ओढता येत होत्या. लंगडी घालून ठिकऱ्या नाहीतर छप्पापाणी खेळता येत होतं. पाटाला तार गुंडाळून आगगाडी चालवता येत होती. गुलकीने आपले दुकान मांडण्यासाठी चौथऱ्याच्या खांबांना बांबू बांधले तेव्हा आपल्या साम्राज्यात कोण्या अज्ञात शत्रूने घुसून किल्लेबंदी केली आहे असे पोरांना वाटले. ती घाबरून लांबूनच तिच्याकडे बघायची. त्यांचा एकमेव बातमीदार म्हणजे निरमल आणि निरमलचे एकमेव विश्वस्त सूत्र म्हणजे तिची आई.

तिने जे काही ऐकलं तेवढ्यावरून सगळ्यांना सांगितलं की ''ही चोर आहे. तिचा बाप शंभर रुपयांची चोरी करून पळून गेला. ही पण तिच्या घरचे सगळे रुपये चोरून नेण्यासाठी आली आहे. रुपये चोरले तर हीपण मरून जाईल.''

मुन्ना म्हणाला, ''देव सगळ्यांना शिक्षा करतो.''

निरमल म्हणाली, ''सासरीपण हिने रुपये चोरले असतील.''

मेवा म्हणाला, ''अगं, ते काही कुबड नाही तिचं. तेच रुपयांचं गाठोडं बांधलय पाठीवर. मनसेधूचेच रुपये आहेत ते.''

''खरंच ?'' निरमलने अविश्वासाने विचारले.

''नाहीतर काय, कुबड थोडंच आहे ते. असलं तर दाखव म्हणावं !'' मुन्नाच्या बोलण्यामुळे उत्साहित होऊन मेवा विचारायला निघालाच होता. तेवढ्यात साबणवाली सत्ती गुलकीशी बोलत असलेली दिसली. म्हणत होती, ''ब्येस केलंस तू ! मेहनत करून दुकान चालव. आता कधी पानी मागाया बी जाऊ नगंस त्येच्याकडं. हरामजादा, दुसरी बाईल कर न्हायतर आनखी धा बायली कर म्हनावं. समद्यांचं पाप त्येच्या शिरावर. हिकडं कंदी आलाच तर मला सांग. ह्या चाकूनं त्येचं दोन्ही डोळं काडीन भाईर.''

पोरं घाबरून मागे सरकली. जाता जाता सत्ती म्हणाली, ''कंदी पैशाअडक्याची गरज भासली तर सांग माय.''

काही दिवस पोरं घाबरून राहिली. पण अचानक त्यांना असं वाटलं की ही कुबडी मुद्दाम घाबरवण्यासाठीच सत्तीला बोलावत असली पाहिजे. ह्या विचाराने त्यांच्या क्रोधाग्नीत तेलच पडले. पण करणार काय. शेवटी त्यांनी एक उपाय शोधून काढला. ते म्हातारीचा एक खेळ खेळत असत. त्यात त्यांनी सुधारणा केली. मटकीला लिमलेटच्या लोभानं कुबडी बनवली. ती तशीच पाठ वाकवून चालू लागली. पोरांनी सवाल-जबाब सुरू केला—

''कुबडे, कुबडे, काय शोधते ?''
''सुई शोधते.''
''सुई घेऊन काय करणार ?''
''गोधडी शिवणार !''
''गोधडी शिवून काय करणार ?''
''लाकडं आणणार !''
''लाकडं आणून काय करणार ?''
''भात शिजवणार !''
''भात शिजवून काय करणार ?''
''भात खाणार.''
''भाताच्या ऐवजी लाथ खाणार ?''

कुबडी झालेल्या मटकीने काही उत्तर द्यायच्या आधीच ते तिला जोरात लाथ मारीत आणि मटकी तोंडावर पडे. तिची कोपरं अन् गुडघे सोलून निघत, डोळ्यात पाणी येई आणि ओठ घट्ट मिटून ती आपलं रडं आवरीत असे. पोरं आनंदाने ओरडत— ''कुबडीला मारलं ! कुबडीला मारलं.'' गुलकी हे सगळं पाहायची आणि तोंड फिरवायची.

एकदा असेच मटकीला कुबडी करून पोरं गुलकीच्या दुकानासमोर आली आणि मटकीनं काही उत्तर देण्याआधीच फारसा विचार न करता त्यांनी तिला इतक्या जोरात ढकललं की तिला आपली कोपरंही टेकवता आली नाहीत आणि ती सरळ तोंडावर पालथी पडली. नाक, ओठ आणि भुवया रक्तानं भरून गेल्या. ती ''आई ग ! आई ग !'' करीत इतक्या जोरात ओरडली की पोरं ''कुबडी मेली !'' असं जोराने म्हणता म्हणताच घाबरून स्तंभित झाली. अचानक गुलकी उठल्याचं त्यांनी पाहिलं आणि ती धूम पळाली. गुलकी उठली. मटकीला आपल्या मांडीवर घेऊन पाण्यानं तिचं तोंड धुवू लागली आणि आपल्या लुगड्यानं तिचं रक्त पुसू लागली. पोरांना काय वाटलं की ती मटकीला मारते आहे की काय, म्हणून ती अचानक परत फिरली आणि गुलकीवर तुटून पडली. गुलकीच्या किंकाळ्या ऐकून गल्लीतले लोक गोळा झाले. गुलकीचे केस पिंजारलेले आहेत. दातातून रक्त येते आहे. अर्धीउघडी ओट्याजवळ पडलेली आहे

आणि सगळी भाजी रस्त्यावर पसरलेली आहे असे दृश्य त्यांना दिसले. घेघात्याने तिला नीट बसवले. तिचे लुगडे ठीकठाक केले. आणि चिडून ती म्हणाली, ''ताकत न्हाय कनभर आन वझं उचलीन मनभर ! काळमेळ बगुन गप ऱ्हावं आपुन. कशापाई पोरांच्या तोंडी लागायचं ?''

लोकांनी चौकशी केली पण ती काहीच बोलली नाही. जणू काही तिची वाचा गेली होती. तिनं मुकाट्यानं आपलं दुकान ठीकठाक केलं. दातातून आलेलं रक्त पुसलं, चुळा भरल्या आणि बसली.

त्यानंतर आपल्या त्या कृत्यामुळं पोरं स्वत:च काहीशी दडपल्यासारखी झाली होती. पुष्कळ दिवस शांत राहिली. आज मेवाने तिच्या पाठीवर माती उधळली तेव्हा ती खूप संतापली पण तिला काय वाटलं कोण जाणे, ती मुकाट बसली आणि घोषणा देत मिरवणूक जेव्हा गल्लीत वळून दिसेनाशी झाली तेव्हा तिने पाठीवरची धूळ झटकून टाकली आणि ती भाजीवर पाणी शिंपडू लागली. ''ही गल्लीतली पोरं म्हंजी राक्स हैत सुदिक !'' घेघात्या म्हणाली. ''त्येस्नी कशाला काय म्हन्ता आत्याबाई, आपलंच नशीब खोटं म्हनायचं !'' गुलकी दीर्घ श्वास घेत म्हणाली.

ह्या वेळी पाऊस असा काही लागून राहिला की ओळीनं पाच दिवस सूर्याचे दर्शन झाले नाही. सगळी पोरं घरात बांधल्यासारखी आणि गुलकी कधी दुकान मांडायची, कधी नाही. अखेर सहाव्या दिवशी तिसऱ्या प्रहरी कसाबसा पाऊस थांबला. पोरं हकीमजींच्या ओट्यावर गोळा झाली. मेवाने चिंचोके गोळा करून आणले होते. आणि निरमलने झाडावरून पडलेल्या लिंबोळ्या गोळा करून दुकान सजवले होते. आणि गुलकीसारखाच आवाज काढीत ती म्हणत होती, ''घ्या काकडी, बटाटे, मुळे, घोसाळे !'' थोड्याच वेळात तेथे अनेक बाल-गिऱ्हाइकं जमा झाली. अचानक ह्या गोंधळाला कापत गाण्याचे स्वर आत्याच्या ओट्यावरून ऐकू येऊ लागले. पोरांनी वळून पाहिले. मिरवा आणि मटकी गुलकीच्या दुकानात बसलेली. मटकी काकडी खाते आहे आणि मिरवा झिप्रीचं डोकं आपल्या मांडीवर ठेवून तिच्या डोळ्यात पाहत गाणं म्हणतो आहे.

लगेच मेवा गेला आणि त्याने माहिती आणली की गुलकीने दोघांना दोन-दोन पैसे दिले आहेत आणि दोघं मिळून झिप्री कुत्रीच्या अंगावरची गोचिडं काढत आहेत. चौथऱ्यावर गडबड माजली आणि मुन्ना म्हणाला, ''निरमल ! त्या मिरव्याला आणि मटकीला एकपण लिंबोळी देऊ नकोस, राहू दे त्यांना त्या कुबडीकडेच.''

''हो न !'' निरमल डोळे मोठे करीत, गाल फुगवीत म्हणाली, ''आमची आई तर म्हणत होती की त्यांना शिवू नका. त्यांच्याबरोबर काही खाऊ नका अन खेळू पण नका. त्यांना कसला तरी वाईट रोग जडलाय. थू: !'' मुन्नाने त्यांच्याकडे पाहून उलटी होत असल्यासारखा चेहरा केला आणि तो जमिनीवर थुंकला.

बसल्या जागी गुलकीला सगळं समजत होतं आणि ह्या निरर्थक घृणेत तिला जणू काही आनंद वाटू लागला होता. ती मिरवाला म्हणाली, ''तुम्ही दोघं मिळून गायला तर तुमास्नी दोन पैसं दीन. लई जोरानं म्हणायचं !''

भाऊबहीण मिळून गाणं म्हणू लागली— *''माल कताली मल जाना, पल अकियां किछी से...''*

अचानक फटकन् दरवाजा उघडला गेला आणि एक तांब्याभर पाणी त्या दोघांच्यावर ओतीत घेघात्या गरजली, ''चला हाकला इथनं, काळतोंड्यांनो ! अजून इतभर न्हाईत आन् लागली उठवळ बायांची गानी गाया. ना भैनीचा इच्यार ना लेकीचा. आन कुबडे, म्या तुला सांगत्ये, आमी काय इथं रंडीबाजार मांडायला ह्यो ओटा न्हाई दिला. हुं: नायकिनीचं गानं करायचं तर चल नीग इथनं.''

गुलकी पाणी शिंपडीत म्हणाली, ''आत्याबाई, पोरं हैत. गात्यात. त्यात काय चूक झाली म्हनावं !''

''आ हा ऽ हा ! पोरं म्हनं ! तू तर अजान लेकरू हायस की गं. आदीच सांगून ठिवते, माज्यासंगं जीभ न्हाई चालवायची. हां ! म्या लई वंगाळ हाय. आदी पाच म्हैन्याचं भाडं बी दिलेलं न्हाईस आन् इथं समद्या दुनियेतली आंधळी आन म्हारोगी गोळा कराया लागलीस. चल, उचल तुजं दुकान इथनं. उद्या दिसलं न्हाई पायजे. अरे रामा ! ह्या गल्लीत तर समदी अधर्माची संतती. राक्सच जलमाला आली हैत. धरती दुभंग होऊन मरून का जात न्हैत !''

गुलकी एकदम स्तब्ध झाली. खरोखरच तिने पाच महिन्यांचे भाडे दिलेले नव्हते. विक्रीच नव्हती. गल्लीतले कोणीच तिच्याकडून काही घेत नव्हते. पण एवढ्यावरून आत्या तिला हाकलून देईल असे वाटले नव्हते. तशी ती महिन्यातून वीस दिवस उपासपोटीच झोपायची. लुगडं दहा ठिकाणी शिवलेलं. घरं पडलेलं. एका खोलीच्या कोपऱ्यात ती झोपायची. पण तिथं दुकान मांडता येणं शक्य नव्हतं. तिला वाटलं, आत्याबाईंचे पाय धरावे, विनवणी करावी. पण आत्याबाईने जेवढ्या जोरात दरवाजा उघडला होता तेवढ्याच जोरात बंदही केला. चातुर्मास आला आणि पूर्वेकडचे वारे वाहू लागले, तशा तिच्या पाठीत भयंकर वेदना होऊ लागल्या. तिचे पाय कापायचे. ठोक बाजारातही तिची उधारी खूप वाढली होती. पण आता काय होणार ? ती त्राग्याने रडू लागली.

एवढ्यात काहीतरी आवाज आला म्हणून तिने गुडघ्यातून डोकं वर करून पाहिलं. मोका साधून मटकीने एक ताजं वाळूक उचललं आणि भुकेनं मरणाऱ्या माणसासारखं ती ते अधाशीपणाने वचावचा खाऊ लागलेली आहे. क्षणभर ती तिच्या फुगणाऱ्या आणि खपाटीला जाणाऱ्या पोटाकडे पाहत राहिली. मग तिला आठवलं की वाळूक चांगलं दहा पैशांचं आहे तशी ती उसळली. आणि सटासट तीनचार छड्या मारीत ती

म्हणाली, ''चोरटे ! कुतरडे ! तुज्या अंगात किडं पडतील !'' मटकीच्या हातातून वाळूक खाली पडलं पण ती नालीत पडलेल्या वाळकाचे तुकडे उचलून पळून गेली. रडली नाही की ओरडली नाही. कारण तिचं तोंड वाळकानं भरलेलं होतं. मिरवा घाबरून गोंधळून ही घटना पाहत होता. गुलकी त्याच्यावरही उखडली. तिने सटासट मिरवाला मारायला सुरवात केली. ''चल, हाकल इथनं, हरामजादा कुठला !''

वेदेनेने मिरवा कळवळला. ''आमचा पैसा दे मंग जातो.''

''थांब, पैसा देते.'' सट ! सट ! रडतरडत मिरवा ओट्याकडे पळाला.

निरमलच्या दुकानात स्तब्धता पसरली. सगळे चुपचाप इकडेच पाहत होते. मिरवा आला आणि त्याने मुन्नाकडे कुबडीबद्दल तक्रार केली. मुन्ना गप्प बसला. मग मेवाकडे वळून म्हणाला, ''मेवा, सांग त्याला !'' मेवाने आधी कांकूं केले पण मग मोठ्या मऊपणाने म्हणाला, ''मिरवा, तुला रोग झालाय् ना ! तर म्हणून आम्ही आता तुला शिवणार नाही. आमच्या बरोबर खेळायला घेणार नाही. तू तिकडं जाऊन बैस.''

''आमी काय लोगी हाव का मुन्ना ?''

मुन्नाला थोडी दया आली, ''होय. आम्हाला शिवू नकोस. लिंबोळ्या विकत घ्यायच्या असतील तर तिकडे जाऊन बैस. आम्ही दुरून फेकू तुझ्याकडे. समजलं ?'' मिरवाच्या ध्यानात आले. त्याने डोके हलवले आणि तो बाजूला जाऊन बसला. मेवाने लिंबोळी त्याच्याजवळ ठेवली आणि तो मार विसरून पिकलेली लिंबोळी सोलू लागला.

तेवढ्यात वरून घेघात्याचा आवाज आला, ''ए मुन्ना ! तुमी समदे उटा इथनं ! न्हायतर ह्ये पानी पडंल बगा वरनं.'' पोरांनी वर पाहिले. गच्चीवर घेघात्या कासोटा मारून पाण्यात छपछप करीत फिरत होती. वरच्या मोरीत काहीतरी तुंबले होते आणि पाणी साठले होते. घेघात्या उभी होती त्याच्या बरोबर खाली गुलकीचे दुकान होते. पोरं तिथून तशी लांब होती; पण गुलकीनं ऐकावं म्हणून पोरांना बोलली होती. गुलकी कण्हतच उठली. कुबडामुळे तिला वर बघताही येत नव्हते. तिने जमिनीकडे पाहतच वर असलेल्या घेघात्याला म्हटले, ''हिकडची नाली कशाला खोलतेस, तिकडची खोल ना !''

''तिकडची काय म्हनून खोलू ! तिकडं माजं स्वँपाकघर हाय का न्हाई !''

''हिकडं माजं सामान हाय ना !''

''आ ऽ हा ! हा !'' घेघात्या हात फिरवीत म्हणाली, ''रानीसायबाचं सामान हाय म्हनं ! भाडं द्यायला हिचं काळीज फाटतया आन् हिकडं जोर करतिया गामा पैलवानाचा ! सामान आसलं तर म्या काय करू ? नाली तर हिकडचीच खोलनार !''

''खोल बगू कशी खोलत्यास ती,'' अचानक गुलकी आवेगाने म्हणाली. आजवर तिचा असला आवाज कुणी ऐकला नव्हता— ''पाच म्हन्याचं धा रुपयं न्हाई दिलं, खरं हाय पर आमच्या घरच्या घागरी वसंताला कुनी इकाया दिल्या ? तू दिल्या. मागचा

दरवाजा तोडून कुनी जाळला ? तूच. आमी गरीब हाव. आमचा बाप वारला. समदे गल्लीवाले मिळून आमाला मारून टाका.''

''माझ्यावर आळ घालतेस ? अगं, कानामागून येऊन तिखट व्हतेस काय ?'' घेघात्या रागाने उभी राहून बोलू लागली.

पोरं मुकाट्याने उभी होती. ती थोडीशी घाबरलेली पण होती. कुबडीचं हे रूप त्यांनी कधी पाहिलेलं नव्हतं, त्याची कल्पनाही केली नव्हती.

''व्हय ! व्हय ! व्हय ! तू, ड्रायव्हरकाकानं, काकूनं समद्यांनी मिलून माजं घर लुटलं हाय. आता माजं दुकान बी वाहून जाऊ दे. मी बी बगून घीन. देव तारी त्येला कोन मारी !''

''घे ! घे ! घे ! तुजा द्येव हाय् तर घे !'' अन् घेघात्याने वेड्यासारखं पळत जाऊन नालीत अडकलेला कचरा काठीने ढोसला. सहा इंच जाडीची घाण पाण्याची धार धबाधबा तिच्या दुकानावर कोसळू लागली. आधी दोडके गटारीत पडले. मग मुळे, काकड्या, भाजी, आलं— सगळं इतस्ततः पसरलं. गुलकीने डोळे फाडून वेड्यासारखं हे पाहिलं आणि भिंतीवर डोकं आपटीत हृदयविदारक आवाजात किंचाळत रडू लागली, ''आरं माज्या बापा ! कुटं सोडून ग्येलास रं मला ? आगं, माजी माय ! जलमल्या जलमल्या मारून का न्हाई टाकलंस ? हे धरतीमाय, मला पोटात का घीनास गं !''

डोक्यावरचा पदर काढून केस पिंजारत, छाती बडवीत ती रडत होती आणि वरनं नऊ दिवस साठलेलं पाणी धबाधबा खाली पडत होतं.

पोरं मुकाट्यानं उभी होती. आतापर्यंत जे काही झालं होतं ते त्यांना कळण्यासारखं होतं, पण आज हे जे काही होत होतं ते त्यांच्या कळण्यापलीकडचं होतं. पण ती काहीच बोलली नाहीत. फक्त मटकी तिकडे गेली आणि गटारीत पडलेली एक मोठी हिरवीगार काकडी काढू लागली, तेव्हा मुन्नाने तिला धमकावले, ''खबरदार, काही चोरशील तर !'' मटकी मागे सरकली. कसल्या तरी अनपेक्षित भयाने, भावनेने वा शंकेने ती सगळीजण उभी राहिली. फक्त मिरवा एका बाजूला एकटाच मान खाली घालून उभा होता. पावसाची भुरभुर पुन्हा सुरू झाली होती आणि ती पोरं एक एक करीत आपापल्या घरी निघून गेली.

दुसऱ्या दिवशी ओटा रिकामा होता. दुकानाचे बांबू उपटून आत्याने ते गोठ्यात नेऊन उभे केले आणि त्यांच्यावर दोडक्याचा वेलही चढवला. त्या दिवशी पोरं आली पण ओट्यावर जायची त्यांची हिंमत झाली नाही. जणू काही तेथे कोणीतरी मेलं आहे. ओट्यावर एकदम शुकशुकाट पसरला आणि मग पाऊस असा काही लागून राहिला की पोरांना बाहेर पडणे कठीण झाले. चौथ्या किंवा पाचव्या दिवशी तर रात्री एवढा भयंकर पाऊस पडला आणि मेघगर्जनाही मोठी झाली की मुन्ना आपल्या खाटेवरून उठून आईच्या कुशीत शिरला. वीज चमकली म्हणजे खोली उजेडाने चमकू लागे. छतावर

थेंबांचा टपटप आवाज कमी झाला आणि वारे वाहू लागले. झाडांमधून वाऱ्याची सरसर ऐकू येऊ लागली. तेवढ्यात धड-धड-धड-धडाम ! असा भयंकर आवाज झाला. आईपण दचकली. पण उठली नाही. मुन्ना डोळे उघडून अंधारात पाहू लागला. गल्लीतले लोक काहीतरी बोलत आहेत असे अचानक ध्यानात आले. घेघात्याचा आवाज ऐकू आला— ''कुनाचं घर पडलं रे ?''

''गुलकीचं !'' —कुणीतरी लांबूनच उत्तर दिले.

''अरे बाप रे ! सापडली का खाली ?'' ''नाही, आज ती मेवाच्या आईकडे झोपायला गेलीय.''

मुन्ना निजलेला होता आणि अंधारात त्याच्यावरून हे सवालजबाब इकडून तिकडे आणि तिकडून इकडे येत-जात होते. तो पुन्हा घाबरला. आईजवळ सरकला आणि झोपता झोपता त्याला स्पष्टपणे ऐकू आले— कुबडी पुन्हा तशीच रडते आहे. गळा फाडून रडते आहे ! मुन्नाच्याच अंगणात बसून रडते आहे की काय कुणास ठाऊक. झोपेत तो स्वर कधी जवळून यायचा तर कधी दुरून. असं वाटत होतं की जणू काही कुबडी गल्लीतल्या प्रत्येकाच्या अंगणात जाऊन रडते आहे; पण मुन्नाशिवाय कोणीही ऐकत नाहीय.

दुसरीकडे मुळीच ध्यान उडून जाणार नाही अशी मनात घर करून राहणारी गोष्ट मुलांच्या बाबतीत नसते. गुलकी समोर होती तेव्हा तो एक विषय होता; पण तिचं दुकान गेलं, मग ती साबणवाल्या सत्तीच्या ओसरीवर झोपू लागली आणि चारदोन घरी मागून खाऊ लागली. यामुळे ह्या गल्लीत ती अलीकडे दिसतही नव्हती. मुलंही दुसरीकडे गुंतली. आता थंडीचे दिवस आले होते. पोरं सकाळच्या ऐवजी दुपारी गोळा होऊ लागली होती. गोळा झाल्यानंतर त्यांची मिरवणूक निघायची आणि जोरदार घोषणांनी गल्ली निनादून जायची. '''घेघात्याला मते द्या.'' काही दिवसांपूर्वी म्युनिसिपालिटीच्या निवडणुका झाल्या होत्या आणि त्यातूनच मुले ह्या घोषणा शिकली होती. तशा मुलांच्यातही कधी कधी दोन पार्ट्या व्हायच्या पण दोघांनाही घेघात्यापेक्षा चांगला उमेदवार सापडत नसे. त्यामुळे दोन्ही पार्ट्या गळा फाडून ओरडत घेघात्यालाच मते मागायच्या.

एके दिवशी घेघात्याच्या सहनशीलतेची मर्यादा संपली आणि ती नवनवीन शिव्यांनी अलंकृत असे आपले पहिले इलेक्शन स्पीच देण्यासाठी ओट्यावर अवतीर्ण झाली. तोच तिला पोस्टमन येत असलेला दिसला. ती चकित होऊन थांबली ! पोस्टमनच्या हातात एक पोस्टकार्ड होते आणि तो गुलकीला हुडकत होता. आत्याने पटकन पोस्टकार्ड घेतले आणि भरकन वाचून काढले. आश्चर्याने तिचे डोळे मोठे झाले आणि गुलकी सत्ती साबणवालीच्या ओसरीत राहते आहे असे पोस्टमनला सांगून ती मोठ्या त्वरेने ड्रायव्हरच्या बायकोकडे— निरमलच्या आईकडे— धावतच निघाली. बराच वेळ दोघींची सल्लामसलत चालू होती. अखेर आत्या बाहेर आली आणि तिने मेवाला

पाठवले. ''जा, गुलकीला म्हणावं, तुला बोलावलंय !''

पण मेवा परत आला तेव्हा त्यांच्याबरोबर गुलकी नाही तर सत्ती साबणवाली आली आणि नेहमीप्रमाणे तिच्या कमरेला काळ्या मुठीचा चाकू लटकत होता. ह्याच चाकूने ती दुकानदारांना साबणाच्या वड्या कापून देत असे. आल्याआल्याच कपाळाला आठ्या घालीत तिने घेघात्याकडे पाहिले आणि कठोर आवाजात म्हणाली, ''गुलकीला कशाला बोलावलंय ? तुजं धा रुपये भाडं बाकी व्हतं तर तू तिचा पंधरा रुपयाचा माल खराब केलास. आता काय काम हाय ?''

''अरे देवा ! देवा ! कसलं भाडं घिऊन बसलीस पोरी ! ये. मधी ये. ये मधी !'' घेघात्याच्या आवाजात अभूतपूर्व मार्दव होतं. सत्ती आत येताच तिने फटकन दार बंद करून घेतले. पोरांचे कुतूहल खूपच वाढले होते. आत्याच्या स्वयंपाकघराला एक जाळीची खिडकी होती. सगळी पोरं तिथं गेली आणि दोन्ही हात कानशिलावर ठेवून घंटी वाजणाऱ्या डबड्यातला सिनेमा पाहत असल्यासारखी उभी राहिली.

आत सत्तीचा आवाज गरजत होता, ''बोलावलं आसलं तर बोलावू दे. गुलकी काय म्हनून जाईल ? आता लई ध्यान आलं व्हय ! त्येच्या रखेलीला प्वार झालंय न्हवं, मंग आता गुलकीची याद आली. झाडलोट कराया, भाकरी बडवाया, पोराला सांबाळाया पायजे न्हवं ? आन ह्यो दादला गुलकीच्या डोळ्यादेखत त्या रखेलीबरुबर मजा मारनार !''

निरमलची आई म्हणाली, ''अगं पोरी, पण ती आपल्या माणसाबरोबर तर राहील ना ! त्याचं पत्र आलंय् तर मग गुलकीला जायला पाहिजे. आन् दादला तो दादला ! एक रखेल सोडून दोन दोन रखेली ठेवल्या म्हणून काय बाईनं त्याला सोडून द्यायचं ? राम ! राम !''

''न्हाय, सोडून न्हाय जानार तर काय लाथा खानार त्येच्या ?'' सत्ती म्हणाली.

''अगं पोरी !'' घेघात्या म्हणाली. ''द्येव हाय ना ? त्येनं मथुरानगरीमंदी कुब्जादासीला लाथ हानली तर तिचं कुबड सरळ होऊन गेलं. दादला म्हंजी द्येवच हाय पोरी ! तिला जाऊ दे !''

''व्हय व्हग, लई तिची काळजी वाहनारी आलीस गं. तिच्या नवऱ्याकडून तुमी लोक गुलकीचं घर फुकट लाटनार हैत, म्हाईत हाय मला.''

निरमलच्या आईचा चेहरा पांढरा पडला. पण घेघात्या काही कच्च्या गुरूची चेली नव्हती. ती दम देत म्हणाली, ''खबरदार, असलं काही हलकंसलकं बोलशील तर. तुजं शील काय हाय ते समद्यास्नी ठाव हाय ! त्यो मानिक नावाचा पोरगा...''

''जीभच हासडीन.'' सत्ती घसा फोडून ओरडली, ''आवाज तर काड भाईर,'' आणि तिचा हात चाकूकडे वळला...

''अगं ! अगं ! अगं !'' घेघात्या घाबरून दहा पावलं मागे सरकली— ''मंग

काय खून करनार हाईस का ? का मारून टाकनार हाईस ?''

—सत्ती आल्या पावली परत गेली.

तिसऱ्या दिवशी पोरांनी होरीबाबूच्या विहिरीवर जाऊन गांधीलमाशा पकडायचं ठरवलं. या दिवसात त्यांचं विष तीव्र नसतं. पोरं त्यांना पकडून त्यांची काळी नांगी तोडीत आणि मग दोराला बांधून त्यांना उडवीत फिरत. मेवा, निरमल आणि मुन्ना एक एक गांधीलमाशी उडवीत गल्लीत आले तेव्हा घेघात्याच्या ओट्यावर एका पत्र्याच्या खुर्चीत एक माणूस बसलेला त्यांना दिसला. कानावर लांबलांब केस, पिचपिचे डोळे, मिशा आणि तेल लावून चपचपीत झालेले केस. धोतर, सदरा आणि जुने-पुराणे बूट. मटकी हात पसरीत म्हणते आहे, ''एक डबल द्या ना ! अवो, द्या ना !'' मुन्ना आलेला पाहताच टाळ्या वाजवीत ती म्हणू लागली, ''गुलकीचा नवरा आला हाय. ए मुन्नाबाबू, हा कुबडीचा नवरा हाय !'' मग त्याच्याकडे वळून ''एक डबल द्या ना !'' तिन्ही पोरं उत्सुकतेनं थांबली. तेवढ्यात निरमलची आई एका ग्लासात चहा घेऊन आली आणि त्याला देता देता निरमलच्या हातात गांधीलमाशी पाहून तिला रागावू लागली. मग गांधीलमाशीला सोडून दिले आणि निरमलला जवळ बोलावीत म्हणाली, ''ही आमची निरमल आहे. ए निरमल, मेव्हणे आहेत तुझे. नमस्कार कर ! अरे, गुलकी आमच्या जातीबितीची नसली म्हणून काय झालं, जशी निरमल तशीच गुलकी. अरे, निरमलच्या बाबांची आणि गुलकीच्या बापाची जिवाभावाची मैत्री होती. आता हे घर तेवढं राहिलंय त्यांची आठवण म्हणून. दुसरं काय !'' खोल श्वास घेत निरमलची आई म्हणाली.

''अगं मंग त्ये काय नको म्हनत्यात का !'' आत्या आली होती. ''अगं, शंभर रुपयं तर तुमी दिल्यालंच हैत. आनी तीनशे रुपयं द्या आन करून घ्या आपल्या नावावर !''

''पाचश्याला कमी घेणार न्हाई !'' त्या माणसाने तोंड उघडले. एवढे एक वाक्य तो बोलला आणि तोंड पुन्हा बंद झाले.

''भले ! भले ! आरं पोरा, तू जावई हैस, पांचशे म्हनलास तर निरमलची माय काय न्हाई म्हननार न्हाई !''

अचानक तो माणूस उठून उभा राहिला. पुढे सत्ती आणि तिच्या मामोमाग गुलकी येत होती. सत्ती ओट्याच्या खाली उभी राहिली. पोरं बाजूला सरकली. गुलकीनं मान वर केली. लगेच डोक्यावर पदर घेतला आणि कपाळपर्यंत पुढे ओढला. सत्तीने एकदोन क्षण त्याच्याकडे नीट पाहिले आणि मग गरजत म्हणाली, ''हाच तो कसाई ! गुलकी, चल फुडं ये आन हान दोन थापडी त्येच्या थोबाडीत ! खरबदार, कुनी काई बोलाल तर !''

आत्या चटकन उंबरठ्याआड गेली. निरमलच्या आईची तर दातखीळच बसली आणि तो माणूस गडबडून मागे सरकू लागला.

''गुलकी, फुडं का होत न्हाईस ? लई आलाय घिऊन जानार !''

गुलकी पुढे आली—सगळे स्तब्ध झाले होते—ती पायऱ्या चढू लागली-त्या माणसाच्या चेहऱ्यावरचा रंग उडाला. चढता चढता गुलकी थांबली. तिने सत्तीकडे पाहिले, थबकली, अचानक पुढे झेपावली आणि त्या माणसाच्या पायावर पडून ओक्साबोक्शी रडू लागली—''आरं माज्या घेवा, मला का सोडून ग्येला ! तुज्याबिगर मला कुटला सरग आन कुटला परलोक ! आरं म्या मेले तर कोन पानी घालनार ? ''

सत्तीचा चेहरा काळाठिक्कर पडला. तिने अत्यंत तिरस्काराने गुलकीकडे पाहिले आणि रागाने आवंढा गिळीत म्हटले, ''कुत्तरडी !'' आणि लगेच निघून गेली. निरमलची आई आणि आत्या गुलकीच्या डोक्यावरून हात फिरवीत म्हणत होत्या, ''रडू नगं पोरी ! रडू नगं ! सीतामाईला पन वनवास भोगावा लागला न्हवं. उठ बाई, गुलकी उठ ! लुगडं बदल. वेणीफणी कर. धन्याफुडं आसं आलं तर अपशकुन व्हतो. चल !''

गुलकी अश्रू पुसत पुसत निरमलच्या आईच्या घरी गेली. पोरं पाठोपाठ जाऊ लागली तेव्हा आत्या ओरडली, ''ए, चला हिकडं या. तिकडं काय लाडू वाटनार हैत का ?''

दुसऱ्या दिवशी निरमलचे बाबा (ड्रायव्हरसाहेब) गुलकी आणि मेव्हणे कचेरीतच होते. संध्याकाळी परत आले तेव्हा निरमलच्या आईने विचारले, ''कागद पक्का केला ना ?''

''होय गं, होय. ऑफिसरापुढेच लिहून घेतला ना.'' मग जरा जवळ येऊन कुजबुजत म्हणाले, ''मातीमोलानं घर मिळालंय. आता उद्या दोघांची रवानगी करा.''

''अहो, पण आधी शंभर रुपये द्या ! आत्याबाईचा वाटा द्यायचाय ना !'' निरमलची आई उदासपणे म्हणाली, ''मोठी खट आहे. म्हातारी गाडून ठेवतेय सगळं. मेल्यावर साप होईल.''

सकाळी निरमलच्या आईच्या घरी घर खरेदी केल्याबद्दल कथा होती. शंख, पूजेची घंटा, केळीची पानं, खिरापत, पंचामृत वगैरे तयारी पाहत मुन्नाशिवाय सगळी पोरं गोळा झाली होती. निरमलची आई आणि बाबा पाटावर बसले होते. गुलकीने पिवळे लुगडे नेसले होते आणि ती डोक्यावरून घुंघट घेऊन सुपारी कातरीत होती. आणि पोरं सारखी डोकावून पाहत होती. मेवा तिथं गेला आणि म्हणाला, ''ए गुलकी, ए गुलकी, मेव्हण्याबरुबर जाणार का ?''

कुबडी लाजून म्हणाली, ''चल हट ! थट्टा करतुयास व्हय !'' असे लाजून हसणे कोणत्याही तरुणीच्या चेहऱ्यावर सुंदर लालिमा पसरवणारे ठरले असते; पण तिच्या सुरकुत्यांनी भरलेल्या बेडौल आणि नीरस चेहऱ्यावर विचित्रपणे बीभत्स दिसू लागले. तिचे काळे वाळलेले ओठ आकुंचित झाले, डोळ्यांचे कोपरे पिचपिचे झाले आणि अत्यंत वाईट प्रकारे तिने पदराने डोके झाकून घेतले. पाठ सरळ करून कुबड

लपवण्याचा जणू काही ती प्रयत्न करीत होती. मेवा जवळच जाऊन बसला.

कुबडीने आधी इकडेतिकडे पाहिले आणि मग कुजबुजत मेवाला म्हणाली, "काय रे ! मेव्हणं कसं काय वाटलं तुला ?" गोंधळून जाऊन किंवा संकोचामुळे मेवाने काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा जणू स्वत:लाच समजावीत गुलकी म्हणाली, "कसं का असेनात, आपलंच मानूस हाय ! येळवखताला दुसरं कोनी कामाला येनार हाय का ? बाईमान्साला दाबातच ठेवाया होवं." मग जरा वेळ गप्प बसून म्हणाली, "मेवाभैय्या, सत्ती माज्यावर नाराज झालीया. सख्खी बहीण करनार न्हाई त्ये सत्तीनं माज्यासाठी केलं. ही काकी आन आत्या समदी मतलबाची मान्सं हैत. म्या काय वळकत न्हाई का ? पर बाबा, आता तूच सांग. सत्ती म्हनती म्हून काय म्या आपल्या धन्याला सोडू व्हय ? त्ये काय व्हनार न्हाई." तेवढ्यात कुणाचे तरी मूल गुडघ्यावर रांगत रांगत मेवाजवळ येऊन बसले. गुलकी क्षणभर त्याच्याकडे पाहत राहिली. मग म्हणाली, "धन्याचा अपराध केला तवा देवानं माजं पोरं न्हेलं. आता देव मला माफ करील." मग काही क्षण गप्प बसली. "माफ केलं तर दुसरं पोर दील ?" "का न्हाई देनार ? तुज्या मेव्हन्याला देव उदंड औक्ष देवो. माजाच जलम खोटा. पुन्ना पोर व्हईल तवा सवतीचं राज्य न्हाई चालायचं !"

तेवढ्यात आपला नवरा दारापाशी आत्याशी काहीतरी बोलत असलेला गुलकीने पाहिला. लगेच गुलकीने डोक्यावरून पदर घेतला आणि लाजून तिकडे पाठ फिरवली. म्हणाली, "देवा ! देवा ! किती खराब झाली आहे तब्बेत. माझ्याबिगर खान्यापिन्याकडं कोन ध्यान देनार ? अरे, सवत आपल्या मतलबाला तेवढी खरी. जा मेवाभैय्या, आपल्या मेव्हण्यासाठी पानाचे दोन विडे घेऊन ये !" तिच्या चेहऱ्यावर पुन्हा मघासारखीच बीभत्स लाज पसरली— "कुनी दिलं म्हनून सांगशील तर शपथ हाय माजी."

मेवा पान घेऊन गेला पण त्याच्याकडे कुणीच लक्ष दिले नाही. तो माणूस आत्याला म्हणत होता, "हिला घेऊन तर चाललोय खरं, पन सांगून ठिवतो, आन् तुमीबी समजावून सांगा— रहायचं असलं तर दासी म्हनून ऱ्हावं लागंल. पोर ना बाळ, न कुठल्या कामाची. पन माज्या बायकूची सेवा करील. तिचं पोर सांबाळील. झाडझूड करील तर पोटाला दोन भाकऱ्या मिळतील. पर तिच्याशी जर का भांडानकांडान केलं तर मंग काय खरं न्हाई. माजा हात लई जोरदार हाय. एक डाव कुबड निघालं आता जीवंच जाईल."

"व्हय रे राजा ! व्हय !" आत्या म्हणाली आणि मेवाच्या हातातली पानं घेऊन तिने ती आपल्या तोंडात कोंबली.

तीन वाजण्याच्या सुमारास निरमलच्या आईने मेवाला टांगा आणायला पाठवले. घटनांच्या भाऊगर्दीमुळे तिचा मूड बिघडला होता त्यामुळे सगळी तयारी एकटी गुलकीच

करीत होती. मटकी एका कोपऱ्यात उभी होती. मिरवा आणि झिप्री बाहेर मुकाट बसली होती. निरमलच्या आईने आत्याला बोलावून विचारले की ''पाठवणीसाठी कायकाय करावं लागतं ?''

तशी आत्या तोंड वाकडं करीत म्हणाली, ''अगं, आपल्या जातीची का पातीची ? एका तांब्यात पानी भरून आने-दोन आने ओवाळून टाक गोरगरिबाला. आनखी काय !'' असं म्हणून आत्या आपल्या संध्याकाळच्या स्वयंपाकाला लागली.

टांगा येताच झिप्री वेड्यासारखी इकडून तिकडे धावू लागली. गुलकी कायमची निघून चालली आहे हे तिला कसं कळले कोण जाणे. मेवाने आपल्या लहान हातांनी मोठी गाठोडी उचलून ठेवली. मटकी आणि मिरवा मुकाट्यानं टांग्याजवळ येऊन उभी राहिली. मान खाली घालून दगडासारखी मुकाट गुलकी निघाली. तिच्यापुढे हातात पाण्याचा तांब्या घेऊन निरमल चालत होती. तो माणूस टांग्यात बसला. ''चला आता लवकर,'' जड गळ्याने तो म्हणाला.

गुलकी पुढे झाली, पुन्हा थांबली, कमरेच्या कशातून दोन अर्ध्या आण्याची नाणी काढली— ''घे मिरवा, घे गं मटके !''

नेहमी हात पुढे करणाऱ्या मटकीला यावेळी कसला संकोच वाटला कोण जाणे. हात खाली करीत ती भिंतीला खेटून उभी राहिली आणि मान हलवीत म्हणाली, ''नगं !'' ''असं नगं करूस, घे गं पोरी !'' गुलकी प्रेमाने म्हणाली.

मिरवा-मटकी दोघांनी पैसे घेतले आणि मिरवा म्हणाला, ''नमश्ते गुलकी ! ए बाबा, नमश्ते !''

''आता काय गाडी चुकवायची का ?'' तो पुन्हा जड आवाजात म्हणाला.

''थांब राजा ! जावयाची पाठवणी कुठं अशी होती होय ?'' अचानक एक अगदी अपरिचित आणि जाड आवाज ऐकू आला. पोरांनी आश्चर्याने पाहिले. मुन्नाची आई येत होती. ''मी तर मुन्नाची वाट बघत होते. तो शाळेतून आला म्हणजे त्याला खायला घालून घेऊन येणार होते, पण टांगा आलेला दिसला. म्हटलं आता तू तर चाललेली दिसते. अहो ! निरमलच्या आई ! पोरीची पाठवणी कुठं अशी करतात का ? जा, जरा लवकर गंध उगाळा, तांदूळ आणा आणि कुंकूपण घेऊन ये, बेटा निरमल ! तुम्ही उतरा हो जरा वेळ टांग्यातून !''

निरमलच्या आईचा चेहरा काळवंडला. म्हणाली, ''आमच्याकडून झालं तितकं केलं. आपली श्रीमंती थोडीच दाखवायचीय कुणाला !''

''तसं नाही अक्का ! तुम्ही तर केलं पण गल्लीतली पोरगी तर सगळ्या गल्लीचीच असते ना. आमचंही काही कर्तव्य आहे. अहो, आईबाप नसले म्हणून काय झालं ? गल्ली तर आहे. ये पोरी !'' असं म्हणून तिने कुंकू लावून पदराखाली आणलेले काही कपडे आणि एक नारळ तिच्या ओटीत घालून तिला जवळ घेतले. इतका वेळ

दगडासारखी मुकाट बसलेली गुलकी अचानक भरून आली. आपण माहेराहून चाललो आहोत असे तिला प्रथमच वाटले. माहेराहून... आपल्या आईला सोडून... लहानलहान भावंडांना सोडून... आणि ती आपल्या कर्कश फाटक्या गळ्याने विचित्र सुरात रडू लागली.

''अगं गप्प बस आता ! तो बघ तुझा भाऊपण आला.'' ती म्हणाली. मुन्ना दफ्तर सांभाळीत शाळेतून येत होता. आपल्या आईच्या खांद्यावर डोकं ठेवून रडत असलेली कुबडी पाहून तो एकदम हतप्रभच झाला, ''ये पोरा, आज गुलकी चालली आहे नं ! तुझी ताई आहे नं ! थोरली बहीण आहे. चल, पाया पड तिच्या ! ये इकडे !'' आई म्हणाली. मुन्ना... आणि कुबडीच्या पाया पडणार ? का ? का ? पण आई म्हणते आहे ना ! एका क्षणात त्याच्या मनात जणू काही एक चक्र फिरून गेले आणि तो गुलकीकडे वळला. गुलकीने धावत जाऊन त्याला जवळ घेतले आणि आक्रोशात म्हणाली, ''अरे, माझ्या धाकल्या भावा ! म्या आता चालले रे राजा ! आता कुनासंग भांडनार रे राजा ? आरं माझ्या भावा, कुनासंग भांडनार ?'' आपल्या लहानशा छातीत एक मोठा अश्रू गोळा होतो आहे आणि तो आता टपकणार असे मुन्नाला वाटू लागले. तेवढ्यात गुलकीच्या नवऱ्याने पुन्हा हाक मारली आणि गुलकी स्फुंदत रडत मुन्नाच्या आईच्या आधाराने टांग्यात बसली. टप टप करीत टांगा निघाला. मुन्नाची आई परत फिरली. तेवढ्यात आत्याने डिवचले, ''पाठवनीचं एकाधं गानं बी होऊन जाऊ द्या ताई ! गुलकी नवरी सासरला चालली न्हवं !'' मुन्नाच्या आईने काहीच उत्तर केले नाही. मुन्नाला म्हणाली, ''लवकर घरी ये बेटा, खायला काढून ठेवलंय.''

पण पाइपावर पाय सोडून बसलेल्या वेड्या मिरवाच्या डोक्यात काय आले कोण जाणे, तो खरोखरच गळा फाडून गाऊ लागला, ''*बेना डाले दुपट्टे का पल्ला, मुहल्ले से चली गयी राम !*'' त्या गल्लीत प्रत्येक मुलीच्या पाठवणीच्या वेळी हे गाणं गायलं जात असे ! आत्याने दटावले, पण तो गप्प बसला नाही. उलट मटकी म्हणाली, ''का न्हाई गानं म्हनायचं ? गुलकीनं पैशा दिला हाय नं !'' आणि ती पण सुरात सूर मिसळून म्हणू लागली ''*बन्नो तली गयी लाम ! बन्नो तली गयी लाम !* (नवरी निघून गेली, रामा !)

मुन्ना मुकाटपणे उभा होता. मटकी घाबरत घाबरत आली—''मुन्नाबाबू ! कुबडीनं ढब्बू पैसा दिले, ते घेऊ ना ?''

''घे,'' मोठ्या कष्टाने मुन्ना म्हणाला आणि त्याच्या डोळ्यात दोन मोठे अश्रू जमा झाले. त्या आसवांच्या झिळमिळत्या पडद्यातून मुन्नाने जात असलेल्या टांग्याकडे पाहिले. गुलकी अश्रू पुसत, पदर बाजूला सारीत वळून वळून पाहत होती. एका वळणावर एक गचका खाऊन टांगा वळला आणि मग दिसेनासा झाला. फक्त झिप्री रस्त्यापर्यंत टांग्यासोबत गेली आणि मग परत फिरली.

# आंधळा कंदील

**अमृत राय**

गल्लीच्या कोपऱ्यावर मी उभा आहे. मान खाली घातलेली, कमरेत वाकलेला. उन्हाचं तर नावच सोडा, या भागात उजेडही फारसा पडत नाही.

रोज संध्याकाळी एक माणूस छोटीशी शिडी घेऊन येतो आणि दिवाबत्ती करून जातो. लोकांना आपला रस्ता दिसावा म्हणून. मला वाटतं, लोकांना रस्ता सवयीनंच सापडत असावा, नाहीतर माझ्याजवळ एवढा प्रकाश आहेच कुठे ! हो, पण या आंधळ्या डोळ्याच्या फिकट उजेडामुळे मला माझी गल्ली मात्र थोडीफार दिसू शकते. मला एवढे पुरेसे आहे !

असं म्हणतात की पूर्वी हा कच्चा रस्ता होता. आता इथून तिथपर्यंत त्यात लहानमोठे दगड बसवलेले आहेत. पुढे हा रस्ता संपतोच. कितीतरी कुत्री भुंकत असतात ! एक माणूस सायकलवरून वेगानं त्यांच्यामधून जाऊ पाहतो आहे. दोनतीन कुत्री त्याच्या पायावर झेपावतात. तो घाबरून खाली पडतो आणि झपाट्यानं एक दगड उचलतो. त्याचे पाय थरथरताहेत. कुत्री आणखीच जोरानं भुंकू लागली आहेत. चोर-शिपाई खेळत असलेलं पोरांचं एक टोळकं आपला खेळ थांबवून ह्या नव्या गमतीचा आनंद घेत आहे. मिश्राजींच्याकडे सीतापुराहून किंवा रामपुराहून कोणीतरी मोठे कथेकरी आलेले आहेत. रोज रात्री बाराएक वाजेपर्यंत रामायणाची कथा चाललेली असते. गर्दी गोळा होऊ लागलेली आहे. बैठक अर्ध्या रस्त्यापर्यंत मांडलेली आहे. त्यावर एक मळकट बिछायत अंथरलेली आहे. हार्मोनियमही आणून ठेवलेला आहे. एकदोन मोगऱ्याचे हारही दिसताहेत. गॅसची एक हंडी पण आलेली आहे. गल्लीत लखलखाट पसरलेला आहे. जणू काही दिवसच उगवलाय. आणखी किती दिवस ही कथा चालणार आहे कुणास ठाऊक. बऱ्याचदा गल्लीतली कुत्रीही हार्मोनियमच्या सुरात सूर मिसळून... तेव्हा त्यांना काठीचा प्रसाद मिळतो. एक माणूस जाडजूड दंडुका घेऊन पहारा देतो. ठीक आहे. ही कुत्री त्याच लायकीची आहेत. पाहावं तेव्हा आपली येऊन मला घाण करीत असतात. एके दिवशी त्या बिचाऱ्या चंदूला चावली. चंदूला आई नाही. बापानं ती मेल्यावर पंधराच दिवसांनंतर दुसरं लग्न केलं. चंदूची अवस्था आता

या कुत्र्यांसारखीच आहे. कुणाच्याही दाराशी पडलेला असतो. जिथं कुठं जे काही खायला मिळेल ते खात असतो. त्याला कुठेतरी एक फाटकी जुनीपुराणी पोथी सापडली आहे. दिवसा चंदू बहुधा काम शोधण्यासाठी बाहेर पडतो. दुसऱ्या आळीत जाऊन भीकही मागत असेल कदाचित ! आणि रात्री आपली पोथी घेऊन येतो आणि मला खेटून बसतो. मळक्या प्रकाशाच्या घेऱ्यात चारसहा गाईम्हशीही बसलेल्या असतात. मला हीपण रामायण मंडळी असल्यासारखीच दिसतात.

एके दिवशी चंदू असाच बसला असताना त्याचा बाप आला. बारीक केस, लालभडक डोळे पक्का कसाई दिसत होता. दारू प्यालेला होता. आल्याआल्या त्याने चंदूला असा काही रपाटा हाणला की त्याच्या तोंडातून रक्तच बाहेर पडले. सिंहासारखा ओरडत तो म्हणाला— ''का बे साल्या, हरामखोराची औलाद— तुला आपल्या घरात जागा नाही होय— इथं कश्याला मरायला आलास ? लोकांपुढं माझं नाक कापतोस होय ? घरी चल, मग दाखवतो तुला; तुझे तुकडे तुकडे...''

हे बोलणं म्हणजे नुसतं बोलणं नाही हे कदाचित चंदूला माहीत असावं. तो पळून गेला. बाप त्याच्या पाठीमागे धावला. बापाच्या पाठीमागे कुत्री धावू लागली. एकाने त्याचे धोतर पकडले. बापमहाशय तोंडावर आपटले. धोतर फाटले ते वेगळेच.

पुढे चंदू कित्येक महिने दिसला नाही.

चंदूची नवी आई उफाड्याची आणि सुंदर आहे. आपल्या नवऱ्यापेक्षा किमान पंचवीस वर्षांनी तरी लहान असेल. दोघांना बरोबर जात असताना मी कितीतरी वेळा पाहिले आहे. मस्त हत्तिणीसारखी चालत होती. चंदूच्या म्हाताऱ्या बापाला ती काय जुमानते ! छाती पुढे काढून चालत असला म्हणून काय झालं ? चंदूचा बाप दारूडा आहे हे खरं; पण त्यामुळे काय म्हातारा माणूस तरुण होईल का ? उगीचच तिला दमबाजी करीत असतो. एके दिवशी रागाने बराच भडकला होता. दोघंजणं कुठून परत येत होती कुणास ठाऊक ! पाहिलं असेल काहीतरी वेडंवाकडं. म्हणाला— ''हे बघ चंपे, तू मला अजून वळखलं नाहीस. मी तुझी मुंडी छाटून टाकीन !''

चंपाही ताठपणाने म्हणाली— ''तोंड सांभाळून बोल. आलाय मोठा मुंडी छाटणारा ! तुला छाटायला मुंडी काय फुकटची आली नाही !''

चंदूचा बाप संतापला. दातओठ खात म्हणाला— ''मला रागाला आणू नकोस चंपे, टांग पकडून उभा चिरीन !''

चंपा मोठ्याने हसली. असलं हसणं मी पूर्वी कधी ऐकलं नव्हतं. माझ्या अंगावर शहारे आले. मग चंपाचा चेहरा हडळी-डाकिणीसारखा झाला. लुगडं मांड्यांपर्यंत वर ओढत ती ओरडली— ''घे, धर टांग आणि चीर उभा, आपल्या बापाची खरी औलाद असशील तर !''

चंदूच्या बापाचा चेहरा पांढरा पडला. तेवढ्या एका क्षणात त्याच्या चेहऱ्यावर अनेक

रंग आले आणि गेले. काहीही करायची हिम्मत त्याला झाली नाही ! कशी होणार ? फार भयंकर बाई होती ती ! एकाहून एक गुंड माणसांशी तिची लफडी होती. दोघांना तर मी चंपाबरोबर पाहिलंही होतं. चांगले तगडे जवान होते दोघेही. चंदूच्या बापाला पाट्यावर वाटून भांगेसारखं पिऊन टाकतील असे.

चंपा पुन्हा आणखीच जोरात हसली... ''बास, येवढ्या ताकदीवरच टांग चिरायला निघाला होता काय ? नामर्द...!''

चंदूच्या बापाने उजवा हात फिरवीत एक जोरदार थप्पड चंपाला मारली. चंपा खाली पडता पडता सावरली आणि जंगली मांजरीसारखी उडी मारून तिने आपल्या नवऱ्याचा गळा पकडला आणि तो स्वत:ला सावरणार त्याच्या आतच चंपाचे दात त्याच्या डाव्या खांद्याच्या मासात रुतले. त्याचा सगळा जोर, सगळा राग खलास झाला. शरीर ढिले पडले. दातांची पकड घट्टच होत चालली होती. सोडवणं अवघडच होतं. चंपा त्याच्या पाठीमागे होती.

शेवटी चंपाच जिंकली. आता ती पुढे पुढे चालत होती आणि चंदूचा बाप शेपूट घालून तिच्या मागोमाग जात होता. चंपाच्या भुवया अजूनही वटारलेल्याच होत्या. फुस्कारत म्हणाली— ''आज तू माझ्या अंगावर हात टाकलास—तुझी ही हिम्मत ! चामडं सोलून काढलं नाही तर मला विचार...!''

चंदूचा बाप काय बोलणार ? नांगी ठेचली गेली होती. नीतीच्या-धर्माच्या गोष्टी बोलू लागला. म्हणाला—''चंपे, हाच का तुझा धर्म ? तुझ्यासाठी मी चंदू गमावला...''

चिडून म्हणाली— ''त्याला घराबाहेर काढ असं मी कधी म्हणाले ?''

''तूच तर त्याच्या जिवावर उठली होतीस.''

''तुझे डोळे फुटले होते का ?''

मग ते पुढे गेले आणि मला काही ऐकू आले नाही. घरी गेल्यावर त्यांचं पुन्हा नक्की भांडण झालं असेल. बोलायच्या गोष्टी ! चंपा एकटी पुरेशी आहे त्याचा समाचार घ्यायला. हे महाराज बोलतच राहतील आणि एके दिवशी चंपा खरोखरच कोयत्यानं त्याचं मुंडकं छाटून टाकील.

चंदू मेला-बिला का काय झालं त्याचा काही पत्ता नाही. महिन्यावर महिने निघून गेले. सकीनाची आई वारली. रावबहादूर हिरालाल यांचा पोपट मेला. शंभूच्या घरात कोणीतरी मेलेलं मांजर आणून टाकलं. कामताच्या घरात चोर घुसले आणि गडबडीत आपलीच थैली विसरून गेले. त्यात आणखी कुणाच्या तरी घरी चोरलेले नऊशे रुपये होते. राम संजीवनची पोरगी कोण्या दूधवाल्याबरोबर पळून गेली. नव्वद वर्षांच्या अफूबाज नन्हेमियांना साप चावला आणि ते जागीच मरण पावले. कुत्र्यांना पळवून लावताना हेडक्लार्क मथुराबाबूंची छत्री मोडली. बिचारे कसेबसे घरी परत आले आणि तीन महिने बिछान्यावरून उठू शकले नाहीत.

सगळे काही झाले. मी पाहिले. मी ऐकले. आणि तीसही दिवस, बारा महिने हिवाळा-उन्हाळा-पावसाळा असाच उभा राहिलो. हो, माझी मान म्हातारपणामुळे जरा जास्त वाकली हे खरं आहे. असं वाटतंय की वरपासून खालपर्यंत जणू गंज चढला असावा.

एका दिवशीची गोष्ट आहे. रात्रीचे अकरा वाजले असावेत. बऱ्याच दिवसांपासून पाऊस लागून राहिला होता. त्या वेळीही पावसाची रिपरिप चालू होती. मी चंदूला माझ्याजवळून जात असलेले पाहिले. चंदूने माझ्याकडे ढुंकूनही पाहिले नाही. जशी काही ओळखदेख नाही. आपल्या साथीदाराबरोबर बोलत चालला होता. त्याला ओळखायला मला थोडा वेळच लागला; पण जेव्हा मी त्याला ओळखले तेव्हा माझ्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. तो रावबहादूर हिरालाल यांचा मुलगा सुनील होता. सुनील आणि चंदू बरोबर कसे ? रावबहादूर हिरालाल यांची उंच हवेली म्हणजे या गल्लीची शान. ही गल्ली त्यांच्या नावानेच ओळखली जाते. फार श्रीमंत माणूस आहे. सरकार पण त्यांना खूप मान देते. रोज कुणी ना कुणी इंग्रज अधिकारी बग्गीत बसून त्यांच्याकडे भोजन करायला येतो. भेटी पाठवण्यात रावसाहेब कधी कसूर करीत नसत. इंग्रज मोठा दिलदार माणूस असतो. ज्याला आपलं म्हणतो त्याला आपलं बनावतो. जिल्ह्यात कुठेही, कुठल्याही वस्तूचा ठेका द्यायचा असो, त्याच्यावर पहिला हक्क रावबहादूर हिरालाल यांचा. त्यांनी तो सोडला तरच दुसऱ्याला मिळणार. म्हणून तर घरात लक्ष्मी पाणी भरते आहे. त्यांचा मुलगा सुनील. पोट भरायची मारामार असलेल्या चंदूची आणि त्याची कसली मैत्री ? पण त्यांची खूप दोस्ती आहे असे दिसतेय. अगदी रंगात येऊन बोलत चालले होते दोघेजण.

नंतर अनेक वेळा मी त्या दोघांना एकत्र पाहिले. चंदू आपल्या घरी राहत नाही. मग इथे काय करायला आला आहे ? काहीतरी कामधंद्याला लागलाय असं वाटतं. शरीरही आता पहिल्यासारखं चिपाड नाही. थोडा थोडा आपल्या बापासारखा दिसू लागलाय. एके दिवशी मी त्याच्या हातात एक काळी चमकदार वस्तू पाहिली. पिस्तूल असावं. आपल्या बापाला तर मारायला निघाला नाही ? पण बापाला मारून काय करणार ? तसे तर बापलेक दोघंही एकमेकाला मेल्यासारखे आहेत. कुणाशी काही लफडे असेल तर माहीत नाही. आशुकमाशुकांच्या भानगडी सरळ नसतात.

गल्लीत सध्या बरीच धामधूम चाललेली असते. दिवस नाही, रात्र नाही, सारखा गोंधळ चाललेला असतो. आजूबाजूच्या गल्ल्यांतून आणि आणखी कुठून कुठून लोक गोळा होतात. बायका, पुरुष झेंडा घेऊन निघतात सगळेजण. दोन-दोनशे, चार-चारशे. मोठ्याने ओरडत असतात. गळा कसा फाटत नाही यांचा ! नेहमीच हे चालू. एके दिवशी एक मोठी होळी पेटली. मला वाटलं कुठं आग तर नाही ना लागली. या मोठमोठ्या ज्वाळा दिसत होत्या. नंतर समजलं की ती स्वराज्यवाल्यांची भानगड होती

म्हणून. सगळ्यांच्या घरातले परदेशी कपडे गोळा करून त्यांना आग लावली होती. रावबहादूरसाहेबांच्या मुलींनीही त्यांचे कपडे दिले. त्यांनी असे करायला नको होते. निदान बापाचा तरी विचार करायचा. गोऱ्यासाहेबांशी त्यांची एवढी प्रेमाची दोस्ती होती. ते नाराज झाले तर मग सोन्याची बरसात कोठून होईल ? मला तर सगळे वेडे झाल्यासारखे दिसतात. ह्या स्वराज्यवाल्यांनी चांगलाच मंत्र टाकलाय ! चंदू पण बहुतेक स्वराज्यवाला दिसतो. एरव्हीच तो फटिंग आहे. पण सुनील ?

मी ज्या गोष्टीला भीत होतो तीच झाली— रावबहादूरसाहेबांनी सुनीलला घराबाहेर काढले. बिचारा आता कुठे जाईल कोणास ठाऊक ? पण ह्याचा विचार आधीच करायला हवा होता. त्याचा बाप रुपयाच्या तीन अधेल्या वटवतो. खूप नाक घासून ही माया जमवलीय. या बाबतीत कोणी त्याच्या नात्याचा नाही. न बाप न पोरगा. तो फक्त स्वत:च्या रुपयांचा नातेवाईक आहे.

त्या दिवशीची गोष्ट. इतर दिवसांपेक्षा त्या दिवशी जरा जास्तच गडबड ऐकू येत होती. कोण काय बोलतंय कळत नव्हतं. सगळ्या शहरातले लोक इथेच गोळा झाले आहेत की काय असं वाटत होतं. मोठमोठ्याने घोषणा दिल्या जात होत्या. घोड्यांच्या टापा ऐकू येत होत्या. त्या गोंधळातही एक प्रकारचा सुन्नाटपणा होता—माझ्या कानात वाजत असलेला मी ऐकत होतो. त्या गर्दीपासून बाजूला झालेली दोन माणसं मला खेटून उभी होती आणि भराभर बोलत होती. चंदू म्हणाला— ''मी एकादोघाला तरी संपवल्याशिवाय राहणार नाही.''

सुनीलने त्याला समजावले, ''नाही, असं करू नकोस. निष्कारण शेपन्नास माणसं मारली जातील. तुझ्या एका टिकटिक पिस्तुलानं काय होणार ? इथून तिथपर्यंत बंदुकाच बंदुका चमकत आहेत, त्या तुला दिसत नाहीत का ? संगिनी पण लावल्या आहेत मारेकऱ्यांनी. आज नक्कीच काहीतरी घडणार.''

चंदू म्हणाला— ''तू असं काय बोलतो आहेस सुनील ! अशा वेळेला या सगळ्या गोष्टींचा विचार नसतो करायचा.''

ढग गडगडल्यासारखे आवाज जवळ येत होते. वारा पडला होता. मला गुदमरायला झाले. अजून दिवस होता आणि मला माझे आंधळे डोळे अजून लाभले नव्हते म्हणून तर आणखीच. दोन्ही फौजा बहुतेक आता एकमेकीसमोर उभ्या ठाकल्या होत्या. चंदू म्हणाला— ''चल, आपणही जाऊ या !'' आणि जाता जाता किंचाळल्यासारखा म्हणाला— ''सुनील, सुनील ती पहा, कमळी पण आली आहे.''

चकित होऊन सुनील म्हणाला— ''कमळी ! कुठे ? कुठे ?''

चंदू म्हणाला, ''ती काय समोर ! तुला काहीच कसं दिसत नाही ! निळीनिळी साडी नेसलेली...''

अरे बाप रे ! रावबहादूर हिरालालांच्या तर तोंडचं पाणी पळेल. भावाच्या घरातून

बाहेर काढली गेल्यानंतर तिनं अधिकच जोरात स्वराज्यवाल्यांच्या बरोबर काम सुरू केलेलं दिसतंय. नाही, कुणीही म्हणेल की 'बाई, तुझी पोरीची जात. आपल्या घरी बसून राहावं, तुझं ह्या वादळवाऱ्यात काय काम ?'

चंदू पळता पळता म्हणाला— ''कमळीला काही झालं, तर देवाशपथ सांगतो, सुनील, मी तुझं काहीएक ऐकणार नाही !''

दोनचार मिनिटेच झाली असतील. फटाफट गोळीबार सुरू झाला आणि किती वेळ चालू राहिला कुणास ठाऊक.

दुसऱ्या दिवशी जमिनीवर प्रेतांचा खच पडला होता. गल्लीत आणि आजूबाजूला सगळीकडे हाहाकार माजला होता. घरचे लोक प्रेतांच्या त्या ढिगाऱ्यातून वेडीवाकडी पडलेली प्रेते बाजूला सारीत आपल्या नातेवाइकांना शोधत होते. घारी, कावळे यांनी इकडे तिकडे पंगत मांडली होती. कुत्रीही संधीची वाट पाहत होती.

मरणाऱ्यात सुनील पण होता. रावबहादूर हिरालाल घरातून बाहेर पडलेच नाहीत. सुनीलची आई छाती बडवून घेत रडत होती. कमळी बेशुद्ध पडली होती. चंदूला पोलिसांनी आधी बेदम मारहाण केली आणि मग ट्रकमध्ये घालून तुरुंगात त्याची रवानगी केली म्हणतात.

आता गल्लीत सर्वत्र शुकशुकाट आहे. अंधार आहे. मलाही मोडून खाली पाडलंय पण माझंही शरीर कामी आलं म्हणून मी सुखात आहे. मिरवणुका-बिरवणुका सगळ्या सध्या बंद आहेत. गोळ्यांचा सणसणाट अजूनही हवेत भरून आहे. लोक आपापल्या पोटापाण्याच्या मागे लागले आहेत. कमळीचं डोकं फिरलंय. किल्ली सैल पडलीय असे वाटते. दिवसभर उगीचच दचकत असते. कधी झोपेतून अचानक उठून बसते आणि काय पुटपुटते कुणास ठाऊक ? एके दिवशी तर गरीबदासाच्या विहिरीकडेच धावत सुटली होती. लोकांनी पाहिलं म्हणून बरं. ग्रहशांतीसाठी जप चालू आहे. एक हजार ब्राह्मण जेवू घालणार आहेत म्हणे ! देव करो बिचारीला बरं वाटो, नाहीतर आयुष्याचं काय होईल ?

कधीकधी एखादं विमान आवाज करीत डोक्यावरून जातं तेव्हा पोरं, तरणी, म्हातारी सगळीजण कितीतरी वेळ त्याच्याकडे बघत राहतात आणि मग कितीतरी दिवस गल्लीत हीच चर्चा चालू राहते. कोणी म्हणतो, जपानी येणार आहेत. कोण यायचं असेल तेव्हा ते येईल पण सध्या तरी उपासमारी आली आहे. कुणाच्या घरी दोन वेळेला चूल पेटत नाही. येताजाता सगळ्यांना पाहत असतो ना मी. कंबर वाकली आहे. डोळे खोल गेले आहेत. हाडं दिसू लागली आहेत. मुलं म्हातारी झाली आहेत. हसत नाहीत. खेळत नाहीत. दिवसभर बिडीसिगरेटींची थोटकं गोळा करीत फिरतात. रामकलीने आपल्या तिन्ही मुलांना विष देऊन फास लावून घेतलाय. रावबहादूर हिरालाल मिलिटरी सप्लायचे काम करतात. पण त्यांचं एक अडत दुकानही आहे, त्या दुकानात काय विकतात कुणास

ठाऊक ! बंद पडलं असावं. त्याच सुमारास एके दिवशी कोणीतरी दोन तरुण आपापसात बोलत चालले होते. अशा वेळी खांबालाही कान असतात, जपून बोललं पाहिजे हे त्यांना काय माहीत ? एक जण दुसऱ्याला म्हणाला— ‘‘रावबहादूर हिरालालांची कोठारं पाहिलीस का तू ? छताला पोती भिडली आहेत. तिळाएवढी जागा रिकामी नाही. रकाबगंज, निनावा, शहराराबाद, जैतपुरा आणि आणखी कुठे कुठे धान्याचा डोंगर आहे डोंगर !...’’

दुसऱ्यावर काहीच परिणाम झाला नाही. म्हणाला— ‘‘या सगळ्या गोऱ्यांनी उठवलेल्या अफवा आहेत. त्यांनी आपली मिलिटरीची गोदामं भरून ठेवली आहेत.’’

पहिला म्हणाला— ‘‘जाऊ दे. तुझ्या तोंडाला कोणी लागावं ? मी स्वत: माझ्या डोळ्यांनी पाहिलंय...’’

दुसरा म्हणाला— ‘‘पाहिलं आहेस तर रिपोर्ट का नाही करीत ?’’

पहिला म्हणाला— ‘‘रिपोर्ट काय आता करता येईल आणि सगळं दाखवून पकडून पण देता येईल; पण कुणी ऐकायला तर हवं. सगळे एकमेकाला सामील आहेत. तुझ्या-माझ्या जगण्या-मरण्याचा...’’

दुसरा त्याला अडवीत म्हणाला— ‘‘तर मग गप्प बैस मुकाट्यानं. का उगीच स्वत:चं आणि दुसऱ्याचं रक्त आटवतोस ? मी कोठारं पाहिली नाहीत. हवेल्या पाहिल्या आहेत, नव्या नव्या. रावबहादूरसाहेबांनी एकापाठोपाठ खरेदी केलेल्या.’’

मला काय ठाऊक ? मी तर आहे एक कंदील. आंधळा कंदील. उभा आहे. उजेड तरी कुठे आहे माझ्या जवळ ! पण हो, माझ्या ह्या फुटक्या डोळ्यांनी मी भर रात्री हातगाड्यांवरून पोती उतरवली जात असलेली पाहिली आहेत. जात असतील कुठंतरी.

काही का असेना, रावबहादूरसाहेबांवर लक्ष्मीची मोठी कृपा आहे. ज्या वस्तूला हात लावतात ती सोनं होऊन जाते. सुनील आणि कमळी यांच्या करणीमुळे साहेबलोक त्यांच्यावर खूप नाराज झाले होते. एकदोन महिने मुजरा झाला नाही की कोणा साहेबाचं-मेमचं तोंड दिसलं नाही. पण मग रावबहादूरसाहेबांनी करामत केली. त्यांचे बोलणे म्हणजे साखर पेरीत जाणे. त्यांनी पुन्हा पूर्ववत जम बसवला.

अशीच तीनचार वर्षे निघून गेली. कोणी तुरुंगाची हवा खाल्ली, कुणाचे हातपाय मोडले, कोणी झाडाची सालं खाऊन आपला जीव वाचवला, कोणी आपला देह विकला. रावबहादूर हिरालाल आपलं जादूचं झाड हलवीत राहिले आणि रुपये गोळा करीत राहिले. आज तीन-चतुर्थांश शहर त्यांच्या मालकीचं आहे.

मग एके दिवशी मोठा उत्सव साजरा झाला. शहरात ठिकठिकाणी प्रभातफेऱ्या निघाल्या. लहानमोठ्या खूप मिरवणुका निघाल्या. जिकडे पाहावे तिकडे तिरंगी झेंड्यांना ऊत आलेला. (चंदूही एक मोठा झेंडा घेऊन इकडून तिकडे उड्या मारीत फिरत होता) कुठे कमानी उभारल्या जात होत्या, कुठे पताका लावल्या जात होत्या, कुठे हवनकुंड

मांडले जात होते, कुठे वेदपाठ चालू होता. कुठे व्यासपीठाची तयारी चालू होती. लोकांचे चेहरे चमकत होते. सर्वत्र जणू विजेचा संचार झाला होता. हे तर काहीच नाही, या गडबडीत माझाही कायाकल्प होऊन गेला. खालपासून वरपर्यंत माझा देह लालशेंदरी रंगाने रंगवला गेला. माझंही नवं आयुष्य सुरू झालं.

माझ्या आनंदाला पारावार नाही. छाती भरून आली आहे. डोळे नाचताहेत. आजच्या या दिवसासाठी माझाही थोडा हातभार लागलेला आहे. सर्वांचा उत्साह ओसंडून चालला आहे. पण जुन्या गोष्टी विसरू म्हणता विसरता येत नाहीत ! या इथे चार पावलांवर त्या दिवशी सुनील गोळी लागून ठार झाला. पण रावबहादूर हिरालाल घराबाहेरही आले नाहीत. त्यांच्या डोळ्यांतून एकही अश्रू बाहेर पडला नसावा. आणि तेच रावबहादूरसाहेब आज स्वातंत्र्याच्या उत्सवात सर्वात पुढे आहेत. तलम खादीचे पांढरे शुभ्र धोतर, तसाच तलम अंगरखा आणि गांधी टोपी. सर्वांच्या पुढे धावताहेत. त्यांच्या तीन मोटारी इकडून तिकडे करण्यात दमून गेल्या आहेत. साऱ्या शहरात शेकडो कमानी उभ्या करण्यात आल्या आहेत. म्हणे— एकाहून एक सुंदर— माझ्यापासून जवळच एक कमान चांदीच्या भांड्यांनी सजवली जात आहे. रावबहादूर हिरालाल यांच्या गल्लीचे प्रवेशद्वार. सकाळपासून पंचवीस-तीस माणसं त्याच कामात आहेत. त्या लोकांच्या तोंडूनच मला कळलं की रात्री रावबहादूरांच्या हवेलीवर अकराशे लोकांना भोजन दिलं जाणार आहे. येताजाता लोक त्यांची प्रशंसा करीत होते— ''सिंहाचं काळीज आहे ! कसा पाण्यासारखा पैसा खर्च करताहेत— आहे कोणी माईचा लाल अशी हिम्मत करणारा ? खजिना उघडलाय, करा किती खर्च करायचा आहे तो. पैशाची पर्वा करू नका. काम असं व्हायला पाहिजे की शहरातल्या लोकांनी पाहतच राहावं. हा दिवस पुन्हापुन्हा थोडाच येणार आहे. लक्ष्मी पण माणूस पाहूनच त्याच्याकडे जाते हो. अहो, का करू नये म्हणतो मी, ह्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी आपला हिऱ्यासारखा पोरगा गमावला. मुलगी वेडी झाली ती झालीच.''

मी चकित होतो. लोकांना काहीच कसं आठवत नाही ! या माझ्या कानांनी मी रावबहादूरसाहेबांना लोकांनी दिलेल्या वाईट वाईट शिव्या ऐकल्या आहेत. आज त्यांची प्रशंसा करताना लोक थकत नाहीत !

नंतर किती दिवस गेले कोण जाणे, का शेकडो वर्षे गेली कोण जाणे ! मला सगळे सारखेच. आज पुन्हा कसली तरी मोठी सभा आहे असं ऐकतो. दहावा का पंधरावा वाढदिवस. मी विचारलं, ''कशाचा ?'' तर तो माझ्या तोंडाकडे पाहतच राहिला. कोणी काय काय म्हणून लक्षात ठेवायचं ? कर्णे रोजच ओरडत असतात. मी या विचारात होतो, तेवढ्यात चंदू माझ्याजवळ येऊन थांबला. जे काही होत आहे ते पाहू लागला. त्याच्याकडे मात्र कुणी पाहिले नाही. मग तो मला खेटून उभा राहिला. मी त्याचा म्हातारा मित्र होतो ना.

''पाहतो आहेस ना ?''

''पाहतोय.''

''काय पाहतो आहेस ?''

''लोक तुझ्याकडे पाहत नाहीत हे पाहतोय.''

''तुला तरी पूर्वीच्या गोष्टींची आठवण होत असेल.''

''आठवण म्हणजे रे काय चंदू ?''

''जी कुणाला राहत नाही, तीच आठवण.''

''अरे, मी तुला चिडवत होतो. माझ्याजवळ आठवणीशिवाय दुसरं आहे तरी काय ?''

''इथेच जवळ सुनीलला गोळी लागली होती.''

''हो.''

''आणि इथेच थोडं पुढे गोऱ्यांनी कमळीला...''

''कोणताच डाग-कलंक राहत नाही. माती सगळ्यांना खाऊन टाकते.''

''मी कोण आहे ?''

''मी कंदील आहे.''

''नाही, नाही, मी कोण आहे ?''

''तू एक लक्तर आहेस. लक्तर फार उपयुक्त वस्तू असते.''

''मग लोक ती फेकून का देतात ?''

''कारण लक्तर घरात बाळगणं ही दारिद्र्याची निशाणी आहे.''

''झेंडा पण एक लक्तरच आहे.''

''काय बोलतोस तू. झेंड्याचं कधीच लक्तर होत नाही. तो वारंवार टाकला जातो आणि वारंवार उचलला जातो.''

''आज हा कसला दिवस आहे ? मी उन्हात उभा आहे पण माझी सावली कुठेच पडत नाहीय.''

''वेडा आहेस, सूर्य डोक्यावर तळपतो आहे ते दिसत नाही का ?''

चंदूवर माझं फार प्रेम आहे. फार चांगला मुलगा आहे. त्याला चिडवताना फार गंमत वाटत होती. मला म्हणायचं होतं की यात वाईट वाटून घेण्यासारखं काही नाही. देशाला सैनिकाची गरज होती तेव्हा तुला महत्त्व होते. आज हा रंगीत उत्सव यशस्वी करण्यासाठी दुसऱ्याच प्रकारच्या माणसांची गरज आहे. नक्कल करणाऱ्याची, विदूषकांची, वेगवेगळे आवाज काढणाऱ्या बहुरूप्यांची, कसरत करणाऱ्या डोंबाऱ्यांची. त्यांच्यामुळे उत्सवाला रंग येईल. रुक्ष, बिनरंगी सैनिकांना घेऊन करायचं काय ?

असंच काहीतरी मला चंदूला सांगायचं होतं; पण वेडा मी काही म्हणायच्या आधीच निघून गेला. मी म्हटलं— आपणही थोडी डुलकी घ्यावी.

जागा झालो तेव्हा पताका, कमानी झेंडे-बिंडे, सगळे काही सजवून झाले होते. मोठमोठ्या मोटारी भराभर धावत होत्या. मैदान भरू लागलं होतं. कर्णा गळा फाडून गात होता. कुठून कुठून फेरीवाले, खेळवाले मैदानाच्या बाहेरच्या भागात गोळा झाले होते. विजेचे हजारो बल्ब चमकत होते ! रात्रीचा दिवस करण्याची व्यवस्था होत होती.

सभेची वेळ झाली. कोण्यातरी पुढाऱ्याची प्रतीक्षा होत होती. माझ्याजवळून जाता-येता लोक त्याचेच नाव घेत होते. रावबहादूर हिरालाल विजेच्या चपळाईने आपल्या साऱ्या व्यवस्थेचा तोंडावळा ठीकठाक करीत होते. घामाघूम झाले होते. शेवटी जहाजासारख्या लांबलचक गाडीतून पुढारी आले आणि सगळीकडे शांतता पसरली. सर्व लोक श्वास रोखून बसले. मी पण कान देऊन ऐकू लागलो. पण त्याच वेळी एका बाजूच्या लोकांमध्ये काही वेगळीच खळबळ माजलेली दिसली. काही लोक उभे राहिले होते. काही वाकून काय पाहात होते कुणास ठाऊक, तर काहीजण इकडेतिकडे पळू लागले होते. साप-विंचू तर निघाला नाही ना कुठून तरी !

वळून पाहतो तर कमळी ! रावबहादूरसाहेबांची वेडी मुलगी— जवळपास नागवी, विक्षिप्त, केस पिंजारलेले, तोंड उतरलेले, छाती बडवीत काहीतरी असंबद्ध बडबडत, पळत येत होती. आणि तिच्यामागे 'पकडा', 'पकडा' म्हणून ओरडत रावबहादुरांच्या नोकरांची एक फौज धावत होती...

त्या गोंधळात काही ऐकू आलं, काही नाही ऐकू आलं. आणि नकळतच माझी नजर रावबहादुरांच्याकडे वळली. ते यावेळी स्टेजवर उभे राहून पुढारी महाशयांशी गप्पा मारीत होते आणि मोठमोठ्याने हसत होते. कमळीचं हे कापालिक रूप आणि तिच्या पाठोपाठ धावणारी आपल्या नोकरांची वरात पाहून त्यांचा चेहरा पांढराफटक पडला. ते कुणाच्या ध्यानात आलं नसेल; पण माझे डोळे त्यांच्यावर रोखलेलेच होते. आणि त्या एका मिनिटात त्यांच्या चेहऱ्यावर किती रंग आले आणि गेले ते मी पाहिले. मग ते तसेच हसत बाजूला असलेल्या एका पोलिस अधिकाऱ्याजवळ गेले. हळूहळू त्यांनी त्याच्या कानात काय सांगितले कुणास ठाऊक, पण नंतर पोलिसांचा एक जथ्था कमळीला पकडून घेऊन जात असलेला दिसला. ती मघासारखीच हातपाय झाडत पुन्हापुन्हा म्हणत होती, "मी भारतमाता आहे ! भारतमाता की जय !" थोडं पुढे गेल्यावर ती अचानक एका जागी थांबली आणि भयंकर अट्टहास करीत म्हणाली, "पहिली रात्र ! माझी पहिली रात्र ! कमळीची पहिली रात्र !..." आणि विचित्रपणे डोळे फिरवू लागली. पोलिसांना काही समजले नाही. माकडासारखं खी खी करीत हसले. वेडीचे बोलणे. हसता हसता तिच्या डोळ्यातून लहानशा कुपीतून तेलाचे थेंब टपकावेत तसे अश्रू टपकू लागलेले ते न कोणी पाहिले, न कुणाला समजले.

त्याच वेळी मेघांच्या गर्जनेसारखा टाळ्यांचा कडकडाट झाला. मी नजर उचलून पाहिले— चंपाकली पुढाऱ्यांच्या गळ्यात मोठा पुष्पहार घालते आहे. चंपा ! माझे डोळे

सताड उघडे राहिले. चंपा येथे कशी काय आली ? चंपाचे येथे काय काम ? गुंडांची राणी, जिचं नाव ऐकल्यावर पोलिसांचा थरकाप होतो. ती जहांबाज, दारूअड्डावाली, जुगार चालविणारी, जिने आधी चंदूला घराबाहेर काढले आणि मग एके रात्री आपल्या नवऱ्याचे तुकडे तुकडे करून घारी-गिधाडांना खायला घातले ती, जिच्याविरुद्ध कोणी ब्रही काढू शकला नाही ती...

माझं डोकं फिरू लागलं. दूध घुसळल्यानंतर लोण्याऐवजी ही कसली घाण वर आली आहे ! एकाएकी मला थकल्यासारखं झालं. माझा जीव गेल्यासारखं झालं. माझ्यात उजेडच शिल्लक राहिलेला नाही. आणि मी या क्षणी धडामदिशी खाली पडणार असे वाटू लागले; पण मी पडलो नाही. तसाच पेंगत उभा राहिलो. सभेच्या ठिकाणाकडून येणारे अर्धवट आवाज कानावर पडत राहिले. जणू काही हजारो मधमाशा एकदम घोंगावताहेत.

असाच पेंगत-जागत असताना माझा डोळा कधी लागला ते कळलेच नाही. आणि मी एक स्वप्न पाहिले. स्वप्न कसले— बायोस्कोपच म्हणा ना. गल्लीतल्या पोरांना खोक्यातला सिनेमा दाखवणारा फिरतो ना, त्याच्यासारखा. गोलात डोळे घालून पाहत राहा— एकामागून एक येणारी चित्रे.

एक भयंकर, काळा, उदास, मातकट सूर्य. त्याच्याभोवती कोळ्याचं जाळं.

भयाण, ओसाड, वैराण, धुरकट जमीन; तिला आर ना पार आणि तशीच माना झुकवून सरपटत जात असलेली शेळ्यामेंढरांची लांबलचक रांग.

रस्त्यावर मधेच एक गाय बसलेली. एक कावळा तिच्या जखमेवर चोच मारत असलेला.

एक कोरडी विहीर, तिच्या तळात एक थेंब पाणी नाही.

आकाशाला भिडलेलं प्रचंड बुंध्याचं बाभळीचं एक झाड, त्याला एकही पान नाही. राक्षसाच्या सांगड्यासारखं.

महारोग्याच्या जखमा, विझलेल्या कोळशाच्या ढिगाऱ्यासारख्या, या टोकापासून त्या टोकापर्यंत.

एक बाई छाती काढून बाजारात बसलेली. कदाचित ती नागडी धोबीण असेल. शेकडो वर्षं झाली तरी म्हातारी झालेली नाही. तिच्या आजूबाजूला बरेच लोक घिरट्या घालताहेत. तिच्या तोंडातून लाळ गळते आहे.

एक अत्यंत मोहक काश्मीरी सफरचंद, त्याच्यात किडे पडलेले आहेत.

खूप माणसं उभी आहेत. त्यांच्यातल्या कुणालाच मी ओळखत नाही. आणि एक धार लावणारा दाढीवाला माणूस त्यांच्या जुन्या चाकूंना धार लावतो आहे.

हिजड्यांचं एक टोळकं, तऱ्हेतऱ्हेचे हावभाव करीत नाचत आहे.

# क्लॉड ईथरली

गजानन माधव मुक्तिबोध

पिवळ्या उन्हात चमकत असलेल्या उंच भिंतीच्या निळ्या फ्रेममधल्या काचेच्या खिडक्या लांब रस्त्यावरूनही दिसतात.

मी रस्ता ओलांडतो. जंगली, बिनवासाच्या परंतु सुंदर विलायती फुलांच्याखाली उभा राहतो. ही फुलं भिंतीच्या जवळच्या पुरुषभर उंचीच्या कंपाउंडच्या भिंतीवरून पुढे जात रस्त्याच्या बाजूला हात पसरून खाली वाकली आहेत. कसा आणि का कोण जाणे, त्याच कंपाउंडजवळचा, पाचसहा दिशांना जाणाऱ्या निर्जन रस्त्यांवरून तारांच्या सरळ रेषा नेणारा, विजेचा उंच खांब मला दिसतो आणि अचानक ध्यानात येतं की दोनमजली घरांवर चढायला उपयोगी पडेल अशी शिडी त्याला टेकवलेली आहे. कदाचित असल्या घरांच्या लांबलचक भिंतीचं बांधकाम अजूनही जुन्या पद्धतीनेच होत असावं.

सहज कुतूहलवश, पाहू या तरी कुठे काय चालले आहे, कोणत्या कोनातून काय दृश्य दिसते आहे या विचाराने मी शिडीवर चढतो आणि समोरच्या पिवळ्या, उंच भिंतीतल्या निळ्या फ्रेमच्या खिडकीवर माझी नजर जाते.

आणि मी नि:स्तब्ध होऊन जातो.

छताला टांगलेल्या, ढिलेपणाने गोल गोल फिरणाऱ्या पंख्याखाली दोन पिवळे स्फटिकासारखे तीक्ष्ण डोळे आणि मोठमोठ्या सुरकुत्यांनी भरलेला शुभ्र चेहरा दिसतो. तो अगदी त्याच उंच खिडकीतून आतून बाहेर पलीकडे जाण्यासाठीच जणू काही आपली दृष्टी केंद्रित करीत आहे. डोळ्यांना डोळे भिडतात. लक्षपूर्वक परस्परांना पाहतात. स्तब्ध, एकाग्र ! आश्चर्य !

श्वासांबरोबर शब्द निघाला. असाच काहीतरी आवाज त्यानेही केला असावा.

चेहरा वाईट नाही, चांगला आहे. भला माणूस दिसतो. पँटवर शर्ट ढिला पडलेला आहे. पण हे काय !

मी खाली उतरतो. मुकाट्याने रस्त्यावर चालू लागतो. किमान दोन फर्लांग दूर गेल्यावर एक माणूस भेटतो. फक्त एक माणूस ! एवढा मोठा रस्ता असूनही त्यावर माणसं नाहीत. का नाहीत ?

विचारल्यावर ती व्यक्ती म्हणते, ''शहर तर इकडे आहे, या बाजूला; तिकडेच कुठेतरी रस्त्यावर या बिल्डिंगचा मागचा भाग येतो. पहा ना !''

मी लक्षपूर्वक त्याचा चेहरा पाहिला. डावी आणि उजवी भुवई नाक जेथे सुरू होते तेथे एकमेकात मिसळून गेली होती. खडबडीत चेहरा. पंजाबी म्हणू शकलो असतो. सगळं शरीर लवचीक होतं. नक्कीच तो बायकी माणूस असण्याची शक्यता होती ! ज्यांचा विकास किशोरावस्थेतच थांबलेला असतो असा बाईसारखा पुरुष. हा तज्ज्ञांचा विषय आहे.

तेवढ्यात अत्यंत स्वाभाविकपणे सहज भावाने मी त्याला विचारले, ''ही पिवळी बिल्डिंग कसली आहे ?''

माझ्यावर अविश्वास दाखवीत तो म्हणाला, ''माहीत नाही ? हे वेड्यांचं इस्पितळ आहे— प्रसिद्ध वेड्यांचं इस्पितळ !''

''बरं— !''चा एक नागमोडी डॅश ठेवीत मी गप्प बसलो आणि खाली पाहत पुढे चालू लागलो.

आणि मग आमच्यामधलं अंतर वाढत वाढत गोल होऊ लागलं. आमच्याबरोबर आमची शून्यंही चालू लागली.

आपापल्या शून्यांच्या खिडक्या उघडीत मी—आम्ही दोघांनी—आपल्याला एकमेकांशी बोलता येते आहे की नाही हे पाहण्यासाठी एकमेकांकडे पाहिले. तेवढ्यात त्याने विचारले, ''आपण काय काम करता ?''

मी खजील होऊन म्हणालो, ''मी ? उचल्या आहे असं समजा !''

''समजा कशासाठी ? जे आहात ते सांगा !''

''का कोणास ठाऊक, पण मी फार प्रामाणिकपणे जीवन जगतो; खोटं बोलत नाही, परस्त्रीकडे पाहत नाही, लाच घेत नाही, भ्रष्टाचारी नाहीय मी. फसवाफसवी करीत नाही; कर्ज मात्र मी काढलेले आहे आणि ते मला फेडता येत नाही. तरीपण कमाईतला काही भाग कर्जफेडीत जातोच. तरीसुद्धा मला असे वाटते की मी मूलभूतपणे अप्रामाणिक आहे. म्हणून मी स्वत:ला पोलिसांच्या भाषेत उचल्या असे म्हणवून घेतले. मी लेखक आहे. आता सांगा, तुम्ही कोण आहात ?''

तो फक्त हसला, म्हणाला काहीच नाही. थोड्या वेळाने त्याचे तोंड उघडले. तो म्हणाला, ''मी सी.आय.डी.आहे.''

एकदम दबून मी त्याच्याशी शेकहँड केला. (हृदयात आतून कोणीतरी टोचले. नुकतेच मी शिडीवरून चढून त्या खिडकीतून एका माणसाचा चेहरा पाहिला होता; ही चोरीच नाही तर काय. त्या साल्याने मी संदिग्धावस्थेत आहे हे पाहिले !)

''फार चांगली गोष्ट आहे. मला पण या धंद्याबद्दल प्रेम आहे. आम्हा लेखकांचा व्यवसाय याच्याशी मिळताजुळताच आहे.''

तेवढ्यात भीमकाय पाषाणांच्या व्हिक्टोरियन बिल्डिंगांचे दृश्य दुरून चमकू लागले होते. आम्ही उभे राहिलो. एका मोठ्या झाडाखाली पानाचं एक दुकान होतं. त्यात दगडी पाटीच्या रंगाची एक बाई मिश्री आणि काजळ लावून बसलेली होती.

माझ्या तोंडातून अचानक शब्द बाहेर पडले, ''येथेही पानाचे दुकान आहे म्हणायचे !''

तो फक्त एवढेच म्हणाला, ''होय, येथेही आहे.''

आणि मी त्या दुकानाचा थाटमाट वाढवणाऱ्या अर्धनग्न विलायती बायांची चित्रे पाहू लागलो.

दुकानात आरसा लावलेला होता. काचेच्या मागचा मसाला चांगला नसल्यामुळे आरशात धूसर रेषा दिसत होत्या. त्यात चेहरा पाहिला की मला तो बिघडल्यासारखा दिसत होता. कधी लांबोडा तर कधी फताडा. कधी नाक एकदम लहान दिसायचं तर कधी लांबलचक आणि जाड ! मन विरक्तीनं भरून गेले. रस्ता लांब होता. निर्मनुष्य दुपार. कपडे आतून घामाने ओले झाले होते. अशा वेळी दोन गोष्टी बोलणारा माणूस भेटला म्हणजे तो वेळ आणि रस्ता दोन्ही पार करायला मोठा उपयोगी पडतो.

आम्ही दोघांनी आपापले आणि परस्परांचे चेहरे पाहिले. दोन्ही चेहरे खराब दिसले. दोघेही आपापली रूपे बदलू लागलो ! दोघेही हसलो आणि मग हीच गंमत चालू राहिली.

ती बाई पण त्याच्याशी थट्टामस्करी करू लागली. तेवढ्यात आणखी चार-पाच माणसं आली—तशीच निरर्थक, तापट, कंटाळा आणणारी, तापलेल्या टिनच्या पत्र्यासारखी नाहीतर लोखंडाच्या कांबीसारखी. ती सर्वजण घेरून उभी राहिली. आपापसात त्यांच्यामध्ये हळूहळू काही बोलणी होत राहिली. मला काहीच गंमत वाटेना. त्यांचे आवाज डोक्यावरून निघून जात होते.

मी लक्ष दिले नाही. मी या सर्व गोष्टींपासून लांबच राहतो. जे ऐकू आलं त्यावरून ती माणसं खालच्या जागेवरची पोलिसांची इन्फॉर्मर्स किंवा अशीच काहीतरी असावीत हे प्रकट झालं !

पान खाऊन आम्ही पुढे चालू लागलो. माझ्याबरोबर चालणाऱ्या अपरिचित साथीदाराच्या बायकीपणात मला का कोण जाणे काहीतरी ईश्वरीय अर्थ दिसून आला. जो माणूस आत्म्याचा आवाज दाबून टाकतो, आपली विवेकाची जाणीव खुंटीला टांगून ठेवतो त्याला काय म्हणावे ? तसा हा माणूस भला दिसत होता. मग त्यानं हा धंदा स्वीकारण्याचं काय कारण असावं ? साहस ? होय. काही साहसी माणसं पत्रकार नाहीतर गुप्त हेर किंवा असंच काही तरी होत असतात, स्वत:ला मोठेपण मिळावं म्हणून, अस्तित्वाची तीव्र जाणीव अनुभवाला यावी—येत राहावी म्हणूनही.

पण प्रश्न आहे तो हा की ते असं का करतात ! आतला कुठला तरी अभाव असतो त्यावर विजय मिळवण्यासाठी हा एक उपाय असू शकतो. तरीपण, त्यासाठी दुसरेही मार्ग असू शकतात ! हाच व्यवसाय का ? कारण त्यात पोट आणि प्रवृत्ती यांचा समन्वय होतो म्हणून ! काहीही असो, या माणसाच्या बायकीपणाला खास अर्थ आहे हे निश्चित !

आम्ही तो रस्ता पार केला आणि पुन्हा फॅशनेबल रस्त्यावर आलो. त्याच्या दोन्ही बाजूला निलगिरीची झाडे रांगेने उभी आहेत. मी विचारले, ''हा रस्ता कुठे जातो ?'' तो म्हणाला, ''वेड्यांच्या इस्पितळाकडे.'' का कोण जाणे मी दचकलो.

विषय बदलण्यासाठी मी म्हणालो, ''तुम्ही हा धंदा कधीपासून करीत आहात ?''

हा प्रश्न आपल्याला आवडला नाही अशा अर्थाने जणू त्याने माझ्याकडे पाहिले. मी काहीच म्हणालो नाही. मुकाट्यानं चालतच राहिलो. जवळजवळ पाच मिनिटे चालल्यानंतर आम्ही या अत्याधुनिक भागातल्या एका तारेच्या खांबापाशी मोठ्या श्रद्धेने स्थापन करण्यात आलेल्या भैरवाच्या सोनेरी बेगड लावलेल्या शेंदरी दगडाजवळ आलो. तेव्हा तो म्हणाला, ''माझी कथा थोडक्यात अशी आहे. लाज, शरम या दाखवायच्या गोष्टी झाल्या. तुम्ही माझे मित्र आहात म्हणून सांगतो. मी एका फार मोठ्या कोट्यधीश शेठजीचा मुलगा आहे. त्यांच्या घरी काम करायला ज्या बायका यायच्या, त्यांच्यातली एक माझी आई आहे. ती अजूनही तिथेच आहे. घरापासून दूर माझं पालनपोषण झालं. माझ्या वडिलांच्या खर्चाने. आई भेटायला यायची. तिच्याच सांगण्यावरून मी कसाबसा मॅट्रिक झालो. मग कुणाच्या तरी शिफारशीवरून सी.आय.डी.च्या ट्रेनिंगला गेलो. तेव्हापासून हेच काम करतो आहे. नंतर कळलं की तिथला खर्चही शेठजीच देत होता. मला त्याची अजूनही मदत होते. तुम्ही उचल्या आहात म्हणून सांगितले ! अरे ! तसे तर तुम्ही लेखक-बिखकही आहात ना. बरेच लेखक आणि पत्रकार इन्फॉर्मर आहेत ! म्हणून, मला वाटलं, की चला, बरं झालं. एक मित्र मिळाला.''

त्या माणसाबद्दलची माझी आस्था वाढली. भीती पण वाटली. घृणाही वाटली. कसल्या माणसाशी संबंध आला ! तरीपण, त्या कंपाउंडवर चढून मी डोकावून पाहिले होते. म्हणून एका न दिसल्या साखळीने बांधला तर गेलोच होतो.

त्या बायक्याने बोलणे पुढे चालू ठेवले, ''त्या वेड्यांच्या इस्पितळात असेही काही लोक टाकलेले आहेत की ज्यांना आजच्या दृष्टीनेच खरोखर वेडे म्हणावे लागेल. पण त्यांना वेडे म्हणायचे असेल तर आजची दृष्टी आवश्यक आहे.''

मी कंटाळून म्हणालो, ''आजची दृष्टी म्हणजे काय ?''

त्याने भिवया एकमेकीजवळ आणल्या. माझ्या डोळ्यात पाहत त्याने सांगायला सुरवात केली, ''जो माणूस कधीकधी आत्म्याचा आवाज ऐकत असतो आणि त्याचे कथन करून त्यापासून मुक्त होत असतो तो लेखक होतो. जो निरंतर आत्म्याचा

आवाज ऐकत असतो आणि काहीही बोलत नसतो तो भोळाभाबडा, सरळसाधा मूर्ख असतो. ज्याला हा आवाज जरा जास्तच ऐकू येतो आणि जो त्याप्रमाणे वागू लागतो, तो आपोआपच समाजविरोधी शक्तीत सामील होऊन जातो. पण जो हा आवाज जरुरीपेक्षा जास्तच ऐकतो आणि ऐकून सदैव अस्वस्थ होतो, आणि त्या अस्वस्थतेतच आतून येणाऱ्या आदेशाचे पालन करतो, तो ठार वेडा असतो. जुन्या काळी तो संत झाला असता. सध्याच्या काळात त्याला वेड्याच्या इस्पितळात टाकतात.''

मी एखाद्या फँटसीत तर नाही ना अशी शंका मला येऊ लागली. हा काही असला-तसला गुप्त हेर दिसत नाही. हा स्वतःच वेडा असला पाहिजे, नाहीतर कोणीतरी पोहोचलेला माणूस असला पाहिजे ! पण हा वेडाही नाही आणि पोहोचलेलाही नाही. हा तर फक्त बायक्या माणूस आहे. वैज्ञानिक परिभाषेचा प्रयोग करायचा तर असे म्हणता येईल की हा पठ्ठा जवान तर आहे; पण त्याच्यात असणारी ही लचक बाईमाणसाच्या चालण्याची आठवण करून देणारी आहे.

मी त्याला विचारले, ''तुम्ही ट्रेनिंग कुठे घेतलं ?''

''फक्त अनुभवाने शिकलो. मला बक्षीस पण मिळाले आहे.''

मी म्हणालो, ''छान !''

आणि मी जिज्ञासेने आणि कुतूहलाने प्रेरित होत्साता त्याच्या अंधकारपूर्ण तळात बुडण्याचा प्रयत्न करू लागलो.

पण तो फक्त हसला ! अज्ञात सायन्सच्या गणिती सूत्राच्या आकड्यांना काहीतरी अर्थ असतो; पण तो आपल्याला समजत नाही, तसा तो त्या वेळी मला वाटला.

मनात विचारांच्या ओळीच ओळी जमू लागल्या. ओळींवर ओळी ! कदाचित त्यालाही हे जाणवले असावे !... आणि मग दोघांच्याही मनात चार-चार ओळी तयार झाल्या. तेवढ्यात तो म्हणाला, ''तुम्ही का नाही हा धंदा करीत ?''

मी हतप्रभ झालो. हा एक विलक्षण विचार होता ! धंदा पैशांसाठी केला जातो हे मला ठाऊक होतं. सध्या मोठमोठ्या शहरातल्या फालतू हॉटेलांमध्ये जेथे दहापाच माणसं गप्पा मारीत बसलेली असतात, तेथे त्यांची बोलणी ऐकून आपलं अनुमान काढण्यासाठी कितीतरी आतले सूचीभेद्य-तम-प्रवेशक डोळे ऐकत बसलेले असतात. मला हे सगळं माहीत आहे. स्वतःच्या अनुभवावरून सांगू शकतो. पण या माणसाची हिंमत तर पहा, कसला बिकट प्रश्न विचारतो आहे !

आजवर कोणाही माणसाने मला असला प्रश्न विचारला नव्हता. ज्याला मी विशेष योग्यता म्हणतो असे काहीतरी नक्कीच माझ्यात असले पाहिजे. मी माझ्या आयुष्यात जे काही शिक्षण किंवा अशिक्षण मिळवलं आहे, जी काही विद्या किंवा अविद्या संपादन केली आहे, जे काही कौशल्य किंवा अकौशल्य प्राप्त केलं आहे त्याने मला— मला मान्य असो वा नसो—सभ्य समाजाचे अंग बनविले आहे. होय, ज्याला आपल्या सभ्यपणाचा

निर्वाह करण्यासाठी सध्या आर्थिक कष्ट सहन करावे लागतात आणि ज्याच्या मनात नाश आता अगदी जवळच येऊन ठेपला आहे असा भाव असतो, त्या सभ्य समाजाचंच मी अंग आहे. थोडक्यात जागरूक व्यक्ती आहे, अतिसुशिक्षित आहे, अतिसुसंस्कृत आहे. पण आपल्या ह्या अतिसुशिक्षितपणाच्या आणि अतिसुसंस्कृतपणाच्या सौष्ठवाचे उद्घाटन करण्यासाठी जो एक स्निग्ध-प्रसन्न चेहरा पाहिजे, तोच माझ्याजवळ नसल्यामुळे मी उचल्यासारखासुद्धा वाटतो—माझा मला !

तेव्हा माझा हा गंध ओळखून त्या अद्भुत माणसाने माझ्यासमोर जो प्रस्ताव ठेवला, त्यामुळे मी आपला आपल्याशीच एकदम अधिक जागरूक झालो ! काय हरकत आहे ? हे सुद्धा उत्पन्नाचे एक विशेष साधन होऊ शकते.

मी बोलणं बदलीत त्याला विचारले, ''अरे हो, तुम्ही त्या वेड्यांच्या इस्पितळा-विषयी सांगत होता ना, त्याचं काय ?''

मी मान खाली घातली. कानावर निरंतर शब्दप्रवाह पडू लागला. मी ऐकत राहिलो. कदाचित त्याला जे काही सांगायचं होतं त्याची ही प्रस्तावना असेल. मधेच मी त्याला थांबवीत विचारले, ''मग त्याचं नाव काय आहे ?''

''क्लॉड ईथरली !''

''तो रोमन कॅथॉलिक आहे—आदिवासी ख्रिश्चन आहे ?''

नाराज होत तो म्हणाला, ''म्हणजे आतापर्यंत मी जे काही बोलत होतो ते तुम्ही ऐकत नव्हता ?''

त्याची एकएक गोष्ट माझ्या हृदयात पोहोचत होती अशी खात्री मी त्याला दिली; तरीपण माझ्या बोलण्यावर त्याचा विश्वास बसलेला नाही हे त्याच्या चेहऱ्यावरूनच कळून येत होते. तो म्हणाला, ''क्लॉड ईथरली हिरोशिमावर बॉंब टाकणारा वैमानिक आहे.''

मला आश्चर्याचा धक्का बसला. एक तो तरी वेडा असला पाहिजे नाहीतर मी तरी ! मी त्याला विचारले,

''म्हणून काय झाले ?''

आणखीच नाराज होत तो म्हणाला, ''अरे मूर्खा ! उद्ध्वस्त हिरोशिमाच्या विटक्या, कुरूप, उदास आणि दुःखपूर्ण जीवनाचे अध्यक्षपद सांभाळणाऱ्या मेयरला तो दर महिन्याला चेक पाठवीत असे. त्या पैशांमुळे दीनदुबळ्यांना काहीतरी मदत व्हावी म्हणून, त्याने जे भयंकर पाप केले होते ते थोडं कमी व्हावं म्हणून !''

मी त्याच्या चेहऱ्याचे निरीक्षण करू लागलो. त्याच्या घनदाट ओबडधोबड भिवया नाकापाशी एकमेकात मिसळून जात होत्या. रुक्ष केसांची तीक्ष्ण वस्तऱ्याने हजामत केलेला त्याचा तो हिरवट गोरा चेहरा, लांबलचक मोठं नाक, मजेदार ओठ आणि दुःखभरले डोळे, शरीरातली बायकी लचक, दुहेरी हनुवटी आणि तीवर लहानसा खळगा.

माझ्याशी असं बोलणारा हा कोण माणूस आहे ? वाटलं की खरंच, आपण ह्या जगात राहत नाही आहोत, या जगाच्या दोनशे मैल वर उंच आहोत. तेथून आकाश, चंद्र, सूर्य, तारे दिसताहेत. रॉकेट उडताहेत. येताहेत जाताहेत. आणि पृथ्वी एका मोठ्या निळ्या गोळ्यासारखी दिसते आहे. वाटतं, आपण कुणा एका देशाचे नाही, सर्व देशांचे आहोत. मनात भयंकर उद्वेगपूर्ण पण वजनरहित अशी चंचलता निर्माण झाली. साधारणपणे एक पळभर अशीच अवस्था राहिली; पण हे पळ मोठे घनघोर होते. भयप्रद आणि संदिग्ध ! आणि त्या पळाने प्रभावित होत मी म्हणालो, ''म्हणजे तो हिरोशिमाचा क्लॉड ईथरली या वेड्यांच्या इस्पितळात आहे ?''

ज्या कंपाउंडच्या भिंतीवर चढून माझ्या डोळ्यांनी खिडकीच्या पलीकडे, खिडकीतून आरपार जाऊ पाहणारे तीक्ष्ण डोळे पाहिले होते, त्या पिवळ्या बिल्डिंगकडे माझ्या पसरलेल्या हातांची बोटे निर्देश करीत होती. म्हणजे जर मी या बायकी लचकणाऱ्या माणसाच्या बोलण्यावर विश्वास ठेवायचे म्हटले तर त्याचा अर्थ असा होईल की मी जे डोळे पाहिले ते दुसऱ्या कुणाचे नाही तर क्लॉड ईथरलीचेच असले पाहिजेत. पण हे कसे काय शक्य आहे ?

माझे मन ओळखून तो म्हणाला, ''होय, तो क्लॉड ईथरलीच होता.''

मी चिडून म्हटले, ''म्हणजे हा काय हिंदुस्थान नाही ? आपण काय अमेरिकेत राहतो आहोत ?''

माझ्या मूर्खपणावरच जणू काही मोठ्याने हसत तो म्हणाला, ''भारताच्या प्रत्येक शहरात एक एक अमेरिका आहे. तुम्ही लाल ओठांच्या, भडक, गोऱ्या, सोनेरी बायका पाहिल्या नाहीत ? त्यांचे भारी कपडे पाहिले नाहीत ? शानदार मोटारींतून फिरणारे अतिसुशिक्षित लोक पाहिले नाहीत ? सुंदर प्रकारची वेश्यावृत्ती पाहिली नाही ? सेमिनार पाहिले नाहीत ? एके काळी आपण लंडनला जात होतो आणि इंग्लंड रिटर्नड् म्हणवून घेत होतो. आणि आता वॉशिंग्टनला जातो. आज आपल्याला जर खरोखरच एवढं ऐश्वर्य लाभलं, आणि आपल्याजवळही तेवढेच ॲटम बॉम्ब, हायड्रोजन बॉम्ब, आणि रॉकेट्स असतील तर मग काही विचारायलाच नको ! वर्तमानपत्र वाचता की नाही ?''

मी म्हणालो, ''हो, वाचतो ना.''

''मग तुम्ही ते मॅकमिलनने दिलेलं भाषणही वाचलं असेल. तो काय म्हणाला होता ? 'हा देश आमच्या सैनिकी गटात नसेलही, पण त्याची संस्कृती आणि आत्मा आमच्याबरोबर आहे.' मॅकमिलन खोटे बोलत होता का ? मुळीच नाही. तो एक महत्त्वपूर्ण असे तथ्य प्रकाशात आणीत होता.''

''आणि हे जर खरे असेल तर त्यांच्या संस्कृतीवर आणि आत्म्यावर येणारे संकट हे आपल्या संस्कृतीवर आणि आत्म्यावर येणारे संकट आहे. म्हणून तर सध्याचे लेखक आणि कवी अमेरिकन, ब्रिटिश आणि पश्चिम युरोपच्या साहित्यात आणि तत्त्वज्ञानात

गोते खात असतात आणि तिकडूनच आपल्या आत्म्यासाठी शिक्षण आणि संस्कृती मिळवीत असतात ! हे खोटं आहे का ? म्हणा की हे खोटं आहे म्हणून. आणि आमची तथाकथित राष्ट्रीय वर्तमानपत्रं आणि प्रकाशन केंद्रं ! ती आपली विचारसरणी आणि दृष्टिकोण कुठून घेत असतात ?''

असे म्हणून तो मोठ्याने हसला आणि हास्याच्या लाटेत त्याचे शरीर लचकू लागले.

तो पुढे म्हणाला, ''आपण इंडोनेशिया, चीन किंवा आफ्रिकेतल्या साहित्यापासून प्रेरणा घेतली आहे का ? किंवा लुमुंबाच्या काव्यापासून ? शी: शी: ! ते तर जनावरांच्या, चतुष्पादांचं साहित्य आहे. आणि रशियाचं ? अहो, ती तर सगळी स्वार्थाची गोष्ट आहे. त्याचं रहस्य वेगळंच आहे. रशियाकडून आपल्याला मदत हवी आहे, पण आपण त्याला घाबरूनही आहोत.''

''जाऊ द्या ! तात्पर्य काय की जर त्यांची संस्कृती ही आमची संस्कृती असेल, त्यांचा आत्मा हा आमचा आत्मा असेल, आणि त्यांचं संकट हे आमचं संकट असेल— आणि हे सिद्धच आहे—वाचा जरा वर्तमानपत्रं, चटपटीत इंग्रजीवाल्यांशी बोला—तर आमच्याही हिरोशिमावर बॉम्ब टाकणारा वैमानिक का नाही असू शकणार ? आणि आमच्यातही साम्राज्यवादी आणि युद्धवादी लोक का नाही असू शकणार ?''

मला घाम फुटला. तरी पण भारत अमेरिका आहे आणि क्लॉड ईथरली त्याच वेड्यांच्या इस्पितळात राहताहेत—त्याच इस्पितळात राहतो आहे हे मान्य करायला मन तयार होत नव्हते. माझ्या डोळ्यात संदेह, अविश्वास, भय आणि शंका यांचा संमिश्र भाव निश्चितच दिसत असला पाहिजे. तो पाहून तो अतिशयच हसला. आणि त्याने मला एक सिगारेट दिली.

एका झाडाखाली उभे राहून बोलता बोलता आम्ही खाली असलेल्या एका दगडावर बसलो. तो म्हणाला, ''पाहिलं ना ! ब्रिटिश, अमेरिकन किंवा फ्रेंच कवितेत जे मूड्स्, ज्या मनस्थिती असतात, त्याच आपल्याकडेही आणल्या जातात. सद्भिरुची आणि आधुनिकता यांच्या मागणीपोटी हे केले जाते. का ? कारण त्यांच्याकडेही औद्योगिक सुधारणा आहे आणि आपल्याकडेही आहे. यंत्र आणि कारखाने उभे केले म्हणजे आदर्श आणि कर्तव्यही बदलतात जणू काही.''

मी नाराज झालो आणि सिगारेट फेकून दिली. त्याच्यासमोर येऊन उभा राहिलो. कदाचित, मी त्या वेळी त्याला मारणारही होतो. मारहाण करायची इच्छा होती. पण उपहासाने तो हसत होता आणि त्याचे डोळे अधिकच भरून आलेले होते दु:खाने.

तो म्हणाला, ''क्लॉड ईथरली एक वैमानिक होता ! त्याच्या ॲटम बॉम्बमुळे हिरोशिमा नष्ट झाले. तो आपलं कार्यकौशल्य पाहण्यासाठी त्या शहरात गेला. ते भयंकर विद्रूप, कुरूप, मांसांच्या तुटल्याफुटल्या गोळ्यांचं शहर पाहून त्याच्या हृदयाचे तुकडे

तुकडे झाले. आपल्याजवळ असलं काही हत्यार आहे आणि त्याचे असले काही परिणाम होतील याचा त्याला पत्ताच नव्हता. त्याच्या हृदयात निरपराध माणसांची प्रेतं, मुडदे, मांसाचे गोळे, प्रेतांची तुटली-फुटलेली मुंडकी तरळू लागली. त्याच्या हृदयात करुणा पाझरली. तिकडे अमेरिकन सरकारने त्याला बक्षीस दिले. तो 'वॉर हीरो' झाला. पण त्याचा आत्मा म्हणत होता की तू पाप केले आहेस. फार मोठे पाप. त्याची शिक्षा मिळायलाच पाहिजे नाही ! पण त्याचा देश तर त्याला हीरोच समजत होता. आता काय करावे ? त्याने सरकारी नोकरी सोडून दिली. साधं काम पत्करलं, पण तरीही तो 'वॉर हीरो' होता. महान होता. पण क्लॉड ईथरलीला महानता नको होती, त्याला हवी होती शिक्षा !...

''आपल्याला पकडावं आणि तुरुंगात टाकावं म्हणून त्याने मुद्दाम भानगडी करायला सुरवात केली. पण दर वेळी त्याला पुराव्याअभावी सोडून देण्यात आले. 'मी पापी आहे. पापी आहे मी, मला शिक्षा मिळायला पाहिजे. मी निरपराध लोकांचा बळी घेतला आहे, मला शिक्षा द्या !' असे तो जाहीरपणे सांगू लागला. हे परमेश्वरा ! पण अमेरिकन शासन त्याच्या कृत्याला पाप नव्हे तर महान कार्य समजत होते. देशभक्ती समजत होते. त्याने जेव्हा ईथरलीच्या या कारवाया पाहिल्या तेव्हा त्याला वेड्यांच्या इस्पितळात टाकले. टेक्सास प्रांतात वाको नावाचं एक स्थान आहे—तेथे त्याचं डोकं ठिकाणावर आणण्यासाठी त्याला ठेवण्यात आलं. तो तिथे चार वर्षे राहिला पण त्याचा वेडेपणा काही गेला नाही...

''चार वर्षांनंतर तो सुटला तेव्हा रॉय एल मॅनटूथ नावाचा एक गुंड त्याला भेटला. त्याच्या मदतीने त्याने पोस्ट ऑफिसे लुटली. शेवटी साथीदारासह तो पकडला गेला. खटला झाला. काही उपयोग नाही. हा कोण आहे आणि त्याला काय पाहिजे आहे हे कळताच त्याला सोडून देण्यात आले. त्यानंतर त्याने डल्लास येथे एका कॅशियरवर सशस्त्र हल्ला केला. परिणाम काहीही नाही. कारण त्याच्यासारख्या प्रख्यात युद्धवीराला एक सामान्य चोर, उचल्या ठरवणे म्हणजे त्याची बदनामी होय असे ज्येष्ठ सेनाधिकाऱ्यांना वाटले. म्हणून त्याला जे पद मिळाले होते त्याच्या रक्षणासाठी त्याला पुन्हा वेड्यांच्या इस्पितळात डांबण्यात आले...

''तो हा क्लॉड ईथरली ! ईथरलीच्या प्रामाणिकपणावर विश्वास ठेवू नये अशी शंकाही कोणाला आली नाही. त्याच्या जीवनकथेवर चित्रपट बनवण्याचे अधिकार विकत घेण्यासाठी एका कंपनीने एक लाख रुपये देण्याचा प्रस्ताव मांडला. त्याने ठाम नकार दिला. त्याच्या या नकारामुळे तो खोटारडा किंवा लुच्चा नाही हे सगळ्यांनाच समजले. तो ढोंग करीत नाहीय...

''अणुयुद्धाला विरोध करणाऱ्या आत्म्याच्या आवाजाचे दुसरे नाव क्लॉड ईथरली आहे हे कुणाला ठाऊक नाही ? हो, ईथरली मनोरुग्ण नाही ! आध्यात्मिक अशांततेचं,

आध्यात्मिक उद्विग्नतेचं तो ज्वलंत प्रतीक आहे. तुम्ही हे नाकारू शकाल ?''

त्याच्या हातातली सिगारेट केव्हाच खाली पडली होती. तो बायकी माणूस संतापला होता. चेहऱ्यावर अस्वस्थपणाचं मळभ पसरलं होतं.

तो सांगत राहिला, ''ह्या आध्यात्मिक अशांततेला, या उद्विग्नतेला समजू शकणारे किती लोक आहेत ? त्यांना विचित्र, विलक्षण, विक्षिप्त म्हणून त्यांची रवानगी वेड्यांच्या इस्पितळात करावी असं वाटणारे किती लोक असतील कुणास ठाऊक ! म्हणूनच जुन्या काळी आपल्या कितीतरी विद्रोही संतांना वेडं ठरवलं गेलं. आजही अनेकांना वेडं म्हटलं जातं. ते जर फार तुच्छ असतील तर त्यांचं म्हणणं जाहीर होऊ नये व पसरू नये म्हणून त्यांची चक्क उपेक्षा केली जाते.

''आपल्या मनात—अंत:करणात—डोक्यात असलंच एक वेड्यांचं इस्तिपळ असतं. तिथे आपण आपले उच्च, पवित्र आणि विद्रोही भावविचार टाकून देतो. वाटलं तर ते स्वत: हळूहळू बदलून समझोत्याचा पोशाख चढवतील व सभ्य, सज्जन बनतील म्हणजेच बरे होतील. नाहीतर त्या इस्पितळातच खितपत पडून राहतील !''

मी हतप्रभ तर झालोच होतो; पण त्याच्या ह्या कथेवर मुग्धही होऊन गेलो. त्या जीवनकथेने खूपच प्रभावित होऊन मी विचारले, ''म्हणजे ही गोष्ट खरी आहे ?''

तो उत्तरला, ''अरे वा: ! अमेरिकन साहित्य वाचता की नाही ? अमेरिकन वर्तमानपत्रं पण नाही ? ब्रिटिश पण नाही ? मग काय वाचता डोंबल !... अरे बाबा, त्याच्यावर अनेक भाषांतून पुस्तके निघाली आहेत. काडीचीसुद्धा माहिती नाही ! विश्वास नसेल तर खोडून काढा. जा, शोध घ्या. आणि दरम्यान मी तुम्हाला या वेड्यांच्या इस्पितळातून हिंडवून आणतो.''

मी हात हलवीत नकार दिला, ''नको, नको. मला नाही जायचं.''

''का नाही ?'' तो दटावतच म्हणाला. ''सध्या आपल्या आत्म्याचा वास आपल्या अवचेतन मनात असतो. चेतन मनात स्व-हित विचार असतो तर अधिचेतन मनात असतो समाजातील सामंजस्याचा आदर्श—मग तो समाज वाईट का असेना ! आजच्या जीवन-विवेकाचे हेच रहस्य आहे...

''तुम्हाला तिकडे फिरून यायलाच पाहिजे. मी तुम्हाला वेड्यांच्या इस्पितळात घेऊन जाणार, पण मागच्या दाराने नाही, पुढच्या उघड्या दाराने !''

वाटेत मी त्याला म्हणालो, ''भारत अमेरिका आहे हे मानायला मी तयार नाही ! तुम्ही काहीही म्हणा ! तो कधी होऊ शकत नाही आणि कधी होणारही नाही.''

हे बोलणे त्याने उडवून लावले. त्याने याचे उत्तर द्यायला हवे होते. तो फक्त एवढेच म्हणाला, ''तुम्हाला मी काय म्हणतो ते कळत नाही हीच अडचण आहे.''

मी म्हणालो, ''ते कसे काय ?''

''क्लॉड ईथरली देहरूपाने आपल्या येथे नसेलही; पण तशाच प्रकारचा अस्वस्थ आत्मा असणारे लोक तर आमच्याकडे असतीलच ना ?''

अविश्वास दाखवीत तिरस्काराने मी म्हणालो, ''हे पण काही बरोबर वाटत नाही.''

तो म्हणाला, ''का नाही ? देशाशी प्रामाणिक असणाऱ्यांच्या मनात व्यापक पापाचरणाबद्दल काही वैयक्तिक भावना असेल की नाही ?''

''मी नाही समजलो.''

''म्हणजे असं की बरेच जण पापाचरणी, शोषक, दरोडेखोरांना घाबरतात; पण ती फक्त बाहेरची माणसं नसतात. त्यांच्याच घरची माणसं असतात. समजून घ्यायचा प्रयत्न करा !''

मी आठ्या घालीत म्हणालो, ''मग काय झालं ?''

''हेच की व्यापक अन्याय जाणवणाऱ्या पण त्याला विरोध न करणाऱ्या लोकांच्या अंत:करणात वैयक्तिक पापभावना असतेच. असायलाच हवी. त्यांच्यात आणि ईथरलीमधे मूलभूत एकता आणि अभेद असतो.''

''यामुळे काय सिद्ध होते ?''

''हेच की तुमच्यासारखे सावध, जागरूक, संवेदनशील लोक क्लॉड ईथरली असतात.''

त्याने माझ्या हृदयात खंजीर मारला. होय, खरं आहे हे ! अगदी खरं ! अवचेतनाच्या अंधाऱ्या तळघरात पडलेला आत्मा विद्रोह करतो. पापाचरणासाठी समग्र आत्मा आपल्या स्वत:ला जबाबदार समजत असतो. अरेरे ! हा तर माझाही रोग आहे.

मी माझा चेहरा कठोर केला, गंभीर होत म्हणालो, ''पण ह्या सगळ्या गोष्टी तुम्ही मला का सांगता आहात ?''

''कारण की मी सी.आय.डी. आहे आणि मी तुमचे स्क्रीनिंग करीत आहे. तुम्ही माझ्या विभागात काम करावे अशी माझी इच्छा आहे. तुम्ही नाही का म्हणता ? हे तुमच्या अंतरात्म्याला अनुकूल नसेल तर तसं म्हणा.''

''मग काय मला चाचपून पाहण्यासाठी तुम्ही या गोष्टी करीत होता ? आणि, तुमच्या या सगळ्या गोष्टी बनावट होत्या ? माझ्या हृदयातले रहस्य जाणून घेण्यासाठी होत्या ? बदमाश !''

''मी तर फक्त तुम्हाला अनुकूल अशाच प्रसंगाविषयी सांगत होतो.''

# अमृतसर आले आहे...

भीष्म साहनी

गाडीच्या डब्यात फारसे प्रवासी नव्हते. माझ्या समोरच्या सीटवर बसलेले सरदारजी मला युद्धाच्या कथा ऐकवत राहिले. बराच वेळ. युद्धकाळात त्यांनी ब्रह्मदेशाच्या लढाईत भाग घेतला होता. प्रत्येक गोष्टीवर खो खो करीत हसायचे आणि गोऱ्या सैनिकांची चेष्टा करायचे. डब्यात तीन पठाण व्यापारी पण होते. त्यांच्यातल्या एकाने हिरव्या रंगाचा पोशाख घातलेला होता आणि तो वरच्या बर्थवर पहुडला होता. तो माणूस खूप हसऱ्या चेहऱ्याचा होता आणि माझ्या जवळच्या सीटवर बसलेल्या एका दुबळ्याशा महाशयांची बऱ्याच वेळापासून गंमत करीत होता. तो दुबळा माणूस पेशावरचा राहणारा असावा. कारण ती दोघं मधून मधून पश्तोमधूनही बोलत होती. माझ्यासमोर उजव्या बाजूच्या कोपऱ्यात एक म्हातारी तोंड झाकून घेऊन बसली होती आणि केव्हापासूनची माळ फिरवीत जप करीत होती. एवढीच माणसं असावीत. आणखीनही एकदोघं प्रवासी असावेत, पण मला आता नीट आठवत नाही.

गाडी कमी वेगाने चाललेली होती आणि गाडीतले प्रवासी गप्पा मारीत होते... आणि बाहेर गव्हाच्या शेतात हळूहळू लाटा पसरत होत्या... दिल्लीत साजरा होत असलेला स्वातंत्र्योत्सव पहायला मिळणार म्हणून मी मनातल्या मनात खुश होतो.

त्या दिवसांबद्दल विचार करायला लागलो म्हणजे वाटतं की आपण एखाद्या झुंजुमुंजू अवस्थेत जगत होतो. कदाचित काही काळ गेल्यानंतर सर्वच व्यवहार संधिप्रकाशात झाल्यासारखे वाटत असावेत. जसजसे भविष्याचे पडदे उघडत जातात तसतशी ही झुंजमुंज अवस्था अधिकच गडद होत जाते.

त्याच काळी पाकिस्तान निर्माण केले जाण्याची घोषणा झाली होती आणि भविष्यात जीवनाची रूपरेखा कशी काय असेल यासंबंधी लोक अनुमान करू लागले होते; पण कुणाचीही कल्पना फार दूरवर जाऊ शकत नव्हती. माझ्यासमोर बसलेले सरदारजी मला वारंवार विचारीत होते की 'पाकिस्तान झाल्यावर जिनासाहेब मुंबईतच राहतील का पाकिस्तानात जातील ?' आणि प्रत्येक वेळी मी त्यांना सांगत होतो की मुंबई काय म्हणून सोडतील ? पाकिस्तानात जातील, परत येतील, मुंबई सोडण्यात काय

अर्थ आहे ?'' लाहोर आणि गुरदासपूर या शहरांबद्दलही अनुमानं चालली होती की ही शहरे कुठे जातील. बसण्या-उठण्यात, गप्पागोष्टीत किंवा हास्य-विनोदात काहीही विशेष फरक पडलेला नव्हता. काही लोक आपली घरं सोडून चालले होते; तर दुसरे लोक त्यांची चेष्टा करीत होते. कोणते पाऊल बरोबर ठरेल आणि कोणते चुकीचे ठरेल हे कुणालाच ठाऊक नव्हते ! एकीकडे पाकिस्तान होत असल्याचा जोश होता तर दुसरीकडे हिंदुस्थान स्वतंत्र होत असल्याचा उत्साह होता; जागोजाग दंगेही होत होते आणि स्वातंत्र्यदिनाची तयारीही चालू होती. या पार्श्वभूमीवर असे वाटत होते की देश स्वतंत्र झाला म्हणजे दंगे आपोआप थांबतील. वातावरणाच्या या संधिप्रकाशात स्वातंत्र्याची सोनेरी धूळ उडत होती आणि त्याचबरोबर अनिश्चितपणाही तरळत होता आणि या अनिश्चितपणातच एखाद्या वेळेला भावी संबंधांची रूपरेखा झळकून जायची.

झेलम स्टेशन बहुधा मागे पडले होते. वरच्या बर्थवरच्या पठाणाने एक शिदोरी उघडली आणि त्यातले उकडलेले मांस आणि नानरोटीचे तुकडे काढकाढून आपल्या साथीदारांना तो देऊ लागला. मग तशीच मस्करी करीत माझ्या शेजारी बसलेल्या महाशयांना एक मांसाचा तुकडा व एक रोटीचा तुकडा देत खाण्याचा आग्रह करू लागला ''खा रे बाबा, शक्ती येईल. मग आमच्यासारखा होशील ! बायको पण तुझ्यावर खुश होऊन जाईल. खा रे वरणखाऊ. तू वरण खातोस म्हणून असा दुबळा आहेस.''

डब्यातले लोक हसू लागले होते. महाशयांनी पश्तोमध्ये काहीतरी उत्तर दिले आणि मग हसत मान हलवीत राहिले.

यावर दुसरा पठाण हसून म्हणाला— ''अरे जालिम, अमारे आथ से नई लेता ए तो अपने आथ से उठा ले । खुदा कसम बकऱ्याचं मास आहे. दुसऱ्या कशाचं नाही.''

वर बसलेला पठाण गमतीने म्हणाला— ''अरे, ए काडी पैलवान, इथं कोण बघणार आहे तुला ? हम तेरी बीबी को नई बोलेगा ! तू आज आमच्या बरोबर तुकडा मोड. हम तेरे साथ दाल पियेगा...''

यावर लोक खदखदा हसले. पण ते दुबळे महाशय हसत मान हलवीत राहिले आणि मधून मधून पश्तो भाषेत दोन शब्द बोलत राहिले.

''ओ कितना बुरा बात ए अम खाता ए, और तू अमारा मुंह देखता ए... !'' सगळे पठाण मजेत होते.

''तुम्ही हात धुतलेले नाहीत म्हणून हे घेत नाहीत,'' स्थूलकाय सरदारजी म्हणाले आणि म्हणता म्हणता खो खो हसू लागले. अर्धवट लोळत असलेल्या सरदारजींची अर्धी ढेरी सीटच्या पुढे लटकत होती.

''तुम्ही आता झोपून उठला आणि उठल्या उठल्या शिदोरी उघडून खायला लागला म्हणून हे बाबूजी तुमच्या हातचं घेत नाहीत. दुसरं काही नाही,'' असे म्हणून सरदारजींनी माझ्याकडे पाहत डोळा मारला आणि पुन्हा खो खो हसू लागले.

‘‘मास नई खाता ए, बाबू तो आओ जनाना डब्बे मैं बैठो, इधर क्या करता ए—’’ पुन्हा हास्यस्फोट.

डब्यात आणखीही प्रवासी होते पण प्रवासाच्या आरंभापासूनचे जुने प्रवासी हेच होते. बाकीचे प्रवासी चढत-उतरत राहिले. जुने प्रवासी असल्यामुळे त्यांच्यात एक प्रकारचा नि:संकोचपणा आला होता.

‘‘ओ इधर आकर बैठो ! तुम अमारे साथ बैठो ! आओ जालिम, हवापाण्याच्या गोष्टी करू थोड्या.’’

तेवढ्यात कोणत्यातरी स्टेशनवर गाडी थांबली आणि नव्या प्रवाशांचा लोंढा आत आला. अनेक प्रवासी एकदमच आत घुसले होते.

‘‘कुठलं स्टेशन आहे ?’’ कोणीतरी विचारले.

‘‘वजीराबाद असावं,’’ मी बाहेर पाहत म्हटले.

थोडा वेळ गाडी तेथे थांबली. पण सुटण्यापूर्वी एक लहानशी घटना घडली. शेजारच्या डब्यातला एक माणूस पाणी आणण्यासाठी खाली उतरला होता आणि नळावर जाऊन तांब्यात पाणी भरत होता; पण अचानक धावतच आपल्या डब्याकडे परत आला. हिंदकळणाऱ्या तांब्यातून पाणी सांडत होते. पण त्याच्या धावण्यावरूनच सगळे काही लक्षात येण्यासारखे होते. नळावर आणखी तीन-चार माणसं उभी असावीत— तीही इकडे तिकडे आपापल्या डब्याकडे धावत सुटली. अशा तऱ्हेने घाबरून पळणारे लोक मी पाहिले होते. पाहता पाहता प्लॅटफॉर्म रिकामा झाला. पण डब्यात अजूनही हास्यविनोद चालू होता.

‘‘कुठंतरी काहीतरी गडबड दिसतेय,’’ माझ्याशेजारी बसलेले दुबळे महाशय बोलले.

कुठंतरी काहीतरी होतं; पण काय होतं, कुणालाही नीटसं कळत नव्हतं. मी अनेक दंगे पाहिले होते. म्हणून वातावरणात झालेला थोडासा बदलही मी ओळखू शकत होतो. पळणारे लोक, खाडकन बंद होणारी दारे, घरांच्या छतांवर उभे असलेले लोक, शांतता, सामसूम, सगळी दंग्याची चिह्नं होती.

तेवढ्यात मागच्या दाराशी म्हणजे प्लॅटफॉर्मच्या उलट दिशेला उघडणाऱ्या दाराशी— थोडासा गोंधळ ऐकू आला. कोणीतरी प्रवासी आत घुसू पाहत होता.

‘‘कुठं घुसतोस ? जागा नाही इथं. सांगितलं ना जागा नाही,’’ कोणी तरी म्हणाले.

‘‘बंद करा हो दार. कुणीही येतो अन् डब्यात घुसायला बघतो !’’ ...तऱ्हेतऱ्हेचे आवाज येत होते.

डब्याच्या बाहेर उभा असलेला प्रवासी डब्यात शिरायचा प्रयत्न जोवर करतो,

तोवर डब्यातले प्रवासी त्याला विरोध करतात. पण एकदाचा कसाबसा तो आत शिरला म्हणजे विरोध मावळून जातो आणि तो प्रवासी त्या डब्यातल्या जगाचा रहिवासी होऊन जातो आणि पुढचे स्टेशन आले की तोच सर्वात आधी पुढे होऊन बाहेरून आत घुसू पाहणाऱ्या प्रवाशांवर ओरडू लागतो— ''जागा नाही. पुढच्या डब्यात जा... कुठंही घुसतात...''

दाराजवळचा गोंधळ वाढू लागला होता. तेवढ्यात एक फाटक्या-मळक्या कपड्यातला आणि खाली झुकलेल्या मिशा असलेला माणूस दारातून आत घुसत असलेला दिसला. मळकट, मेणकट कपडे म्हणजे नक्कीच हलवाई असला पाहिजे. लोकांच्या आरडाओरडीकडे मुळीच ध्यान न देता तो काळ्या रंगाची एक पेटी आत ओढू लागला.

''या, आत या, तुम्ही पण चढा !'' आपल्या मागून येणाऱ्या कुणाला तरी तो म्हणत होता. तेवढ्यात दारात एक सडपातळ, वाळलेली बाई दिसली आणि तिच्या पाठोपाठ एक सोळासतरा वर्षांची सावळी मुलगी आत आली. लोक अजूनही ओरडत होते. सरदारजींना तर आपले बूड उचलून बसावे लागले.

''बंद करा हो ते दार, विचार ना पूस, सरळ घुसतात आतमध्ये. यांच्या बापाचं घर आहे का, येऊ देऊ नका आत. काय करतात बघू, द्या मागे ढकलून...'' आणखी काही माणसं ओरडत होती.

तो माणूस आपलं सामान आत ओढत आणीत होता आणि त्याची बायको व मुलगी संडासाच्या दाराला टेकून उभी होती.

''दुसरा कुठला डबा नाही का सापडला ? बायामाणसांनाही इथंच घेऊन आला ?''

तो माणूस घामाने चिंब झाला होता आणि धापा टाकीत सामान आत ओढत आणीत होता. पेटी आणल्यानंतर तो दोऱ्यांनी बांधलेल्या खाटेच्या फळ्या आत आणू लागला.

''तिकिट आहे हो माझ्याकडे. मी काही विदाउट तिकिट नाही. नाइलाज आहे. गावात दंगा चालू आहे. कसाबसा स्टेशनपर्यंत आलो. हे ऐकल्यावर डब्यातले बरेचसे लोक गप्प बसले, पण बर्थवर बसलेला पठाण पुढे सरसावत म्हणाला—''निकल जाओ इदर से. देखता नई ए, इदर जगा नइ ए.''

आणि पठाणाने आवेशाने पुढे होत वरूनच त्या माणसाला एक लाथ घातली, पण लाथ त्या माणसाला लागण्याऐवजी त्याच्या बायकोच्या छातीत लागली आणि ती रडतच खाली बसली.

प्रवाशांबरोबर भांडण करण्याइतका वेळ त्या माणसाजवळ नव्हता. तो आपले सामान व्यवस्थित आत आणण्यात मग्न होता. पण डब्यात शांतता पसरली. खाटेच्या

फळ्यांनंतर मोठमोठी गाठोडी आली. ते पाहून वर बसलेल्या पठाणाची सहनशक्ती संपुष्टात आली. ''निकालो इसे, कोन ए ये ?'' तो ओरडला. त्यावर खालच्या सीटवर बसलेल्या पठाणाने त्या माणसाची पेटी दारातून खाली ढकलून दिली. खाली लाल युनिफॉर्ममधला हमाल सामान आत देण्यासाठी उभा होता.

त्याच्या बायकोला मार लागला तेव्हा काही प्रवासी गप्प झाले होते. कोपऱ्यात बसलेली म्हातारी फक्त प्रेमळपणाने म्हणत होती— ''अरे भल्या माणसांनो, बसू द्या ना. ये, ये पोरी, तू माझ्या जवळ ये. कसातरी प्रवास पार पाडू. जाऊ द्या रे दुष्टांनो, बसू द्या यांना.''

अर्धअधिक सामान आत आलेलं होतं नव्हतं, तेवढ्यात अचानक गाडी सुरू झाली.

''सामान राहिलं ! सामान राहिलं ! तो माणूस हवालदिल झाल्यासारखा ओरडला.

''बाबा, सामान राहिलं,'' संडासाजवळ उभी असलेली मुलगी सर्वांगाने थरथरत होती आणि ओरडत होती.

''उतरा, खाली उतरा,'' तो माणूस गडबडीतच ओरडला आणि पुढे होत खाटेच्या फळ्या, गाठोडी खाली टाकीत दाराच्या दांडीला धरून खाली उतरला. त्याच्या पाठोपाठ त्याची भेदरलेली मुलगी आाणि तिच्या पाठोपाठ त्याची बायको दोन्ही हात छातीवर धरीत कण्हत कण्हत खाली उतरली.

''फार वाईट काम केलं तुम्ही लोकांनी. फार वाईट,'' म्हातारी मोठमोठ्याने म्हणाली— ''तुमच्या काळजातली कळ मरून गेलीय. त्याच्याबरोबर लहान पोरगी होती. निर्दय कुठले ! फार वाईट केलं, धक्के मारून उतरवलंत !''

रिकामा प्लॅटफॉर्म मागे टाकीत गाडी पुढे निघाली. डब्यात व्याकूळ मौन पसरले होते. म्हातारी बोलायची थांबली. पठाणांना विरोध करायची हिम्मत कुणातच नव्हती.

तेवढ्यात माझ्या शेजारी बसलेल्या दुबळ्या महाशयांनी माझ्या खांद्यावर हात ठेवला. तो म्हणाला, ''आग लागली आहे. ती पहा आग लागली आहे.''

गाडी प्लॅटफॉर्म सोडून पुढे आली होती आणि शहर मागे पडू लागले होते. त्याच वेळी शहरातून निघणारे धुराचे लोट आणि त्यात चमकणाऱ्या आगीच्या ज्वाळा दिसू लागल्या होत्या.

—दंगा झालाय. स्टेशनावरही लोक पळत होते. कुठंतरी दंगा झालाय.

शहरात आग लागलेली होती. डब्यातल्या प्रवाशांना ही गोष्ट कळली आणि आगीचे दृश्य पाहण्यासाठी ते खिडक्यांकडे धावू लागले.

गाडी शहर सोडून पुढे निघाली तेव्हा डब्यात एकदम शांतता पसरली. मी वळून डब्यात पाहिले. दुबळ्या महाशयांचा चेहरा पिवळा पडला होता आणि कपाळावर साठलेला घाम एखाद्या प्रेताच्या कपाळासारखा चमकत होता. आपापल्या जागी बसलेल्या सर्वच

प्रवाशांनी आपल्या जवळपास बसलेल्या लोकांकडे पाहून घेतले आहे असे मला वाटले. सरदारजी उठून माझ्या सीटवर येऊन बसले. खालच्या सीटवर बसलेला पठाण उठला आणि वरच्या बर्थवर बसलेल्या आपल्या दोन साथीदारांच्या जवळ जाऊन बसला. आगगाडीच्या बाकीच्या डब्यांतूनही बहुधा अशीच क्रिया होत असावी. डब्यातील वातावरणात ताण निर्माण झाला. लोकांनी गप्पा मारायचं बंद केलं. तिन्ही पठाण वरच्या बर्थवर एकत्र बसून मुकाट्याने खाली पाहत होते. सर्व प्रवाशांचे डोळे पहिल्यापेक्षा जास्त विस्फारलेले आणि शंकाळू झालेले दिसत होते. गाडीच्या सर्व डब्यांतून हीच अवस्था जाणवत असावी.

''कोणते स्टेशन आहे हे ?'' डब्यातल्या कुणीतरी विचारले.

''वजीराबाद,'' कुणीतरी उत्तर दिले.

उत्तर ऐकताच डब्यात आणखी एक प्रतिक्रिया झाली. पठाणांच्या मनावरचा ताण एकदम सैल झाला तर हिंदू आणि शीख प्रवासी आणखी गप्प झाले. एका पठाणाने आपल्या जाकिटाच्या खिशातून तपकिरीची डबी काढली आणि तो तपकीर ओढू लागला. म्हातारीचे माळ ओढणे चालूच होते. कधीमधी तिचे पुटपुटणारे ओठ दिसायचे. त्यातून पोकळ आवाज निघत आहेत अस वाटायचे.

पुढच्या स्टेशनावर गाडी थांबली. तिथे पूर्ण शांतता होती. एक चिटपाखरूसुद्धा नव्हतं. एक पाणक्या पाठीवर पाण्याची पखाल घेऊन आला आणि प्रवाशांना पाणी पाजू लागला.

''घ्या, पाणी घ्या. पाणी घ्या.'' बायकांच्या डब्यातून अनेक बायकांचे आणि मुलांचे हात बाहेर आले होते.

''बरीच मारहाण आणि कापाकापी झाली आहे. बरेच लोक मेले आहेत. या अंधाधुंदीत हा एकटा पुण्य कमवायला निघालेला दिसतो.''

गाडी हलली, त्याबरोबर खिडक्या बंद झाल्या. चाकांच्या खडखडाटात खिडक्या बंद केल्या जात असल्याचे आवाज बराच वेळ येत राहिले.

कुठल्यातरी अज्ञात भयाने ते दुबळे महाशय माझ्याजवळच्या सीटवरून उठले आणि दोन बाकांच्या मधल्या जागेत आडवे झाले. त्यांचा चेहरा अजूनही एखाद्या प्रेतासारखा पिवळा दिसत होता. बर्थवर बसलेल्या पठाणाने यावरून त्यांची चेष्टा केली— ''अरे ए बेशरम्या, तू मुडदा आहेस का बाई आहेस ? सीटवरून उठून खाली आडवं व्हायला काय झालं ? मर्दाच्या जातीला बदनाम करतोस काय ?'' तो बोलत होता आणि बोलता बोलता सारखं हसत होता. मग तो पश्तोमध्ये त्याला काहीतरी सांगू लागला. हे महाशय गप्प पडून राहिले. बाकीचे सर्व प्रवासीही गप्पच होते. डब्यातले वातावरण जड झाले होते.

—''ऐसे आदमी को अम डब्बे में बैठने नई देगा. ओ बाबू, तुम अगले स्टेशनपर

उतर जाओ और जनाना डब्बे में बैठो.''

पण महाशयांची सगळी समयसूचकता त्यांच्या गळ्यात कोरडी पडू लागली होती. गप्प बसून राहिले. पण जरा वेळाने आपल्या सीटवर जाऊन बसले आणि बराच वेळ आपल्या कपड्यांवरची धूळ झटकत राहिले; हा माणूस उठून खाली आडवा का झाला होता ? बाहेरून दगडफेक होईल किंवा गोळ्या येतील अशी भीती त्याला कदाचित वाटत असावी. खिडक्याही त्याचमुळे बंद होत होत्या.

काहीही सांगणे कठीण होते. कदाचित एखाद्या प्रवाशाने कशासाठी तरी खिडकी बंद केली असेल आणि त्याचे पाहून इतरांनीही काहीही विचार न करता धडाधड खिडक्या बंद करायला सुरवात केली असेल.

जड आणि अनिश्चित वातावरणात प्रवास चालू होता. रात्र गडद होऊ लागली होती. डब्यातले प्रवासी गुपचूप पण साशंक बसलेले होते. कोणी कसलीही हालचाल करीत नव्हता. गाडीचा वेग मध्येच अचानक मंद व्हायचा तेव्हा सगळेजण एकमेकांकडे पहायचे. मध्येच वाटेत गाडी थांबली की डब्यातली शांतता एकदम वाढायची. फक्त पठाण निश्चिंत बसले होते. पण त्यांनीही गप्पा मारणे बंद केले होते. कारण त्यांच्या गप्पात कोणीच सामील होणार नव्हते.

हळूहळू पठाण डुलक्या घेऊ लागले. बाकीचे प्रवासी मात्र उदास नजरेने शून्यात पाहत होते. म्हातारीने हाततोंड झाकून घेतले होते. सीटवर मांडी घालून ती झोपी गेली होती. वरच्या बर्थवरच्या एका पठाणाने पडल्यापडल्याच अंगरख्याच्या खिशातून काळ्या मण्यांची एक माळ काढली आणि तो हळूहळू ती माळ हातात फिरवू लागला.

खिडकीबाहेर आकाशात चंद्र उगवला आणि त्यामुळे बाहेरचे जग चांदण्यात अधिकच संदिग्ध आणि गूढ वाटू लागले. मधूनच कुठे तरी आगीच्या ज्वाळा भडकलेल्या दिसायच्या. एखादे गाव जळत असावे. गाडी कधी मोठ्याने आवाज करीत पुढे जायची तर कधी तिचा वेग एकदम कमी व्हायचा आणि मग कितीतरी मैल ती तशीच मंद गतीने जात रहायची.

अचानक दुबळ्या महाशयांनी खिडकीबाहेर पाहिले आणि ते ओरडले—''हरबंसपुरा मागे गेले !'' त्यांच्या आवाजात आवेश होता. किंचाळल्यासारखा आवाज होता. डब्यातले लोक तो आवाज ऐकून दचकले. त्याच वेळी डब्यातल्या बहुतेक प्रवाशांनी जणू काही त्यांचा आवाज ऐकूनच कूस बदलली.

—''ओ बाबू, ओरडतोस कशाला ?'' माळवाला पठाण दचकून म्हणाला— ''इथे उतरणार आहेस का तू ? ओढू का जंजीर ?'' असे म्हणून खो खो हसू लागला. हरबंसपुरा म्हणजे काय प्रकरण आहे व त्या नावाचा अर्थ काय आहे हे त्याला माहीत नव्हते हे उघडच आहे.

महाशय काही बोलले नाहीत. त्यांनी फक्त मान हलवली आणि एकदोन वेळा पठाणांकडे पाहून मग खिडकीबाहेर बघू लागले.

डब्यात पुन्हा शांतता पसरली. तेवढ्यात इंजिनाची शिट्टी झाली आणि त्याच्या गतीची लय बिघडली. थोड्याच वेळात खटाक् असा आवाज ऐकू आला. बहुधा गाडीने लाइन बदलली असावी. गाडी ज्या दिशेने वळली होती तिकडे महाशय डोकावून पाहू लागले.

''शहर आले आहे !'' ते पुन्हा मोठ्या आवाजात ओरडले— ''अमृतसर आले आहे !'' ते पुन्हा म्हणाले आणि उसळून उभे राहिले. मग वरच्या बर्थवरील पठाणाकडे पाहत ओरडले— ''अरे ए, पठाण के बच्चे ! खाली उतर तुझ्या माय... उतर खाली. तुला पठाण बनवणाऱ्या तुझ्या मायची...''

महाशय ओरडत होते आणि ओरडत ओरडत शिव्याही देऊ लागले होते. माळवाल्या पठाणाने कूस पालटली आणि महाशयांकडे पाहत म्हणाला, ''ओ क्या ए बाबू ? अम को कुछ बोला ?''

महाशय उत्तेजित झालेले पाहून बाकीचे प्रवासीही उठून बसले.

''उतर खाली ! तेरी मैं... औरत को लात मारता है, हरामजादे, तेरी उस...''

''ओ बाबू बकबक नई करो, अरे ए काडी पैलवान, शिव्या द्यायचं काम नाही. सांगतो. अम तुमारा जबान खींच लेगा.''

''शिव्या देतोस मादर...'' महाशय ओरडले आणि उसळून सीटवर उभे राहिले. त्यांचे सर्व अंग थरथरत होते.

''बास. बास,'' सरदारजी म्हणाले— ''ही भांडायची जागा नाही. थोडाच प्रवास उरलाय, आरामात बसा.''

''तुझा लाथ मारणारा पाय तोडला नाही तर बोल. गाडी काय तुझ्या बापाची आहे ?''— महाशय किंचाळले.

—''ओ अमने क्या बोला. सगळे जण त्याला बाहेर हाकलत होते म्हणून आम्ही पण बाहेर हाकलले. ये इदर अमको गाली देता ए. अम इसका जबान खींच लेगा.''

म्हातारी मध्येच म्हणाली— ''अरे बाळा, बस जरा आरामात. अरे, देवाच्या भक्तांनो, जरा शुद्धीवर या !''

तिचे ओठ एखाद्या प्रेताच्या ओठासारखे थरथरत होते आणि त्यांच्यातून क्षीण पुटपुटल्यासारखा आवाज येत होता.

महाशय ओरडतच होते— ''आपल्या घरात शेर बनत होता का ? आता बोल. तेरी मैं उस पठान बनानेवाली की...''

तेवढ्यात गाडी अमृतसरच्या प्लॅटफॉर्मवर थांबली. प्लॅटफॉर्मवर लोक खचून भरले होते. प्लॅटफॉर्मवरचे लोक डोक-डोकावून डब्यात पाहू लागले. लोक सतत एकच प्रश्न

विचारीत होते— ''तिकडे काय झाले ? कुठे दंगा झाला आहे का ?''

खचाखच भरलेल्या प्लॅटफॉर्मवर कदाचित एवढ्या एकाच गोष्टीची चर्चा चालू होती. 'तिकडे काय घडले ?' प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या एकदोन फेरीवाल्यांवर प्रवासी तुटून पडले होते. सगळ्यांनाच भुकेने आणि तहानेने अचानक हैराण केले होते. याच सुमारास तीन-चार पठाण आमच्या डब्यासमोर आले. ते आत वाकून बघत होते. आपले पठाण बांधव दिसताच ते त्यांच्याशी पश्तोमधून काहीतरी बोलू लागले. मी वळून पाहिले, महाशय डब्यात नव्हते. ते डब्यातून केव्हा बाहेर पडले काही कळले नाही. काहीतरी अनिष्ट घडणार. रागाने ते वेडे झाले होते. काय करतील सांगता येत नाही. पण तेवढ्यात ते तीन पठाण आपापली गाठोडी घेऊन बाहेर पडले आणि आपल्या पठाण बांधवांबरोबर गाडीच्या पुढच्या डब्यांकडे चालू लागले. आधी डब्यात विभाजन झाले होते. आता संपूर्ण गाडीत विभाजनाची प्रक्रिया सुरू झाली.

फेरीवाल्यांच्या पुढची गर्दी कमी होऊ लागली. लोक आपापल्या डब्यांकडे वळले. तेवढ्यात एका बाजूने महाशय येत असलेले मला दिसले. त्यांचा चेहरा अजूनही पिवळट दिसत होता आणि केसांची झुलपे कपाळावर आली होती. जवळ जाऊन पाहिले तर त्यांच्या उजव्या हातात लोखंडाचा एक गज दिसला. तो त्यांना कुठे मिळाला कोण जाणे ! डब्यात शिरताना त्यांनी गज आपल्या पाठीशी लपवला आणि माझ्या शेजारच्या सीटवर बसायच्या आधी हळूच सीटखाली सरकवला. सीटवर बसताच त्यांचे डोळे पठाणाला शोधण्यासाठी वर पाहू लागले; पण डब्यात पठाण नाहीत हे कळताच ते त्वरेने चारी बाजूंना पाहू लागले.

''पळून गेले हरामी, मादर... सगळेच पळून गेले.'' मग ते गडबडीने उठून उभे राहिले व ओरडत म्हणाले, ''तुम्ही लोकांनी त्यांना का जाऊ दिले ? तुम्ही सगळे नामर्द आहात, भित्रे आहात !''

पण गाडीत खूप गर्दी होती. बरेच नवे प्रवासी आले होते. कुणी त्यांच्याकडे विशेष लक्ष दिले नाही.

गाडी हलू लागली तेव्हा ते माझ्या शेजारच्या सीटवर येऊन बसले. पण ते फारच आवेशात होते. त्यामुळे बराच वेळ बडबडत राहिले.

हळूहळू हिसके देत गाडी पुढे निघाली. डब्यातल्या जुन्या प्रवाशांनी पोटभर जेवण केले होते, पाणी प्यायले होते आणि आता त्यांच्या जिवाला वा सामानाला धोका नाही अशा प्रदेशातून गाडी पुढे चालली होती.

नवे प्रवासी गप्पा मारीत होते. हळूहळू गाडी नियमित तालात चालू लागली होती. थोड्याच वेळात लोक पेंगायलाही लागले. पण महाशय अजूनही उघड्या टक्क डोळ्यांनी पुढे पाहतच होते. पठाण डब्यातून उतरून कुणीकडे गेले म्हणून मला पुनःपुन्हा विचारीत

होते. ते झपाटले गेले होते.

गाडीच्या आंदोळात मीही पेंगू लागलो होतो. डब्यात आडवं व्हायची सोय नव्हती. बसल्या बसल्याच माझे डोके एकदा या बाजूला तर एकदा त्या बाजूला कलंडत होते. मधेच एखाद्या धक्क्याने माझी झोप उडायची आणि समोरच्या सीटवर अस्ताव्यस्त पसरलेल्या सरदारजींचे घोरणे ऐकू यायचे—अमृतसर आल्यानंतर सरदारजी पुन्हा समोरच्या सीटवर पाय पसरून मस्त आडवे झाले होते. डब्यात प्रवासी वेड्यावाकड्या अवस्थेत पडलेले होते. त्यांच्या बीभत्स मुद्रा पाहून असे वाटत होते की डबा जणू प्रेतांनी भरला आहे. शेजारच्या महाशयांकडे पाहावे तर ते कधी खिडकीच्या बाहेर तोंड काढून पाहत असलेले तर कधी बाकाला पाठ लावून ताठ बसलेले दिसत होते.

कधीकधी गाडी एखाद्या स्टेशनावर थांबायची तेव्हा चाकांचा खडखडाट बंद व्हायचा अन् नि:स्तब्धता पसरायची. तेव्हा वाटायचं की जणू काही प्लॅटफॉर्मवर काहीतरी पडलं आहे किंवा कुणीतरी प्रवासी गाडीतून खाली उतरला आहे, आणि मी एकदम उठून बसायचो.

अशीच एकदा माझी झोप मोडली तेव्हा गाडीचा वेग कमी झाला होता आणि डब्यात अंधार होता. मी तसेच पडल्या पडल्या खिडकीतून बाहेर पाहिले. दूरवर मागच्या बाजूला कुठल्यातरी स्टेशनचे सिग्नलचे लाल दिवे चमकत होते. कुठले तरी स्टेशन पार करून गाडी पुढे आली आहे हे निश्चित पण अजून तिला वेग आला नव्हता.

डब्याच्या बाहेर मला हळू, अस्फुट आवाज ऐकू आला. दूरवर एक धूसर काळा पुंजकाही दिसत होता. झोपेच्या अमलात माझे डोळे बराच वेळ तिकडे लागून राहिले; पण तो काय असावा हे जाणून घेण्याचा नाद शेवटी मी सोडून दिला. डब्यात अंधार होता. दिवे बंद केलेले होते. पण बाहेर फटफटू लागले आहे असे वाटत होते.

माझ्या पाठीमागे डब्याबाहेर कसल्यातरी वस्तूचा घासण्याचा आवाज आला. मी वळून दाराकडे पाहिले. डब्याचे दार बंद होते. मला पुन्हा दार खरवडल्यासारखा आवाज आला. मग तर मला स्पष्टच ऐकू आले. कोणीतरी माणूस काठीने डब्याचे दार बडवीत होता. मी वाकून खिडकीबाहेर पाहिले. खरोखरच एक माणूस डब्याच्या दोन पायऱ्या चढून वर आला होता. त्याच्या खांद्यावर एक गाठोडं लोंबत होतं. हातात काठी होती, त्याचे कपडे मळकट होते आणि तो दाढीवाला होता. मग माझी नजर बाहेर खालच्या बाजूला गेली. गाडीबरोबर एक बाई धावतपळत येत होती. अनवाणी आणि तिच्या जवळ दोन गाठोडी होती. ओझ्यामुळे तिला पळता येत नव्हते. डब्याच्या पायरीवर उभा असलेला तो माणूस पुन:पुन्हा तिच्याकडे वळून पाहत होता आणि धापा टाकीत म्हणत होता— ''ये, ये, तू पण चढ, ये !''

दारावर पुन्हा काठीचा ठक्‌ठक् आवाज आला— ''दार उघडा हो, खुदा के वास्ते दरवाजा खोलो !''

तो माणूस धापा टाकीत होता— ''खुदा के लिए दरवाजा खोलो, मेरे साथ में औरत जात है. गाडी निकल जायेगी...''

अचानक मी पाहिले. महाशय त्वरेने उठून दाराजवळ गेले आहेत आणि दाराच्या खिडकीतून तोंड बाहेर काढीत म्हणताहेत— ''कोण आहे ? इथे जागा नाही.''

बाहेरा उभा असलेला माणूस पुन्हा विनवण्या करू लागला— ''खुदा के वास्ते, गाडी निकल जायेगी...''

आणि तो माणूस आपला हात खिडकीतून आत घालीत दरवाजा उघडण्यासाठी खिट्टी शोधू लागला.

''सांगितलं ना जागा नाही म्हणून. उतर गाडीतून खाली,'' महाशय ओरडले आणि त्यांनी त्याच क्षणी फटकन दार उघडले.

''या अल्लाह !'' त्या माणसाच्या तोंडचे शब्द अस्पष्टपणे ऐकू आले. दार उघडल्याबरोबर त्याने जणू काही समाधानाचा सुस्कारा सोडला.

आणि त्याच वेळी मला त्या महाशयांच्या हातातला गज चमकताना दिसला. त्यांनी त्या प्रवाशाच्या डोक्यावर एकच जोरदार वार केला होता. ते पाहून मी घाबरलो आणि माझे पाय थरथर कापू लागले. त्या माणसावर गजाचा काहीच परिणाम झाला नाही असे मला वाटले. त्याने दोन्ही हातांनी दाराची दांडी अजूनही पकडलेली होती. खांद्यावरचं गाठोडं घसरून कोपरावर आलं होतं.

आणि अचानक त्याच्या चेहऱ्यावरून रक्ताच्या दोन-तीन धारा वाहू लागल्या. अर्धवट प्रकाशात मला त्याचे उघडे ओठ आणि चमकणारे दात दिसले. त्याने एक-दोन वेळा 'या अल्ला!' म्हटले आणि मग त्याचे पाय डळमळले. त्याचे डोळे त्या महाशयांकडे पाहत होते. अर्धवट बंद झालेले डोळे हळूहळू आकुंचन पावत जाणारे, जणू काही त्याची ओळख पटवून घेत होते की हा कोण आहे आणि कोणत्या वैराचा बदला घेत आहे. दरम्यान अंधार आणखी कमी झाला होता. त्याचे ओठ पुन्हा थरथरले आणि त्यातून त्याचे शुभ्र दात पुन्हा चमकले. मला वाटले की तो हसतो आहे; पण वेदनेमुळेच खरोखर त्याच्या ओठांची तशी हालचाल होत होती.

खाली रुळाशेजारून धावणारी बायको बडबडत रागावत येत होती. काय झाले आहे हे तिला अजूनही समजले नव्हते. गाठोड्यामुळे आपल्या नवऱ्याला नीटपणे गाडीवर चढता येत नाही, पाय नीट ठेवता येत नाही असेच तिला वाटत होते. ती गाडीबरोबर धावत होती. आपली दोन्ही गाठोडी सांभाळत नवऱ्याचा पाय धरून पायरीवर ठेवायचा प्रयत्न करीत होती.

तेवढ्यात दाराच्या दांडीवरून त्या माणसाचे दोन्ही हात सुटले आणि तो तोडलेल्या वृक्षासारखा खाली कोसळला. तो पडल्याबरोबर बायको धावायची थांबली. जणू काही दोघांचाही प्रवास एकदमच संपला होता.

महाशय अजूनही माझ्याजवळ डब्याच्या उघड्या दरवाजात पुतळ्यासारखे निस्तब्ध उभे होते. लोखंडी गज अजूनही त्यांच्या हातात होता. मला वाटलं की त्यांना तो गज फेकून द्यायचा आहे; पण फेकू शकत नव्हते, हातच उचलू शकत नव्हते. माझा श्वास जोरात चालू होता आणि डब्यातल्या अंधाऱ्या कोपऱ्यात खिडकीला चिकटून बसून मी त्यांच्याकडे पाहत राहिलो होतो.

महाशयांच्या शरीरात चलनवलन सुरू झाले. एका झटक्यात उठून त्यांनी गज डब्याबाहेर फेकून दिला. मग वळून डब्यात डावी-उजवीकडे पाहू लागले. सगळे प्रवासी झोपलेले होते. त्यांनी माझ्याकडे पाहिले नाही.

थोडा वेळ उभे राहून डोलत होते. मग वळून दार बंद केले. काळजीपूर्वक आपल्या कपड्यांकडे पाहिले. आपले दोन्ही हात निरखले, दोन्ही हात नाकापाशी नेऊन वास घेतला. हाताला रक्ताचा वास तर येत नाही ना हे पाहण्यासाठी. मग हळूच चालत येऊन माझ्या शेजारच्या सीटवर बसले.

हळूहळू संधिप्रकाश जाऊन दिवस उगवला. सगळीकडे स्वच्छ निर्मळ प्रकाश पसरू लागला. साखळी ओढून कोणीही गाडी थांबवली नव्हती. गजाचा मार बसलेला देह कित्येक मैल मागे पडला होता. समोर गव्हाच्या शेतात पुन्हा मंद मंद लाटा पसरू लागल्या होत्या.

सरदारजी अंग खाजवीत उठून बसले. माझ्या शेजारी बसलेले महाशय दोन्ही हात डोक्याच्या मागे ठेवून समोर पाहत होते. रात्रीतून त्यांच्या चेहऱ्यावर लहानलहान खुंट उगवले होते. त्यांना आपल्या समोर बसलेले पाहून सरदारजी गप्पा मारू लागले— "फार धाडशी आहात हो तुम्ही. दिसता दुबळे पतले, पण बडे हिम्मतवाले आहात. खूप धाडस दाखवलेत. तुम्हाला घाबरूनच ते पठाण या डब्यातून निघून गेले. या डब्यात थांबले असते तर एकाची तरी खोपडी तुम्ही दुरुस्त केली असती..." आणि सरदारजी हसू लागले.

उत्तर म्हणून महाशय हसले— एक बीभत्स हास्य, आणि बराच वेळ सरदारजीच्या चेहऱ्याकडे पाहत राहिले.

●

# वाळवी

**रामकुमार**

बंद दारावर अचानक कोणीतरी ठकठक आवाज केला. तो ऐकून तो दचकला. या वेळी कोण आले असावे ? घाबरल्यामुळे खाटेवरून उठून दाराची कडी उघडणे अशक्यच वाटू लागले. त्याने दोन्ही खिडक्यांकडे पाहिले. त्या बंद होत्या. खोलीत कोणी येऊ शकणार नाही या विचाराने त्याला बरे वाटले. अशा अवेळी जो कोणी दार वाजवीत असेल तो कदाचित थोड्या वेळाने आपोआपच परत जाईल. गेलाही असावा परत नाहीतर परत दार वाजवले नसते का ? पण कोण असावे आणि कशासाठी आले असावे हे जाणून घ्यायची उत्सुकताही काही कमी नव्हती.

त्याच क्षणी पुन्हा कोणीतरी दाराला स्पर्श केला. तो लगेच खाटेवरून उठून उभा राहिला. पायजम्याच्या घड्या नीट केल्या. पायजामा खूपच मळलेला आहे. पण आता तो काढून पँट घालण्याइतका वेळ नाही. थंडीमुळे त्याच्या अंगावर शहारे आले. हिवाळ्यात रात्री तो आठ वाजताच बिछान्यात शिरत असे आणि थंड वाऱ्यापासून बचाव म्हणून तिन्ही बाजूंनी रजई दुमडून घेत असे. तिसऱ्या वेळी त्या मोडक्या दरवाजाच्या दोन्ही फळ्या करकरल्या. आता जर लगेच दार उघडले नाही तर ते आपल्या अंगावर पडेल अशी भीती त्याला वाटली. तो वेगाने पुढे झाला आणि त्याने खाडकन कडी काढली.

गच्चीवर पसरलेल्या अंधारात एक धूसर आकृती दिसली. तिचे अस्तित्व भुतापेक्षा किंवा सावलीपेक्षा काही वेगळे जाणवत नव्हते.

''कोण आहे ?'' आपली भीती कमी व्हावी म्हणून तो जरा मोठ्यानेच ओरडला.

आकृतीने काही उत्तर दिले नाही; पण संकोचत एक पाऊल तिने पुढे टाकले. त्यामुळे दारातून बाहेर येणाऱ्या उजेडात चेहरा ओळखीच्या कक्षेत आला.

''तुम्ही...!'' मोठ्या मुश्किलीने त्याच्या तोंडातून आवाज बाहेर पडला. त्याचे पाय गच्चीत रुतले आणि दाराचा आधार घेतला नसता तर तो कदाचित खाली पडला असता. काही क्षण त्याचे डोके जोरजोरात गरगरले.

ते स्वत:च खोलीत आले. हातात फक्त एक पिशवी होती. ती त्यांनी कोपऱ्यात

ठेवली आणि मग ते खाटेवर बसले. कारण संपूर्ण खोलीत बसण्यासाठी तेवढी एकच जागा होती.

''काही निरोप पाठवला नाही अन् अशा वेळी...!'' त्याचा अजून स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसत नव्हता. त्यांच्या चेहऱ्याकडे पाहताच त्याला जाणवले की काहीही बोलण्याची थोडीसुद्धा ताकद त्यांच्याजवळ नाही. त्यांचा तो पिवळा पडलेला वाळकुटा चेहरा, खोल गेलेले डोळे, त्यांना दिसत नसावं असा भ्रम सहजच होऊ शकला असता. आगगाडीच्या धुळीने माखलेले कपडे—तो पाहत राहिला आणि ते खाली जमिनीकडे बघत राहिले, जणू काही तो आता काय निकाल देतो आहे त्याची वाट पाहत आहेत.

''तुम्ही खूप दमल्यासारखे दिसता. हातपाय तोंड धुऊन घ्या. मी चहा करतो.''

त्यांनी त्याचे बोलणे ऐकले नाही. त्याने क्षणभर त्यांच्या चेहऱ्याकडे नजर टाकली; पण काहीसुद्धा दिसले नाही. त्याला तरी काय पहायचं होतं ? त्यांनी येथे येण्याची हिम्मत कशी केली ? कारण गेल्या आठ वर्षांत त्यांच्यात एक पोस्टकार्ड पाठवण्या-इतकाही संबंध राहिलेला नव्हता. त्यांच्यामध्ये होती फक्त एक काटेरी तार. ती वारंवार तोडली मोडली गेल्यामुळे इतकी गुंतागुंतीची झाली होती की ती ओलांडून जाण्यासाठी आवश्यक असणारा बराचसा काळ आणि धैर्य त्या दोघांपैकी कोणाच्याही जवळ नव्हते. ते ओलांडून का आले असावेत ?

खोलीच्या एका कोपऱ्यात जमिनीवर ठेवलेला स्टोव्ह त्याने पेटवला आणि दोन कप आधण ठेवले. स्टोव्हचा धूर खोलीभर पसरू लागला. त्याने दार उघडले. त्यामुळे थंड वाऱ्याचा एक झोत आत आला आणि तो शहारला. दिवसभराच्या परिश्रमामुळे त्याचे शरीर इतकं काही थकलं होतं की खाटेवर जाऊन पांघरुणात पडून राहावं असं त्याला वाटत होतं. त्यांनी बिछाना आणलेला नाही तेव्हा ते कुठे झोपणार याचाही विचार तो करीत होता. आपल्याजवळ आणखी एखादी गादी असेल असं तर त्यांना वाटलं नसेल ? एक फाटकं घोंगडं कुठंतरी पडलेलं असेल.

स्टोव्हची ज्योत भडकू लागली होती आणि पाण्याला उकळी येईपर्यंत ती तशीच राहील का यावर तो विचार करीत होता. सहजच खाटेकडे नजर गेली. ते झोपले असावेत असे वाटले. ते झोपलेच होते. एक डुलकी लागली होती. डोके खांद्याच्या आधाराने टेकले होते. तोंड उघडे होते. त्यातले दोन पिवळे दात खोलीतल्या मंद उजेडातसुद्धा चमकत होते. त्यांचा श्वास तर थांबला नाही ना अशी शंका त्याला आली. पण जवळ गेल्यावर मंद सुरात त्यांचे घोरणे ऐकून तो निश्चिंत झाला. पाण्याला उकळी आली होती. थोड्याशा पाण्याने त्याने उष्टा कप धुतला आणि त्यांच्यासाठी कपभर चहा तयार केला. दूध नसल्यामुळे स्वतः चहा पिण्याचा मोह त्याला सोडूनच द्यावा लागला.

"घ्या. चहा... हातपाय वगैरे मग धुवा..."

ते दचकून जागे झाले. गरम चहाचा पहिला घोट घशाखाली जाताच त्यांच्या चेहऱ्यावर जिवंतपणाच्या अस्पष्ट छटा दिसू लागल्या. डोळ्यांच्या कोपऱ्यातून ते खोलीचे निरीक्षण करू लागले. आपलं कुतूहल थोडं शांत करण्यासाठी आणि थोडं त्याच्या परिस्थितीची पाहणी करण्यासाठी.

ही खोली, कितीतरी दिवसात न रंगवलेल्या खोलीच्या भिंती, ही धूळ, ही घाण, जुन्यापुराण्या वस्तूंच्या दुकानासारखं खोलीभर पसरलेलं सामान. आणि त्याचा म्लान चेहरा, त्या चेहऱ्यातून आयुष्य एका एका थेंबाने निथळत त्याच्यापासून वेगळं झालेलं. पण ते काहीच बोलले नाहीत. ते सगळं पाहत राहिले, एखाद्या बघ्याप्रमाणे. त्याला जाणवलं, मी कोणत्या परिस्थितीत राहतो आहे, कसं काय जगतो आहे हे पाहण्यासाठी ते आले आहेत ! घर सोडल्यानंतर स्वत:च्या पायावर मी कसा उभा आहे—अचानक आपण पिंजऱ्यात आहोत असे जाणवून त्याचा जळफळाट आणखीनच वाढला.

एकदा त्यांच्या चेहऱ्याकडे पाहताना त्याला असे वाटले की ते हसताहेत. एका दृष्टिक्षेपातच त्यांना वस्तुस्थिती काय आहे ते कळले असावे. पण ते काही म्हणाले नाहीत. कोणत्या परिस्थितीत तोंड बंद ठेवले पाहिजे याचे अगदी बरोबर अनुमान त्यांना करता येते. त्याने जर खोलीत यायची परवानगीच दिली नसती तर त्यांनी काय केले असते, या स्थितीलाही तोंड देण्याची तयारी करून ते आले होते !

"तुझ्या घरी यावं असं मला कितीतरी वेळा वाटलं..." संकोचाने मंद स्वरात ते म्हणाले, "पण हिम्मत होत नव्हती."

तो हसू लागला. मुद्दामच मोठ्याने हसला. त्यामुळे त्यांना त्यांच्या मन:स्थितीची कल्पना यावी म्हणून.

"का ?"

पण त्याच्या "का ?"चे उत्तर देण्याऐवजी ते चहा पीत राहिले.

"मी कसा राहतोय हे तुम्हाला पहायचं होतं," तो उभ्या उभ्याच आवेशाने म्हणाला, "पाहिलंत ना आता ? ही खोली, हे सामान आणि हा मी... उद्या सकाळी सूर्यप्रकाशात आणखी नीट पाहून घ्या."

त्यांनी थोड्या आत्मविश्वासाने खिशातून बिडीचे बंडल काढले. आणि एक बिडी शिलगावली. थंडी वाजू नये म्हणून पाय वर ओढून घेतले.

"पण..." त्याचा प्रक्षोभ वाढला होता. "तुम्ही इथे आला कसे ?" इतकी वर्षे मध्ये गेली असूनही यापेक्षा अधिक काही बोलण्याचे धैर्य त्याला होत नव्हते. ते आल्यावर आपण एवढे प्रक्षुब्ध होणे हा आपला दुबळेपणा आहे असेही त्याला अचानक जाणवले.

"मी आता खूप थकलोय. दिवसभर आगगाडीत बसून बसून.... माझ्या झोपण्याची काही सोय होऊ शकेल ?"

''तुमचा बिछाना ?''

''माझ्याजवळ काहीच नाही.''

इथे दुसरी गादी असेल अशा आशेने तुम्ही आला होता का असे विचारावे असे त्याला वाटले; पण त्याचा व्यर्थपणा जाणवून त्याने मुकाट्याने खोलीच्या दुसऱ्या कोपऱ्यात पडलेल्या जुन्या फाटक्या कपड्यांतून एक जीर्ण फाटकी घोंगडी बाहेर काढली आणि झटकण्यासाठी तो ती घेऊन तो गच्चीवर गेला.

''तुम्ही उठा म्हणजे गादी घालतो. इथेच काहीतरी झोपायची सोय करायला हवी...''

चपला घालून ते बाहेर गच्चीवर आले. अंधारात आसपास काहीच दिसत नव्हते. दूर एका कोपऱ्यात धूसर उजेडात एखाद्या वस्तीचा आभास होत होता. रात्रीच्या नीरवतेत हिवाळी वारं त्यांना उदासवाणं वाटलं. कसलं विचित्र उदास शहर आहे... इथं कोणी कसं काय राहू शकतो ? तरीपण लोक राहत असणारच ! बच्चूही राहतोच आहे. बच्चूपण खूप वेगळाच दिसू लागला आहे, खूप बदललाही आहे.

''आत खोलीत या. गादी घातली आहे.'' त्याचा आवाज ऐकून ते दचकले.

''तुम्ही जेवून आला असालच. इथं काहीच शिल्लक नाही. तीन दिवसांचे शिळे पावाचे दोन टोस्ट उरले आहेत,'' त्याच्या स्वरात पहिल्यापेक्षा जास्त कर्कशपणा आला होता.

ते उदासवाण्या स्वरात म्हणाले, ''मी स्टेशनवरच खाऊन घेतले...''

''तुम्ही या खाटेवर झोपा. मी खाली...''

''मी खाली झोपतो. मला सवय आहे...''

''तुम्ही वरच... उद्या बघू.''

खोलीतला दिवा विझल्यावर दोघांना जोडणाऱ्या क्षीण तारा अचानक तुटल्या. दोघंही दोन लहान बेटांसारखे होऊन गेले आणि हळूहळू प्रवाहाबरोबर एकमेकापासून लांब जात राहिले. डोक्यावरून घोंगडं पांघरून घेतलेल्या बच्चूच्या मनात तीच एक गोष्ट पुन:पुन्हा घोळत होती. त्यामुळे त्याचा राग आणि चीड त्याला खोलात ओढून नेत होती. त्यांच्या अशा अचानक येण्याचं काय कारण असावं हे त्याला अजूनही कळत नव्हतं. आधी पत्र लिहून त्याला या परिस्थितीला तोंड देण्यासाठी तयार होऊ द्यायला पाहिजे होते ! पण मग तो त्यांना येऊ नका म्हणाला असता किंवा स्वत:च रजा घेऊन कुठंतरी निघून गेला असता अशी भीती त्यांना कदाचित वाटली असावी. पण आता उद्या भर दिवसा तो त्यांचा चेहरामोहरा, त्यांचं बोलणं, त्यांच्या सवयी. त्यांचा वास कसा काय सहन करू शकेल ? मनात निर्माण झालेल्या प्रश्नांच्या जाळ्यात अडकल्यामुळे फाटकी घोंगडी आणि सतरंजी यांच्यामध्ये आखडून झोपलेल्या त्याला

थंडी वाजत नव्हती. पण डोळ्यातली झोप उडून गेली होती. वर खाटेवर वडिलांच्या घोरण्याचा जोरदार आवाज ऐकून त्याचा प्रक्षोभ आणखीनच वाढला. या खोलीत माझ्या खाटेवर झोपताना पहिल्या दिवशी त्यांना झोपेचा प्रश्न पडला नाही. त्याला वाटलं की त्यांना गदागदा हलवून जागं करावं आणि म्हणावं की तुम्ही आडवे होऊ शकता; पण झोपू नाही शकत. तो अधिकार तुम्ही गमावला आहे.

कितीतरी दिवस ती रात्र त्याला भुतासारखी चिकटून राहिली होती आणि तिच्यापासून सुटका होणं अशक्यप्राय वाटत होतं. इतक्या वर्षांनंतरही ते दृश्य त्याच्या डोळ्यांसमोर स्पष्टपणे नाचत होतं. एक लहानशी बॅग घेऊन त्याने घर कायमचं सोडलं होतं. बंद खिडकीच्या काचेतून ते त्याची धूसर होत जाणारी आकृती पाहत होते; पण त्याला थांबवण्यासाठी त्यांनी तोंडातून एक चकार शब्दही काढला नाही. जर ते म्हणाले असते तर कदाचित त्याचा हा दुबळेपणा त्याच्या घर सोडून जाण्याच्या निश्चयाच्या वाटेत आला असता... असं नंतर कधी कधी त्याला वाटायचं. त्यावेळी ते किती असहाय्य, किती मोडून गेल्यासारखे वाटत होते. त्यांचे डोळे एक प्रकारच्या शून्यपणात बुडून गेल्यासारखे झाले होते. हा शून्यपणा त्याने आधी कधी पाहिला नव्हता. त्यांना कदाचित त्याला काहीतरी सांगायचं असावं, पण धैर्य होत नव्हतं. किंवा कदाचित हा त्याचा भ्रमही असावा. कारण त्यांच्या व्यक्तिमत्त्वात असल्या हळवेपणाला जागा नव्हती हे त्याला माहीत होते. कितीतरी दिवस त्यांचा चेहरा त्याच्या डोळ्यांसमोर स्थिर उभा रहायचा. त्या रात्री त्याने फक्त स्वत:बद्दल विचार केला होता. जरी त्याचे खिसे जवळपास रिकामे होते तरी त्याचे वय, त्याचे शरीर स्वत:साठी एक कोपरा मिळवण्याची शक्ती बाळगून होते. याउलट ते अपंगवत् होत होते. त्यांना आधाराची गरज होती. फक्त तो आधार बनू शकत होता; पण त्याने नकार दिला.

आईच्या आकस्मिक मृत्यूनंतर ते दोघेजण घरात एकमेकांना अपरिचित होऊन राहिले. एवढेच नव्हे; तर त्यांच्यातील ताणाचा दगड भिंतीचे रूप धारण करू लागला. त्यांचे स्वत:चे प्रश्न होते—आर्थिक विवंचना, एक नवीन काम सुरू केलं होतं ते नीट चालत नव्हतं, शरीराला जडलेल्या व्याधी कधी जास्तच ताप द्यायच्या. पत्नीच्या मृत्यूनंतर एकटेपणाही जाचू लागला होता. आणि त्याची स्वत:ची ही चौथी नोकरी होती. पण पगार धड चांगला नव्हता, भविष्याची सुरक्षितताही नव्हती. एक तारखेला तो जेव्हा पगाराची रक्कम त्यांच्या टेबलावर ठेवायचा तेव्हा ते त्याच्याकडे आणि त्या रुपयांकडे खूप तुच्छतेने पहायचे, त्यामुळे त्याचे मन घृणेने भरून जायचे.

ते आपल्याला रुपये परत देतील अशी भीती त्याला प्रत्येक वेळी वाटायची; पण तो गेला म्हणजे रुपये मोजून ते लोखंडी कपाटात ठेवून त्याला कुलूप लावायचे. आईच्या मृत्यूनंतर घर सोडून जाण्याचा विचार त्याच्या मनात अनेक वेळा आलेला होता; पण अनेक कारणांमुळे तो अमलात आणू शकला नाही. त्याचा दुबळेपणा, आत्मविश्वासाचा

अभाव, भित्रेपणा हे सगळ्यात मोठे कारण होते. अनेक वर्षांपासून चालत आलेला आयुष्याचा एक क्रम आहे, तो सोडून स्वत:साठी एक वेगळा मार्ग शोधून काढायची गरज म्हणजे नसती जबाबदारी ओढवून घेणे असे त्याला वाटायचे आणि म्हणून तो ती टाळत राहिला. त्याचा हा दुबळेपणा त्याचे वडील ओळखून होते.

आईच्या खोलीत एक लहानसं कपाट होतं. त्याला नेहमी एक लाहोरी कुलूप लावलेलं असायचं. त्यात तिचं स्वत:चं एक छोटंसं जग होतं. तिच्या पंचावन्न वर्षांच्या आयुष्यातले काही अवशेष, काही खुणा तिने सांभाळून ठेवल्या होत्या. आपल्या आईची, बहिणीची व नवऱ्याची कितीतरी वर्षांपूर्वीची पत्रं, स्वत:चे काही जुनेपुराणे कपडे यांच्यामुळे कदाचित तिला गतकाळाच्या स्मृतींच्या आठवणी येत असाव्यात. काही जुने अस्पष्ट फोटो, त्यातले चेहरे ओळखणं आता सोपं नाही. वडिलांच्या अनुपस्थितीत आई जेव्हा आपल्या कपाटाचं कुलूप उघडायची, तेव्हा तो मोठ्या उत्साहाने तिच्याकडे जायचा; पण ती त्याला धमकावून एका कोपऱ्यात लांब बसवायची आणि एखादी वस्तू पाहण्याचा त्याने हट्ट केला म्हणजे कधी दुरून तर कधी जवळून दाखवायची; पण कधीही हात लावू द्यायची नाही. कधीकधी त्या वस्तूंचा थोडक्यात इतिहासही सांगायची. त्या वेळी तिच्या डोळ्यात त्या स्मृतींच्या सावल्या तरळू लागायच्या.

''सगळं जणू काही एखाद्या स्वप्नासारखं होतं...'' दीर्घ निश्वास सोडीत ती म्हणायची. त्याला त्या सबंध कपाटात सर्वांत जास्त आकर्षण वाटायचं ते एका लहानशा पेटीबद्दल. त्या पेटीत झिजलेल्या मखमली डब्यात आईचे दागिने ठेवलेले असायचे. त्याने हट्ट केला म्हणजे आई ती पेटी पण उघडायची आणि डब्यात ठेवलेला प्रत्येक दागिना निरखून पहायची. मोत्यांचा जडावाचा हार, गळ्यातील नवरत्न, बिल्वर, मोठी नथ, कानातल्या हिऱ्याच्या कुड्या, पुखराज आणि नीलमच्या अंगठ्या... आपल्या लहान बोटात अंगठी घालायचा प्रयत्न तो करायचा तेव्हा ती हसायची— ''अरे, मोठा होशील तेव्हा घाल. आणि हे सगळे दागिने तुझ्या बायकोसाठीच आहेत.''

तिच्या मृत्यूनंतर वडिलांनी त्याच्यासमोर कधी ते कपाट उघडलेही नाही आणि त्याविषयी कधी काही ते बोललेही नाहीत. आपल्या अनुपस्थितीत त्यांनी ते उघडले असणार आणि विशेषत: दागिने पाहून घेतले असणार याबद्दल त्याला खात्री होती. दागिन्यांची पेटी त्यांनी आपल्या लोखंडी कपाटात ठेवली असणार. मग त्याला वाटले की हे सगळे दागिने तर आपल्या बायकोसाठी आहेत आणि आपल्या विवाहाबद्दल तर काही चर्चाच झालेली नाही, आणि तेही यासंबंधी काही बोलले नाहीत. पण एक गोष्ट त्याला डाचत होती. आईने आपले दागिने नेहमीच वडिलांच्या नजरेआड ठेवले होते. तिचा वडिलांवर विश्वास नव्हता. तिची स्वत:ची तेवढीच संपत्ती होती आणि तिला ती सुरक्षित ठेवायची होती. आणि आता... वडिलांनी अगदी सहजपणे ती आपल्या

ताब्यात घेतली होती. कदाचित ते ठीकही असेल म्हणा.

वडिलांच्या धंद्यातल्या प्रश्नांमध्ये त्याने कधीच लक्ष घातले नव्हते. आणि तेही कधी त्याला काही सांगत नसत. आईलाही काही माहीत नसे. पण त्याला थोडंफार एवढे माहीत होते की ते एकामागून एक नवी कामं सुरू करायचे, काही कामं बंद पडायची, काही थोडा काळ धड चालायची आणि मग वेगाने तोट्याचा दिशेने वाटचाल करू लागायची. त्यांची हातमिळवणी करण्यातच ते नेहमी व्यस्त असायचे. त्यामुळे घर, कुटुंब यासाठी त्यांच्याजवळ वेळ नसायचा आणि तशी त्यांना आवडही नव्हती. आईच्या मृत्यूनंतर हे सूत्र पण तुटत गेले.

एके रात्री ते घरी परत आले नाहीत. त्याने खूप वेळ वाट पाहिली. त्याची भीती वाटू लागली. मग ओळखीचे एक गृहस्थ घरी आले आणि त्यांनी सांगितले की त्यांच्या व्यापारातल्या कोणत्या तरी गुन्ह्यासाठी त्यांना अटक करण्यात आली आहे. उद्या सकाळी त्याला तुरुंगात बोलावले आहे. तेथे त्याला सगळी माहिती मिळेल. तो हतप्रभ झाला. एखादे बेकायदेशीर काम करणे ही वडिलांना फार मामुली गोष्ट वाटते हे त्याला ठाऊक होते. पण स्वत:वर शेकणार नाही या मर्यादेतच, हेही तो जाणून होता. अनेक वर्षांपासून ते अशा गोष्टी करीत आले होते. या बाबतीत त्यांचं डोकं फार जोरात चालत असे आणि आपल्या बचावाचा मार्ग ते शोधून ठेवायचे. पण या वेळी अडकले. अडकल्यानंतर बाहेर निघण्यासाठी त्यांना फार त्रास झाला नाही. एका महिन्यातच ते तुरुंगातून बाहेर पडले. पण या घटनेनंतर एका महिन्याच्या काळात त्यांच्यात एक फार मोठा बदल घडून आला. अनेक वर्षांच्या कोळ्याच्या जाळ्यातून त्याने स्वत:ला मुक्त करून घेतले. सगळी बंधनं एकएक करीत तोडून टाकली. एका संध्याकाळी तुरुंगातून सुटून ते अचानक घरी आले तेव्हा त्यांचा हसरा चेहरा आणि स्वाभाविक वागणे पाहून हा माणूस तुरुंगातून सुटून आला आहे असे कुणालाही वाटले नसते. या घरात, या शहरात न राहण्याचा निर्णय आपण आधीच घेतलेला आहे याचा त्याला आनंद झाला.

त्याची बॅग आणि त्याचा चेहरा या दोन्हींकडे नजर टाकताच त्यांना त्याचा उद्देश ध्यानात आला. अटक झाल्यानंतरही जाणवला नव्हता असा खोल आघात त्यांना जाणवला. त्यांनी या गोष्टीची कल्पनाही केली नव्हती. पण लगेचच त्यांनी स्वत:ला सावरले. भावुक होणे त्यांच्या स्वभावात नव्हतेही.

त्याने आपली बॅग उचलून खांद्यावर टाकली, ''मी निघालो आहे...'' मोठ्या मुश्किलीने त्याच्या तोंडातून हे शब्द बाहेर पडले.

बॅगेकडे निर्देश करीत ते म्हणाले, ''बास, एवढेच घेऊन चाललास ?''

''या घरात माझं आहे तरी काय ? सगळं तुमचंच आहे,'' तो म्हणाला. ''माझं जे सामान नकोसं वाटेल ते डबा-बाटलीवाल्याला देऊन टाका.''

त्यांनी हलकेच विचारले, ''काही पैशाची गरज असेल तर...''

''पैसे...'' तो दचकला. त्याला वाटलं की आपण जास्त वेळ इथं थांबलो तर आपला तोल सुटेल. तो म्हणाला, ''आहेत माझ्याकडे...''

आणि तो भराभरा पायऱ्या उतरू लागला. खाली रस्त्यावर आल्यावर एकदाच शून्य दृष्टीने वर पाहिले पण काहीच दिसले नाही. खोलीच्या बंद खिडकीच्या काचेत त्यांची धूसर आकृती दिसली. ते त्याच्याकडेच पाहत होते. तो भराभर पावले टाकीत पुढे निघाला.

प्लॅटफॉर्मच्या एका टोकाला गर्दीपासून दूर एका बाकावर बसल्या बसल्या तो गाड्यांचे येणेजाणे आणि प्रवाशांचे चढणेउतरणे पाहत राहिला. त्या सर्वांना आणि गाड्यांना एका निश्चित दिशेने एका निश्चित ठिकाणी पोहोचण्याची घाई झालेली आहे असे त्याला वाटले. कोणीही निरुद्देश प्रवास करीत नव्हता. आणि तो कोणत्या तरी अनिश्चित दिशेने पुढे जाण्याची वाट बघतो आहे. फार काळ या शहरात, त्याच एका घरात राहण्यात चूक तर झाली नाही ना ? जेथे आगगाडी नाही, बस नाही असे एखादे वैराण स्थान असते तर मन:स्थिती द्विधा झाली नसती. तो सरळ खांद्यावर बॅग टाकून रस्त्यावर चालत निघाला असता. पण येथे कोणत्या तरी विशिष्ट शहराचं तिकिट काढावं लागणार, गाडीची वेळ पाहावी लागणार.

वडील कदाचित आपल्याला घरी परत घेऊन जाण्यासाठी येतील अशी मनाच्या कोन्या-कोपऱ्यात एक अंधुकशी आशा त्याला वाटत होती. मग त्याला नाही म्हणता आले नसते. प्लॅटफॉर्मवर यावयाच्या जिन्याच्या पायऱ्यांकडे त्याची नजर कितीतरी वेळा गेली; पण त्याला निराशच व्हावे लागले. घरी परत फिरायचा अखेरचा क्षणही हळूहळू नाहीसा झाला.

सकाळी त्याला लवकरच जाग आली आणि तो घाईघाईने उठून बसला. क्षणभरात रात्रीची घटना आठवली आणि त्याची नजर खाटेवर जाऊन थबकली. ते झोपले होते. उशिरापर्यंत झोपायची त्यांची सवय जुनीच आहे हे त्याला सहजच आठवले. कितीतरी लहानसहान अनावश्यक गोष्टी परिस्थिती बदलली म्हणजे विस्मृतींच्या आवरणात हरवून जातात; पण वेळ आली म्हणजे लगेच एकामागून एक समोर येऊ लागतात.

रात्री झोपेतही एक प्रकारचा अस्वस्थपणा, घाबरलेपणा, कसली तरी भीती वाटत राहिली. त्यामुळे त्याचे डोके काहीसे जड झाले होते. एकदम गरम चहा पिण्याची प्रबळ इच्छा झाली होती. तो हलक्या पावलांनी दुधाचे भांडे घेऊन बाहेर आला पण तो दूध घेऊन परत आला तेव्हा ते जागे झालेले होते; पण खाटेवरच पडलेले होते आणि उघड्या डोळ्यांनी छताकडे निरखून पाहत होते. छताला जाळी चिकटलेली होती आणि सिमेंटचे पापुद्रे सुटू लागलेले होते.

तो मुकाट्याने स्टोव्ह पेटवू लागला. चहाचा एक कप खाटेजवळच्या खुर्चीवर ठेवला आणि तो स्वत: सतरंजीवर बसून काचेच्या ग्लासातून चहा पिऊ लागला. त्यांनी एक दीर्घ निश्वास सोडला आणि ते खाटेवर उठून बसले; पण ज्या गोष्टीत त्यांची तंद्री लागलेली होती त्यातच ते बुडून गेले होते. त्याला वाटली होती तेवढी रात्रीची आकस्मिक घटना सकाळच्या उजेडात भयंकर वाटत नव्हती. रात्री त्यांच्या डोळ्यात त्याच्याविषयी जाणून घेण्याची जी उत्सुकता आणि आस्था दिसते आहे असे वाटत होते, तेथे आता सकाळी औदासिन्य पसरलेले होते; पण हे कदाचित त्यांचे नाटकही असेल. त्यांच्याबद्दल निश्चित काही अनुमान करणे शक्य नव्हते.

''मी स्वत:साठी चपाती तयार करून ऑफिसात घेऊन जातो. तुमच्यासाठी करू का ?''

ते चमकले. ''काय म्हणालास तू ? मी ऐकलं नाही...''

आता तो चमकला, ''तुमच्यासाठी चपाती करू का ?''

''कर... नाहीतर मलाही करता येतात म्हणा.''

आपले उपकार घ्यायची त्यांची तयारी नाही हे त्याच्या ध्यानात आले. बाजारात जाऊन खाईन असेही त्यांना म्हणता आले असते.

अचानक खिडकीतून आलेल्या सूर्याच्या उन्हात त्याला वडिलांच्या चेहऱ्याचे एक वेगळेच रूप पहायला मिळाले आणि तो गोंधळून गेला. रस्त्यावर त्याने त्यांना पाहिले असते तर कदाचित ओळखलेही नसते. ते अधिक म्हातारे, अधिक अशक्त आणि अधिक दरिद्री झाले होते. एवढेच नव्हे; तर त्यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचे शैथिल्य पसरलेले होते. याआधीही काळानुसार आणि अनेक दुर्घटना घडल्यानंतर त्यांच्यात अनेक बदल झाले होते; पण आतमध्ये असे काहीतरी होते जे बदलले नव्हते. न आईच्या मृत्यूमुळे, न तुरुंगात गेल्यामुळे, न त्याने घर सोडले तेव्हा. तो खूप लक्षपूर्वक त्यांच्याकडे पाहत होता. हा आपला भ्रम तर नाही ना हे त्याला जाणून घ्यायचे होते.

घड्याळाकडे लक्ष जाताच तो लगेच उठून उभा राहिला. ऑफिसला जायच्या आधी घरातली कितीतरी कामं उरकायची होती.

खोलीच्या एका कोपऱ्यात स्वयंपाकाचे सामान, भांडी-कुंडी वगैरे ठेवलेली होती. टोपलीतले बटाटे सोलून त्याने एका पातेल्यात घातले व स्टोव्हवर ठेवले. मग परातीत पीठ काढून ते मळायला सुरवात केली. बटाटे शिजले की मग चपात्या करता याव्यात म्हणून. दरम्यान बाहेर नळावर तो स्नानही करून आला.

ते बिडीचे झुरके घेत राहिले आणि खाटेवर बसल्या बसल्या डोळ्यांच्या कोपऱ्यातून त्याची सर्व कामे मोठ्या आस्थेने पाहत राहिले. तो गच्चीवर गेला तेव्हा आपोआपच काही बडबडू लागले. ही पण त्यांची जुनी सवय होती.

''तुम्ही मला काही म्हणत होता का ?''

''नाही, काही म्हणून आता काय होणार आहे ?''

तो भरभर चपात्या भाजू लागला होता. जरा जाड होत्या खऱ्या. पण तव्यावर फुगत होत्या.

''तुम्ही दिवसभरात शहरात फिरून या...''

त्रासल्या सुरात ते म्हणाले, ''स्टेशनवरून येतानाच शहर कसे आहे हे समजले. मी खोलीतच आराम करीन...'' मग विचारले, ''अजून वर्तमानपत्र नाही आलं ?''

तो हसू लागला, ''मी वर्तमानपत्र विकत घेत नाही. ऑफिसातच एखाद्या मित्राचं घेऊन वाचतो. संध्याकाळी तुमच्यासाठी घेऊन येईन.''

''वर्तमानपत्र ही काय संध्याकाळी वाचायची गोष्ट आहे ? तू नको त्रास घेऊस.''

घराच्या वस्तुस्थितीची थोडी थोडी कल्पना त्यांना येत आहे हे जाणून त्याला समाधान वाटले.

ऑफिसची वेळ अजून झालेली नव्हती; पण कामं उरकून लवकर घराबाहेर पडावे असे त्याला वाटत होते. खोलीत समोर खाटेवर ते बसलेले आहेत हे पाहून त्याला गुदमरत होते. आणखी काही वेळ त्यांच्यासमोर थांबलो तर इतकी वर्षं साठलेल्या शेवाळातून कुठली तरी गोष्ट आपल्या तोंडून बाहेर पडेल, ती त्यांना लागेल आणि मग आपल्यालाच पश्चात्ताप होईल असे त्याला वाटत होते.

दिवसभर ऑफिसात आपल्या टेबलापुढे बसल्या बसल्या आपल्या आयुष्याचा तीस वर्षांचा इतिहास अस्ताव्यस्तपणे, कधी मागे, कधी पुढे असा एका परिघात त्याच्या भोवती फिरत राहिला. संध्याकाळी घरी परत जायचे आहे या विचाराने त्याच्या मनात एक प्रकारची दहशत वाढू लागली. ते काय बोलण्यासाठी आले असावेत ? आणि का ? काय गरज पडली ? काही पैसे मागण्याचा तर त्यांचा विचार नसेल ? जेलमधून परत आल्यावर त्यांनी आपले सगळे कारभार बंद करून टाकले आहेत हे त्याच्या कानावर आले होते.

महिन्याच्या पगाराशिवाय जास्त पैसे त्याच्याजवळ शिल्लक नव्हते. दूध वाढवावे लागेल. रात्री झोपण्यापूर्वी ते नेहमी दूध पितात. निदान पूर्वी पीत होते. तूप, पीठ, तांदूळ, डाळी... सगळं आणखी विकत आणावं लागेल. पण दुसऱ्याच क्षणी त्याला स्वत:चा राग आला. त्यांचा पाहुणचार करण्यासाठी आपण काय म्हणून स्वत:ला त्रास करून घ्यायचा ? तरी पण संध्याकाळ होण्यापूर्वी त्याने आपल्या दोघा सहकाऱ्यांच्या-कडून दहा दहा रुपये उधार घेतले होते.

आपण चांगले खाऊनपिऊन सुखी आहोत आणि आपल्याला कुणापुढे हात पसरावे लागत नाहीत असे अनुमान त्यांनी आपल्या परिस्थितीवरून काढावे असे कुठेतरी मनात त्याला वाटत होते. त्यांच्या येण्याची माहिती आधी मिळाली असती तर त्याने आपल्या

खोलीत, कपड्यात आणि खाण्यापिण्याच्या सामुग्रीच्या स्थितीत काहीतरी सुधारणा केली असती.

त्यांना पाहताच असे वाटले की त्याच्या गैरहजेरीत ते बरेच स्वाभाविक झालेले असावेत. चेहऱ्यावर रात्रीचे औदासिन्य नव्हते की त्रास नव्हता. नवा अंगरखा आणि पायजमा घातलेला आणि डोक्याला तेल लावून भांग पाडलेला. त्याला ते रात्रीपेक्षाही गूढ वाटले. बसमधून उतरतानाच त्याला ते गच्चीवर फेऱ्या मारीत असलेले दिसले होते आणि त्या क्षणापासून त्याची भीती वाढू लागली. दिवसभर ज्यामुळे तो त्रस्त झाला होता तो त्यांच्यासमोर जाण्याचा क्षण जवळ आला होता.

तो जवळ आला तेव्हा ते अगदी स्वाभाविकपणे हसू लागले, ''खूप उशिरा परत येतोस ?''

बाजारातून आणलेले सामान पिशवीतून काढून एका कोपऱ्यात तो मुकाट्याने ठेवू लागला. ते गच्चीच्या दारात उभे राहून त्याच्याकडे पाहू लागले.

''तू चहा करून घे तुझ्यासाठी. मी बाजारातून पिऊन आलो.''

एक गडद औदासिन्य त्याला आपल्या पाशात बांधू लागले होते. तो सतरंजीच्या एका कोपऱ्याशी बसला. असेच पडावे आणि झोपून जावे अशी इच्छा होत होती. बास... ऑफिसात आणि वाटेत जाणवले नाही; पण आत घरात पाय ठेवताच थकलेपणा आणि झोप यांचे ओझे असह्य वाटू लागले.

''तू बहुतेक थकलेला असशील. थोडा वेळ विश्रांती घे,'' क्षणभर ते त्याच्या चेहऱ्याकडे पहात राहिले. ''मी स्वयंपाक करून ठेवला आहे.''

त्याला आश्चर्य वाटले. कोरड्या सुरात तो म्हणाला, ''तुम्ही कशाला केला ? मी रोज येऊन करतोच ना. आणि सामान पण नव्हतं.''

''बाजारातून थोडं सामान मी घेऊन आलो...'' मंद सुरात ते म्हणाले. दारातून बाजूला होत त्यांनी बिडी शिलगावली आणि गच्चीवर फिरू लागले.

खोलीतला अंधार गडद होऊ लागला होता; पण दिवा लावण्याचे भान त्याला नव्हते. धुळीने भरलेले त्याचे पाय डोळ्यांसमोर होते. या हिवाळ्यात मोजे विकत आणावे लागतील, पण त्याच्याबरोबर बूटही आणावे लागतील एवढाच एक प्रश्न होता आणि त्यासाठी गेली दोन वर्षे तो पैसे जमवू शकला नव्हता. वडिलांनी हे नक्कीच पाहिले असले पाहिजे. लहानसहान गोष्टी त्यांच्या नजरेतून कधीच सुटत नाहीत. स्वयंपाक करावा लागणार नाही या विचाराने त्याला बरे वाटले. याच आनंदात त्याने चहासाठी आधण ठेवले.

''दिवसा शहरात एक चक्कर मारून आलो.'' चहाचा ग्लास हातात घेऊन खाटेवर बसत ते सांगू लागले, ''फार विचित्र शहर आहे. धुळीशिवाय दुसरं काहीही दिसत नाही.''

''तिन्ही बाजूंनी वाळवंट आहे. त्याची रेती हवेबरोबर उडत येते.''

''तुला हेच शहर सापडलं...''

''जिथे नोकरी मिळेल तिथेच जावं लागतं,'' तो त्राग्याने म्हणाला.

ते स्वत:तच कुठेतरी हरवून गेले होते. खोलीतली निस्तब्धता त्या दोघांच्या मध्ये पसरू लागली.

''आणि तुम्ही सगळंच बंद करून टाकलंत— तुमचा व्यापार, दुकान, सगळंच !'' त्याने संकोचून विचारले. वस्तुत: त्याला या विषयात अजिबात आस्था नव्हती; पण औपचारिक म्हणून काहीतरी विचारणे आवश्यक आहे असे त्याला वाटले.

''अच्छा... म्हणजे तुला समजलं का ?'' त्यांनी उत्साहपूर्ण स्वरात विचारले.

''शंभूने लिहिले होते. कधी कधी त्याचं पत्र येतं. त्यात तो सगळ्या बातम्या कळवायचा. मला ते सगळं जाणून घ्यायची उत्सुकता आहे असे त्याला कदाचित वाटत असावे.''

''तुला सर्व परिस्थितीची कल्पना यावी म्हणून मीच त्याला लिहायला सांगितलं होतं...''

''मला कळल्या न कळल्याने तुमच्यात काय फरक पडणार होता ?...'' तो थोडा आवेशात आला होता.

''तरी पण तुला कळणं आवश्यक होतं.''

त्याने बोलणे पुढे वाढवले नाही. निष्कारण वादात गुंतायची त्याची इच्छा नव्हती. त्यासाठी वेगळ्या संधी मिळतील.

''तू घर सोडून गेलास तेव्हाच अचानक या सर्व गोष्टीमधली माझी आस्थाच संपून गेली.''

रागाने त्याचा चेहरा लाल झाला; पण त्याने स्वत:ला मोठ्या कष्टाने काबूत ठेवले. स्वत:चा दुबळेपणा दुसऱ्यांवर लादणे ही त्यांची जुनीच सवय होती.

''आणि कदाचित काही करूही शकलो नसतो. अटक होण्यापूर्वी मी एक फार मोठी खेळी खेळलो होतो.'' ते उघड्या दारातून बाहेर पाहत होते. ''पण शेवटच्या डावात मी बाजी हरलो. काहीच वाचवू शकलो नाही...!''

हे सगळं ते त्याला प्रथमच का सांगत आहेत आणि तो विरोध न करता ते का ऐकतो आहे याचे त्याला आश्चर्य वाटले.

तो हळू आवाजात म्हणाला, ''आता त्या घटनांची चर्चा करण्यात काय फायदा ?''

त्यांनी त्याचे बोलणे ऐकले नाही. ''मनात असतं तर पुन्हा एखादं लहानमोठं काम सुरू करू शकलो असतो. तुरुंगातून सुटल्यावरही तेवढी हिंमत माझ्यात होती. पण अचानक वैराग्यच आलं. सगळा उत्साहच संपून गेला.''

त्याला वाटले, की आपले घर सोडून जाणे हे पण एक महत्त्वाचे कारण आहे याची जाणीव त्यांना आपल्याला करून द्यायची आहे.

खोलीत पुन्हा निस्तब्धता पसरली, जणू काही खोलीत कोणीच नसावे. तो मुकाट्याने खोलीच्या रिकाम्या भिंतींकडे, खिडक्यांकडे आणि दाराकडे पाहत राहिला. दिवसभरात त्यांनी खोली स्वच्छ केली आहे हे त्याला जाणवले. छतावर लटकणारी आणि कोपऱ्यात जमलेली कोळिष्टके नाहीशी झाली होती. खोलीत अस्ताव्यस्त पसरलेल्या सामानांवरची धूळ झटकून ते व्यवस्थित लावलेलं होतं; त्यामुळे खोली खूपच मोठी वाटू लागली होती. पण या वेळी तो याविषयी काहीच बोलला नाही. मनात कसली तरी भीती जागी होऊ लागली. एका दिवसातच एका खोलीच्या या घराची जबाबदारी त्यांनी स्वत:वर घेतली होती.

त्या रात्री अचानक वारे जोरात वाहू लागले आणि आतापर्यंत थांबलेल्या कडाक्याच्या थंडीचा प्रकोप स्पष्टपणे दिसू लागला. दारं-खिडक्या बंद करून घेतल्या तरी फटीतून थंड वारे आत घुसून आपला प्रभाव जाणवून देऊ लागले. गच्चीवरच्या एका कोपऱ्यात न्हाणीघर होते. त्यावरचा पत्रा वाऱ्याने हलू लागला. त्याचा खडखड आवाज जमिनीवर घोंगडे पांघरून झोपलेल्या त्याला सारखा ऐकू येत राहिला.

त्या रात्री फार दिवसांनी आईचा चेहरा त्याच्या डोळ्यांसमोर येत राहिला. तिची ठेंगणी मूर्ती, दुबळं सडपातळ शरीर, औदासिन्याने भरलेले निरुत्साही मोठे मोठे डोळे आणि वडिलांच्या एकदम उलट असा खूप हळुवार आणि गोड आवाज... तिची न नवऱ्याविरुद्ध काही तक्रार होती न लेकाविरुद्ध. त्यांच्या दोघात निर्माण झालेल्या दरीची कल्पना तिला खूप आधीच आलेली होती. नवऱ्याशी या बाबतीत काही बोलणे तिला निरर्थकच वाटले; पण आपल्या अशक्त आणि भित्र्या पोराच्या मनात वडिलांविषयी कर्तव्य आणि सद्भाव दृढ व्हावा म्हणून ती अव्याहत प्रयत्न करीत राहिली. ''मनानं ते वाईट नाहीत रे.'' मोठ्या संकोचाने ती हे म्हणायची, जणू काही आपल्या बोलण्यावर तिचा विश्वास नसावा. ''पाहतो आहेस ना तू, त्यांच्यावर किती ओझं आहे ते. रात्रं-दिवस कष्ट काढत असतात पण भाग्यच खोटं त्याला ते तरी काय करणार ?...'' दीर्घ निश्वास सोडून ती म्हणायची. आईबरोबर घालवलेल्या इतक्या वर्षांच्या प्रवासाच्या कितीतरी धूसर पडछाया त्याच्या डोळ्यांसमोर तरळू लागल्या. या एका पोराचा जन्म म्हणजे तिच्या दीर्घ आयुष्यातली अशी एक घटना होती की तिची तुलना विस्तीर्ण वाळवंटात निळ्या पाण्याच्या लहानशा झऱ्याशी करता येईल आणि हे सुख तिच्या आयुष्याला सतत चिकटून राहिले होते. ''आणि तुझ्याशिवाय त्यांना आहे तरी कोण ? उघड उघड ते काही म्हणणार नाहीत; पण मनातल्या मनात...'' ती जास्त बोलू शकत नसे; पण तिच्या मन:स्थितीची त्याला पूर्ण कल्पना असे. त्या दिवशी ऑफिसातही या गोष्टी त्याच्या कानात कितीतरी वेळा निनादत राहिल्या. जणू काही एखाद्या अदृश्य

कोपऱ्यातून आईच त्याला आठवण करून देत होती. पण दाट शेवाळ्यासारखी एक प्रकारची तटस्थता अशी काही पसरलेली होती की त्यातून बाहेर पडणे सोपे नव्हते. आई असती तर तिने समजून घेतले असते.

वाऱ्याबरोबरच पाऊसही सुरू झाला आणि न्हाणीघराच्या पत्र्याच्या छतावर होणारा टपटप आवाज त्याला ऐकू येऊ लागला. डोळ्यात झोप नव्हती.

आपलं ऑफिस, ऑफिसात काम करणारी दुसरी माणसं आणि आपली ही खोली—या परिघात स्वत:ला बांधून घेतल्यावर आपल्या भूतकाळाशी अथवा भविष्याशी काहीहीं संबंध जोडण्याची त्याची मुळीच इच्छा नव्हती. त्याला आस्थाही नव्हती आणि अशी काही वेळही पुढे येऊन ठाकली नव्हती. वडिलांच्या येण्यामुळे सगळा तोलच बिघडला. ज्या प्रदेशातून मुक्त होण्यासाठी तो पळून गेला होता, त्याच प्रदेशात तो पुन्हा परत आला.

रात्री कुठल्यातरी प्रहरी जाग आली तेव्हा आपल्या अंगावर कोणीतरी वाकले आहे हे पाहून तो भीतीने गारठला. त्याला किंकाळी फोडायची होती; पण तोंडातून आवाजच फुटेना. श्वास रोखून पडून राहिला. असं पूर्वीही घडलं होतं. विशेषत: भयंकर स्वप्न पाहिलं असताना. पण या वेळी ही आकृती भ्रम नव्हता.

''तुला काहीतरी वाईट स्वप्न पडलं होतं वाटतं, तू ओरडलास म्हणून मी जागा झालो. तुझी तब्बेत ठीक नाही का ?'' तो जागा होताच ते उठून उभे राहिले आणि खाटेवर जाऊन बसले.

कदाचित तो रोजच ओरडत असावा आणि काही उत्तर न मिळाल्यामुळे गप्प बसत असावा.

काहीच न बोलता तो लघ्वी करण्यासाठी म्हणून दार उघडून गच्चीवर आला. पाऊस थांबला होता; पण गच्चीवर पाण्याची लहान लहान बेटे तयार झाली होती. हवा अजूनही खूप गार होती. झोप पारच उडून गेली होती, पण आकाश आणि बाहेरची शांतता यावरून रात्र अजून बरीच बाकी आहे असे अनुमान त्याने केले. खोलीत वडील त्याच्या परत येण्याची वाट पाहताहेत आणि त्याची आत जाण्याची इच्छा नाही. थोड्या वेळाने तो काय करतो आहे हे पाहण्यासाठी दारातून गच्चीवर डोकावून पाहतील. वयाच्या तिसाव्या वर्षीसुद्धा वडिलांना या गोष्टीचा खुलासा द्यावा लागणार. हाच अधिकार मागण्यासाठी ते त्याच्याकडे आले आहेत का ? या अधिकारापासून वंचित होणे म्हणजे वडिलांच्या अधिकारापासून वंचित होणे आहे का ? वरवंडीच्या आधाराने तो बाहेर पाहू लागला. अचानक त्याला वाटले की अशा प्रकारची अवस्था आपण जास्त काळ सहन करू शकणार नाही. काही अप्रिय घटना घडण्यापूर्वीच तो यातून मुक्त होऊ इच्छित होता. हे त्या दोघांच्याही दृष्टीने चांगले झाले असते.

''अजूनही रात्री तुला भीतीची स्वप्नं पडतात ?''

ते आपल्याला सहानुभूती दाखवताहेत का आपली चेष्टा करताहेत हे त्याला अंधारात कळू शकले नाही. त्यांची सहानुभूती असह्य वाटत होती.

''लहानपणच्या काही विकृती तशाच टिकून राहतात,'' तो म्हणाला. त्यांच्या पेटलेल्या विडीचं लाल टोक अंधारात दिसत होतं.

''कसल्या विकृती ?'' त्यांनी विचारले.

तो हसू लागला... घोंगडीने आपले सगळे अंग झाकून घेऊन तो बिछान्यावर बसला. अंधारात दोघं एकमेकांना दिसत नव्हते. ''तुम्हाला ठाऊक नाही; पण स्वप्नात अनेकदा तुम्हीच मला दिसता आणि माझ्या तोंडून किंकाळी फुटते.''

''नाही, असं होणं शक्य नाही...'' ते आवेशाने म्हणाले.

''काय अशक्य आहे ? हीच वस्तुस्थिती आहे आणि आपण ती आजवर कबूल करण्याचे टाळत आलेलो आहोत. आईसुद्धा याच ओझ्याखाली मेली, ते कमी करावं अशी हिंमत कधी गोळा करू शकली नाही.'' तो अचानक थांबला. परिस्थिती जाणून घ्यायचा प्रयत्न करू लागला.

''आणि तू...?''

''मी... हो, मी ते ओझं वाहत इथं आलो. वाटलं होतं की इथं आल्यावर त्याच्यापासून सुटका होईल; पण आता समजलं की ते माझी सावली होऊन राहिलं आहे आणि अखेरच्या श्वासापर्यंत ते मला सोडणार नाही...''

ते गप्प बसले. विझलेली बिडी पुन्हा पेटवली नाही. थोड्या वेळाने अगदी सावकाशपणे म्हणाले, ''या सर्व गोष्टी माझ्या समजण्यापलीकडच्या आहेत. माझ्या आयुष्यात त्यांना कधीच महत्त्व नव्हतं. मी...''

''पण इतरांना असू शकतं. पण तुम्ही... फक्त स्वतःच्या दृष्टीने सर्वांकडे पाहिले. तुमच्यासाठी तेच सत्य होते.''

त्यांनी विझलेली बिडी पेटवण्यासाठी काडी ओढली तेव्हा त्यांच्या थरथरणाऱ्या हाताकडे तो पहात राहिला. बिडी पेटवायला त्यांना थोडा त्रास झाला.

''पण आता त्या सगळ्याची उजळणी करण्यात काय अर्थ आहे ?...'' घोंगडं पांघरून तो आडवा झाला.

''तुम्ही पण झोपा.''

थोडा वेळ तो त्यांचा दीर्घ श्वासोच्छ्वास ऐकण्याचा अयशस्वी प्रयत्न करू लागला. अर्धी रात्र झाली असताना आपण कदाचित हे बोलायला नको होते. त्यांना कळणारही नाही. पण भूतकाळाचे एक धावते दर्शन वडिलांना घडवण्यात आपण यशस्वी झालो असे वाटून त्याला आनंद झाला. पण ते कबूल करणार नाहीत.

जसजसे दिवस गेले तसतसे त्यांचे खोलीतले अस्तित्व स्वाभाविक वाटू लागले. आपल्या ऑफिसातून परत घरी येताना नकळत एक प्रकारचा उत्साह मनात निर्माण

होऊ लागला. त्याची चाहूल लागण्याआधी जेव्हा त्याला अचानक आठवण यायची की वडील आपल्या खोलीत आपली वाट पाहत बसलेले असतील, तेव्हा त्याची पावलं आपोआपच थबकायची. एक प्रकारचे द्वंद्व निर्माण व्हायचे. थोडा वेळ स्वत:चाच राग आणि चीड यायची; पण मग ही गोष्ट डोक्यातून निघून जायची. कधी त्याला वाटायचं की घरी परत जाऊच नये. घर सोडून आलो होतो तसेच ही खोली सोडून दुसऱ्या कोणत्या तरी दिशेला निघून जावं. पण एवढी हिंमत त्याला आजवर झाली नव्हती.

संध्याकाळी तो परत येण्यापूर्वी बहुतेक रोजच ते स्वयंपाक करून ठेवायचे. बाजारातून काही सामान आणायचे असले तर आणून ठेवायचे. अनेकदा त्याने नको म्हणून सांगून पाहिले; पण ते हसून म्हणायचे की ''रिकामं बसून कंटाळा येतो. स्वयंपाक केला की तेवढेच बरे वाटते.'' या अवांछित परिस्थितीमुळे त्याला घाबरल्यासारखे व्हायचे; पण काही करणे त्याला अशक्यच होते. त्यांच्या येण्याचे कारण कळले असते तर बरे वाटले असते. पण या बाबतीत त्यांनी कसलाच संकेत दिला नव्हता. त्यामुळे त्याची द्विधावस्था आणखीनच वाढली होती. कसल्यातरी भावी भीतीमुळे तो थरथरला. ऑफिसातल्या टेबलावर वाकून बसला असताना त्याला ही गोष्ट आठवली म्हणजे त्याचे हात थांबायचे, डोळ्यांसमोर एक प्रकारची धूसरता पसरायची. आज स्पष्टच विचारायचे म्हणून तो निश्चय करायचा.

त्या दिवशी त्यांनी बाजारातून थोडी मिठाई विकत आणली होती. त्याने चहा केला तेव्हा हसतच त्यांनी मिठाईची पेटी उघडून चहाच्या दोन कपांच्या मध्ये ठेवली. तो वेड्यासारखा पेटीकडे पाहत राहिला. त्यांच्या चेहऱ्याकडे पहायची हिंमत त्याला झाली नाही.

''तुला आठवण आहे की नाही कुणास ठाऊक. आज तुझा वाढदिवस आहे म्हणून हे घेऊन आलो.'' आपला आवाज स्वाभाविक बनवीत ते म्हणाले.

खूप प्रयास करूनही तो आपले हसणे आवरू शकला नाही. ''माझा वाढदिवस आहे ? तुम्ही माझा वाढदिवस साजरा करीत आहात ! का...''

त्याचे अस्वाभाविक असे हसणे ऐकून त्यांना थोडी भीतीच वाटली. मिठाई विकत घेत असताना त्याच्या वाढदिवसाविषयी बोलावे की नाही याचा निर्णय ते करू शकले नव्हते. ''यात हसण्यासारखं काय आहे ?'' अत्यंत शांत मुद्रा ठेवीत त्यांनी विचारले.

पण त्याने त्यांचे बोलणे ऐकले नाही. तो त्यांच्यापासून खूप दूर गेला होता, जिथे ते त्याच्याबरोबर येऊ शकत नव्हते. गप्प बसणेच ठीक असे त्यांना वाटले. दिवसभराच्या कामानंतर थकलेला त्याचा चेहरा संध्याकाळच्या अंधारात एका प्रश्नचिह्नासारखा समोर डोलतो आहे असे त्यांना वाटले. त्याचा जन्म होऊन कितीतरी वर्षे झाली. मधला कालखंड म्हणजे एखाद्या विसरलेल्या लांबच्या प्रवासासारखा वाटला. मिठाईची उघडी

पेटी त्या दोघांच्यामधे एखाद्या बेवारशासारखी तशीच पडली होती.

त्याच्या आत एक खूप खोल दरी निर्माण झालेली होती आणि तिच्यात इतकी वर्षं आपोआपच बरेच काही जमा होत गेले होते. पण त्यात ते कधी डोकावून पाहू शकले नव्हते. आता जेव्हा त्या दरीतून काही बाहेर पडते तेव्हा ते चमकतात आणि त्यांच्यामधील दुरावा आणखीनच वाढत जातो.

''अलीकडे मला फार एकटं एकटं वाटू लागलं आहे...'' त्यांच्या आवाजात एक प्रकारचा संकोच होता. हे बोलावं की नाही याचा निर्णय होत नसावा. ''मन बऱ्याचदा थाऱ्यावर राहत नाही. काही धार्मिक पुस्तकंही वाचायचा प्रयत्न करतो. साधुसंतांचा उपदेश ऐकायला जातो; पण कुठेच मन लागत नाही. सगळं अर्थशून्य वाटतं.''

आपल्यालाही असंच वाटतं असं त्यांना सांगावं अशी इच्छा बच्चूच्या मनात निर्माण झाली. घर, ऑफिस, नोकरी—सगळं कसं अर्थशून्य वाटतं. कितीदा तरी हे सगळं सोडून साधू व्हावं असं मनात येतं; पण पुन्हा असंही वाटतं की साधू होऊन त्याग करावा अशी मोह, माया यांनी भरलेली कोणतीही वस्तू आपल्यापाशी नाही. पत्नी, मुलंबाळं, स्वत:चं घर, रुपये पैसे—काहीही नाही. मग संन्याशाची वस्त्रं पांघरून फिरत राहिल्यामुळे आणखी वेगळं काहीच मिळणार नाही.

''कधी कधी तर ही गाडी रखडत रखडत ओढण्याचा काही अर्थच ध्यानात येत नाही...'' ते जणू काही स्वत:शीच बोलत होते.

''आता हा सगळा विचार व्यर्थ आहे. किती उशीर झाला आहे दिसतेय ना...''

''देहात जोवर श्वास आहे तोवर आयुष्याचा एकच अर्थ असतो. सगळ्यांसाठी सारखा.'' पण ते अचानक गप्प बसले. क्षणभर त्यांना असे वाटले की बच्चूच्या समोर हे सगळं सांगून आपण त्याची सहानुभूती तर मिळवू पाहत नाही ना ? उदासीनता आणि चीड यांची एक लाट त्यांच्या आत उसळून आली. ''पण जेव्हा तो अर्थच दुबळा व्हायला लागतो तेव्हा...'' ते हळुवार आवाजात म्हणत होते.

आरशात बघून दाढी करीत असताना त्याला मागे खाटेवर बसून आपल्याकडे टक लावून पाहत असलेले वडील आरशात दिसले आणि काही काळ तो हतप्रभ झाल्यासारखा त्यांच्याकडेच पाहत राहिला, पण ही गोष्ट त्यांना कळणे शक्य नव्हते. अचानक मागे वळून तो म्हणाला, ''कधी कधी आरशात आपला चेहरा पहायला लागलो की मला तुमचा चेहरा दिसायला लागतो.'' तो मोठ्याने हसला. ''खूप प्रयत्न केला तरी तुमचा चेहरा काही मला घालवता येत नाही. असं का होतं ?''

साबण लावलेल्या त्याच्या चेहऱ्याकडे ते पाहत राहिले. त्याच्या कोणत्याच प्रश्नाचं उत्तर त्यांच्यापाशी नव्हते. असते तरी ते त्याला सांगू शकले नसते.

''एकदा घर सोडलं म्हणजे मी एक नवं आयुष्य जगू शकेन, कोणतंही बंधन नसलेलं, असं मला वाटलं होतं. जसं हवं, तसं. पण... ते काही होऊ शकले नाही.

मला जणू काही वाळवी लागली होती. तिच्यापासून मी कधीच मुक्त होऊ शकत नाही. ही गोष्ट इथं आल्यावर समजली; पण तुम्हाला हे आधीपासूनच ठाऊक होते...''

गेल्या तीन-चार दिवसांपासून ते गप्प गप्पच राहत होते. तो काही म्हणाला तरी त्यांनी ते ऐकले नाही असेच त्याला वाटायचे. डोळे चार भिंतीच्या आतच पाहत होते; पण कुठेतरी हरवल्यासारखे होते. काही वेळ ते मन घालायचा प्रयत्न करायचे; पण ते न जमल्यामुळे पुन्हा लगेच आपल्या परिघात परत फिरायचे. कारण त्याच्या ध्यानात आले नाही.

''तुमची तब्बेत तर ठीक आहे ना ?...'' थोडंसं अडखळतच त्याने विचारले.

ते चमकले. ''मी ठीक आहे. मला काही झाले नाही...''

त्याला वाटले की ते काहीतरी लपवत आहेत.

''तुमचा चेहरा— जरा...''

उदासपणे ते म्हणाले, ''जसा आधी होता तसाच आहे. तुला काळजी करायचं काही कारण नाही.''

तो त्यांच्या चेहऱ्याकडे बराच वेळ पाहत राहिला. निघून गेलेल्या काळाची अगणित स्मारकं अगदी स्पष्टपणे अंकित झालेली होती. त्यातली काही त्याच्या ओळखीची होती. आता उरलेला रस्ता केवळ एखाद्या वाळवंटासारखा असेल, त्यावर त्यांना कसलेही चिह्न उमटवून जाता येणार नाही.

''दोन-चार दिवसांनी परत जावं असं वाटतंय...'' ते गंभीर आवाजात म्हणाले, ''थोडं जास्तच राहिलो. इथं यायच्या आधी फक्त दोन दिवस राहायचं ठरवलं होतं; पण आज बारा दिवस होऊन गेले. काही पत्ता लागला नाही.''

तो ध्यानपूर्वक त्यांच्या चेहऱ्याकडे पाहू लागला. काही दिवसांपूर्वी त्यांचं बोलणं ऐकून त्याला बरं वाटलं असतं; पण बारा दिवसांनी हे ऐकून त्याचे मन मुकाटपणे उदास झाले. ''एवढी काय घाई आहे ?'' तो पुटपुटला, ''घरी काही महत्त्वाचे काम आहे का ?''

''काम नसलं तरी आपल्या घरी परत तर जावंच लागतं. इथे येऊ शकलो, हे काय कमी झालं ?''

त्यांच्या जाण्यामुळे ही खोली रिकामी रिकामी वाटेल असे त्याला प्रथमच वाटले. त्यांच्या असण्याची त्याला सवय झाली होती. खाटेवर पाय वर घेऊन बसलेले पाहण्याची सवय झाली होती. आता तो खाटेवर कधी झोपू शकणार नाही, अशीच रिकामी पसरलेली पडू देईल.

काही वेळाने त्याला असेही वाटले की आपण जाणार असल्याची गोष्ट त्यांनी स्वतःचे महत्त्व वाढवण्यासाठीच कदाचित सांगितली असावी. ते एवढ्यात जाणार नाहीत. एखादी अवांछित घटना घडेपर्यंत कदाचित येथेच रहातील. आपण त्यांना थांबा

म्हणून आग्रह करावा अशी आशा त्यांना वाटत असावी. म्हणजे त्याच्या उपकाराचं ओझं तेवढंसं जाणवणार नाही. या विचाराने तो निश्चिंत झाला.

दोन दिवसानंतर तो ऑफिसातून परत आला तेव्हा त्याला दाराला कुलूप लागलेले दिसले आणि थोडा वेळ तो गोंधळून गेला. त्याच्या खिशात दुसरी किल्ली होती; पण कुलूप काढायला त्याचे मन घेईना. ते इथे आले तेव्हापासून संध्याकाळी परत आल्यावर कुलूप काढायची गरज त्याला कधी पडली नव्हती. दिवसा ते मन चाहेल तिकडे फिरून यायचे. सिनेमा बघायचे; पण संध्याकाळी तो घरी यायच्या आधी नेहमीच परत येऊन बसायचे. त्याला मनात कुठेतरी असे वाटत होते की ते कदाचित बाहेर कुठेतरी फिरायला गेले असावेत; पण ते निघून गेले असावेत ही शंका जास्त प्रबळ होती. निरोप घेण्यातल्या सगळ्या भावुकपणापासून त्यांनी दोघांचीही सुटका करून घेतली होती.

खाटेवर घडी केलेले एक पत्र ठेवलेले होते. ते उघडताना त्याचे हात कापू लागले.

"मी घरी परत जात आहे. काहीही न सांगता-सवरता, असं अचानक निघून जातो आहे याचा मला खेद वाटतो. पण एके दिवशी असेच न कळवता आलो होतो. किल्ली खाली घरमालकाजवळ दिली आहे. तुझ्या ट्रंकेत एक लहानशी पेटी ठेवून जात आहे. तिच्यात तुझ्या आईचे सर्व दागिने ठेवलेले आहेत. त्याच हेतूने मी येथे आलो होतो. संकोचामुळे तुला सांगू शकलो नाही...

"असो... आपल्या प्रकृतीची काळजी घे..." यापुढे दोन-तीन शब्द लिहून पुन्हा खोडून टाकले होते.

आपल्या ट्रंकेतून दागिन्याची पेटी काढायचे धैर्य त्याला बऱ्याच वेळाने झाले. त्याच मखमलीच्या लहान-लहान डब्या, ज्यांच्याकडे लहानपणी तो मोठ्या आसुसलेल्या नजरेने पहायचा. तोच मोत्यांचा जडावाचा हार, गळ्यातील नवरत्न, मिन्याचे काम केलेले बिल्वर, नाकातली मोठी नथ, कानातल्या हिऱ्यांच्या कुड्या— सगळे काही सुरक्षित ठेवलेले होते. तो उदासपणे पाहत होता. ते मिळाल्यावर आता एका क्षणातच त्याचा सगळा मोह नाहीसा झाला होता. "हे सगळे दागिने तुझ्या बायकोसाठी आहेत..." आईचे हे वाक्य त्याच्या कानात घुमत होते.

त्या दागिन्यांच्या पुढे बसण्यात किती वेळ निघून गेला याचा त्याला पत्ता लागला नाही. अचानक त्याला वाटले की वडील दाराबाहेर उभे राहून त्याच्या या अवस्थेला हसत आहेत. त्याने चमकून दाराकडे पाहिले तर कुणाची तरी सावली दिसली. तो लगेच उभा राहिला आणि हवालदिल झाल्यासारखा मोठ्याने ओरडला, "कोण आहे ?"

घरमालक होते. त्याला किल्ली द्यायला आले होते.

# माझा शत्रू

कृष्ण बलदेव वैद

या वेळी तो दुसऱ्या खोलीत बेशुद्ध पडला आहे. आज मी त्याच्या दारूत एक द्रव्य मिसळून टाकलं आहे. त्यामुळे नुसती दारू तो सरबतासारखी गटागट पिऊन टाकतो आणि त्याचा त्याच्यावर काही विशेष परिणाम होत नाही. डोळ्यात लाल रेषा तरळू लागतात. कपाळावरच्या आठ्या घामात भिजून तकाकू लागतात. ओठांचे जहर आणखीच प्रकट होऊ लागते आणि बास्—डोकं नेहमीप्रमाणेच ठिकाणावर राहतं.

ही युक्ती मला आधीच का सुचली नाही याचे नवल वाटते. कदाचित सुचलीही असेल आणि काही तरी विचार करून मी ती दाबून टाकली असेल. नेहमीच काही ना काहीतरी विचार मी करतो आणि कितीतरी गोष्टी दाबून टाकतो. पहिल्याच घोटात चव ओळखून माझी चोरी तो पकडणार अशी आजही मला शंका होती. पण ग्लास संपता संपता त्याचे डोळे मिटू लागले होते आणि माझा उत्साह वाढला होता. त्याच क्षणी त्याचा गळा दाबावा असे मनात आले पण परिणामांच्या कल्पनेने घाबरून गेलो. प्रत्येक भित्र्या माणसाची कल्पनाशक्ती तीव्र असते आणि ती त्याला प्रत्येक संकटातून वाचवत असते असे मला वाटते. तरीही मोठ्या धैर्याने मी एकदा सरळ त्याच्याकडे पाहिले होते. हेही काही कमी नव्हते; कारण सामान्य परिस्थितीत माझी नजर त्याच्यासमोर इकडे तिकडे पाखरासारखी फडफडत राहत असते. सामान्य परिस्थितीत माझी अवस्था त्याच्यासमोर फारच असामान्य होऊन जाते.

असो. आता त्याचे डोळे बंद झाले होते आणि डोकं झुकू लागलं होतं. एकीकडे कलंडून खाली पडण्यापूर्वी त्याचे हात ओझ्याने वाकलेल्या ढिल्या फांद्यांच्या सुस्तपणाने माझ्या दिशेने वर उचलले गेले होते. त्याला असं हतबल झालेले पाहून हा आता मरतो की काय असा भ्रम झाला होता. पण हा सुंभ कोणत्याही क्षणी उसळून उभा राहील हे मी ओळखून आहे. शुद्धीवर आल्यावर तो काही म्हणणार नाही. त्याच्या गप्प बसण्यातच त्याचं बळ आहे. त्या काळीही तो कमीच बोलायचा पण आता तर जणू काही मुकाच झाला आहे.

त्याच्या मूक अवहेलनेच्या कल्पनेनेच मला धडकी भरते. मी एक भित्रा माणूस आहे

म्हणून सांगितलंय नं ! इतक्या दिवसांच्या वेगळेपणानंतर आता मी त्याच्या दहशतीतून पूर्ण मुक्त झालो आहे अशी समजूत मी का करून घेतली कुणास ठाऊक. या आनंदातच बहुधा त्या दिवशी मी त्याला घेऊन आलो होतो. कदाचित त्याच्यावर रुबाब गाजवण्याची, त्याला अपमानित करण्याची दुष्ट इच्छाही असेल. कदाचित मला असेही वाटले असेल माझी सुदृढ, सुंदर बायको, माझी हसती-बागडती निरोगी मुलं आणि माझा सजवलेला भव्य चिरेबंदी वाडा पाहून तो स्वत:च पळून जाईल आणि माझी त्याच्यापासूनची कायमची सुटका होऊन जाईल. त्याच्यापासून मुक्त झाल्यावर मी माझं आयुष्य आनंदाच्या कोणत्या सीमेपर्यंत बहराला आणलं आहे हे मला बहुधा त्याला दाखवून द्यायचं असावं !

पण ही सगळी लंगडी निमित्तं आहेत. वस्तुस्थिती ही आहे की त्या दिवशी मी त्याला आपल्याबरोबर आणलं नव्हतं तर तो स्वत:च माझ्याबरोबर आला होता आणि मी त्याला नव्हे तर तो मला अपमानित करू पाहत असावा. ही सूक्ष्म गोष्ट मला त्यावेळी समजली नसावी हे उघडच आहे. प्रसंग आला म्हणजे सूक्ष्म गोष्टी मला समजत नाहीत, हेच तर संकट आहे. तशी संकटं आणखीही खूप आहेत पण त्या सर्वांचा येथे उल्लेख करणे व्यर्थच होय.

असो. त्या दिवशी मालेपुढे असल्या प्रकारचे काहीतरी लंगडं कारण सांगण्याचा मी प्रयत्न केला होता पण तिच्यावर काहीच परिणाम झाला नाही. त्याला पाहताच ती भडकली होती. त्याच क्षणी सगळ्यात आधी स्वत:च्या मूर्खपणाची आणि एकूण परिस्थितीची जाणीव कदाचित मला झाली असावी. या कमनशिब्यापासून तिकडेच कुठेतरी रस्त्याच्या टोकाला काहीतरी करून आपण मोकळं व्हायला पाहिजे होतं. मी जर माझं भित्रं मौन सोडून माझ्या सगळ्या अडचणी आणि नाइलाज त्याच्यापुढे रेखाटले असते आणि त्याला स्पष्टपणेच सांगितले असते— 'हे बघ गुरू, माझ्यावर दया कर आणि माझ्यामागे लागू नकोस'— तर कदाचित आमच्यात काहीतरी समझोता झाला असता. बाकी काही नाही तरी त्याने मला आणखी मुदत तरी दिली असती. एकदमच दोन आघाड्यांवर लढायची पाळी तरी आली नसती.

काहीही असो, मी त्याला घरी आणायला नको होते. पण आता हा सगळा समजुतदारपणा व्यर्थच होता. माला आणि तो एकमेकांकडे असे काही रोखून पाहत होते जणू काही दोघे जुने हाडवैरी असावेत. एका क्षणाला मला असे वाटले की माला स्वत:च सगळी परिस्थिती सांभाळून नेईल; पण दुसऱ्याच क्षणाला माला कशी निर्भर्त्सना करील या कल्पनेने मी घाबरून गेलो होतो. या गोष्टीला गमतीचे रूप देण्याच्या प्रयत्नात मी एका विशिष्ट लाचार ओल्या स्वरात—असल्या नाजूक प्रसंगासाठी तो माझ्याजवळ मी राखून ठेवलेला असतो—म्हणालो होतो, 'डार्लिंग ! जरा वाट तरी सोड. आम्ही खूप लांब फिरून आलो आहोत, जरा बसू दे, मग तुला काय शिक्षा द्यायची असेल ती दे.'

ती वाटेतून बाजूला तर झाली पण तिच्यावरचा ताण मुळीच कमी झालेला नव्हता आणि तिने मला बसूही दिले नाही. त्याच वेळी तो मुर्दाड माझ्याकडे असे काही पाहत होता की जणू म्हणत असावा—म्हणजे तू खरोखरच या बाईचा गुलाम झाला आहेस तर ? आणि मी त्या दोघांच्याकडे असे काही पाहत होतो की जणू काही एकापासून लपवून दुसऱ्याशी मला काहीतरी कटकारस्थान रचायचे होते.

संधी मिळताच बाजूला घेऊन मालाने मला धमकवायला सुरवात केली होती— "मी विचारते तुम्हाला, हा कोण उडाणटप्पू धरून आणला आहे बरोबर ? नक्कीच तुमचा कोणीतरी जुना मित्र असणार ? होय ना ? लग्नाला इतकी वर्षं झाली पण तुम्ही अजून होता तसेच आहात. त्याला पाहून माझ्या मुलांना काय वाटेल ? शेजारी काय म्हणतील ? काही बोलाल की नाही आता ?"

काय बोलावे या विचाराने मी हैराण झालो होतो ! मालासमोर मी जरा कमीच बोलतो. जास्त वेळ तोल सांभाळण्यातच जातो. आणि मग तिची मन:स्थिती आणखीच बिघडते. तसा तिचा राग बरोबरच असतो म्हणा. तिचा राग नेहमीच बरोबर असतो. आमच्या यशस्वी लग्नाचा पाया या गोष्टीवरच मजबूत राहिलेला आहे—तिची प्रत्येक गोष्ट, नेहमी बरोबर असते आणि मी माझी प्रत्येक चूक मुकाट्याने आणि लगेच मान्य करीत असतो. वरवर ती काही का म्हणेना, माझ्या आज्ञाधारकपणावर तिचा पूर्ण विश्वास आहे. मधूनमधून केवळ मला खुश करण्यासाठी म्हणून ती अशा काही तक्रारी मुद्दामच करते—"प्रत्येक साध्यासुध्या बाबतीत माझ्याविरुद्ध बाजू घेण्यात तुम्हाला कसला आनंद मिळतो कुणास ठाऊक. तुम्ही माझ्यापेक्षा जास्त शहाणे आहात, मान्य आहे पण कधीकधी माझं म्हणणं ऐकण्यासाठी का होईना..." वगैरे वगैरे.

मला तिची असली खोटी गाऱ्हाणी आवडतात. आता त्यामुळे मी फार काळ आनंदात राहू शकत नाही ही गोष्ट वेगळी. तरी पण तिला वाटतं की यामुळे माझा भ्रम टिकून राहतो आहे आणि मलाही माहीत असते की लगाम तिच्याच हातात असणार आहे आणि हे ठीकच आहे !

तेव्हा माला दातओठ खात म्हणत होती— "आता काही बोलाल की नाही ? माझी मुलं पार्कातून परत आल्यावर या कळाहीन माणसाला बैठकीत बसलेला पाहून काय म्हणतील ? काय परिणाम होईल त्यांच्यावर ? छी: इतका घाणेरडा माणूस ! सगळ्या घरात वास सुटलाय. बोला, आपल्या मुलांना मी काय सांगू ?"

आता मालेला मी काहीसुद्धा सांगू शकत नव्हतो हे तर उघडच होते. तेव्हा मी मान खाली घालून उभा राहिलो आणि ती तोंड वर करून बराच वेळ बडबडत राहिली.

आता इथे हे स्पष्ट करायला हवं की मुलं काही माला आपल्या बरोबर घेऊन आलेली नव्हती. ती जेवढी तिची तेवढीच माझीही होती. पण अशा प्रसंगी ती 'माझी मुलं' म्हणून नेहमीच त्यांना माझ्यापासून वेगळं करायची, चिखलातून माणिक काढून

घेतल्यासारखी. कधीकधी मला या गोष्टीचं खूप वाईट वाटतं पण नंतर थंड डोक्याने विचार केला की वाटतं शारीरिक सत्य काही का असेना, आत्मिक पातळीवर आमची सगळी मुलं मालेचीच आहेत. त्यांचे रंगढंग माझ्यासारखे फारसे नाहीत. आणि हे ठीकच आहे, कारण ती जर माझ्यावर गेली असती तर त्यांनाही माझ्यासारखे सरळ व्हायला किती वेळ लागला असता कोण जाणे. मला यात आनंद आहे की त्यांचे भविष्य खूप उज्ज्वल आहे आणि त्यांच्या या उज्ज्वलतेत माझा वाटा एवढाच आहे की मी त्यांचा कायदेशीर आणि कदाचित शारीरिक नात्याचा बाप आहे, त्यांच्यासाठी पैसे कमावतो आहे आणि रात्रंदिवस त्यांच्या आईच्या सेवेला वाहून घेतले आहे.

असो. काही वेळ तसाच मान खाली घालून उभा राहिल्यानंतर मी अत्यंत अजिजीच्या स्वरात म्हणायला सुरवात केली— "अगं, मी त्या दळभद्र्याला नीट ओळखतही नाही, त्याच्याशी मैत्री करण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही. आता रस्त्यात जर एखादा माणूस भेटला, तर..."

माझ्या वाक्याचा शेवट काय होणार होता कोण जाणे. कदाचित झालाही नसता पण माला मधेच पाय आपटीत म्हणाली— "खोटं, धडधडीत खोटं !"

असे म्हणून ती आत निघून गेली, आणि मी आणखी काही वेळ तेथेच मान खाली घालून उभा राहिलो आणि नंतर तो बसला होता त्या खोलीत परत आलो. तो बिडी पीत होता आणि हसत होता. मी कोणता मुक्काम पार करून आलो आहे हे सर्व त्याला जणू काही ठाऊक होते.

आता वास्तविक असे झालेले होते की त्या संध्याकाळी मालेची परवानगी घेऊन मी दूर एकटाच सहज म्हणून बाहेर पडलो होतो. साधारणपणे ती अशी सहज परवानगी देत नाही आणि मीही मागायची हिंमत करीत नाही. कारणाशिवाय फिरणे तिला मुळीच आवडत नाही. कुठेही जायचे असो, कुणालाही भेटायचे असो, काहीहीं करायचे असो किंवा करायचे नसो; या बाबतीतला स्पष्ट आणि योग्य निर्णय ती आधीच करीत असते. बरोबरच करते म्हणा. मी तिच्या समंजसपणाला दाद देतो. तसा घरापासून मी एकटा लांबवर कारण असले तरी जाऊ शकत नाही. मालेच्या सहवासाची एवढी सवय झाली आहे की तिच्याशिवाय सगळं सुनंसुनं वाटतं. ती बरोबर असली म्हणजे कोणत्याही प्रकारचा विसंगत विचार मनात येतच नाही; प्रत्येक वस्तू भरीव आणि अर्थपूर्ण दिसू लागते. मनाची अशी काही अवस्था होते की जणू काही मालेने आपल्या हातांनी सजवलेली खोलीच असावी. त्यातली प्रत्येक वस्तू व्यवस्थित लावलेली आणि नावालासुद्धा कुठेही अव्यवस्थितपणा नसलेली. आणि ती बरोबर नसली म्हणजे त्या संध्याकाळी झाली तशी किंवा तशाच प्रकारची एखादी-दुसरी दुर्घटना झालीच म्हणून समजा. कारण त्याआधी अशी गोष्ट कधीही झालेली नव्हती.

तर त्या संध्याकाळी कुठल्या नादात कुणास ठाऊक मी घरापासून फिरत फिरत खूप लांब गेलो. घरापासून दूर गेलो तरी मी बहुधा घराबद्दलच विचार करीत असतो. घरात कसल्या प्रकारची काही अडचण आहे म्हणून नाही. गाडी नुसतीच चाललेली आहे असे नाही तर खूप छान चाललेली आहे. मालासारख्या बाईच्या हातात सगळी सूत्रे असली म्हणजे गाडी चालेल नाही तर दुसरे काय करील ? नाही, घरात काही अडचण नाही— चांगला पगार, चांगली बायको, चांगली मुलं, चांगले जाणे-येणे असलेले मित्र, त्यांच्या बायका पण खूप सुदृढ आणि चांगल्या, चांगला सरकारी बंगला, चांगलं प्रसन्न लॉन, शेजारीपाजारीही चांगले, महागाई असली तरीही दोन्ही वेळा चांगले भोजन, चांगला बिछाना आणि चांगले ऐसपैस आयुष्य. मी म्हणतो, एका चांगल्या माणसाला यापेक्षा जास्त हवं तरी काय असतं ? तरीही एकटा असलो म्हणजे घरच्या गोष्टी उलटून पालटून पाहिल्या म्हणजे निरोगी माणसाला पुन्हा पुन्हा आरशात आपला चेहरा पाहिल्यावर वाटतो तसा विश्वास वाटत राहतो. म्हणजे असे की वेळ चांगला जातो, कंटाळा येत नाही. हाही मालेच्या सुप्रभावाचाच परिणाम आहे. नाहीतर एके काळी मला नेहमी कंटाळा येत असायचा.

त्या संध्याकाळी मन थोडा वेळ त्या जुन्या काळाकडे भटकत गेले असावे. काही का असेना, मी घरापासून खूप लांब गेलो होतो आणि अचानक तो माझ्यापुढे दत्त म्हणून उभा ठाकला होता.

मी एकटा आहे हे पाहून एखाद्या भयंकर अनोळखी माणसाने दबा धरून रस्ता अडवावा तसे वाटले. मी एकाएकी थबकलो. त्याच्या रेखीव डोळ्यांवरून घसरत माझी नजर त्याच्या स्मितावर येऊन थांबली; तेथे मला त्याच्याबरोबर घालवलेल्या त्या धुळीतल्या दिवसांची एक मिणमिणती छबी दिसली होती. अनेक वर्षे फरारी झाल्यानंतर पुन्हा मला पकडून कुणासमोर तरी उभे केले आहे असे मला वाटले. आपण हजर होत आहोत या विचाराने माझी मान नम्रपणे खाली वाकली होती.

काही वेळ किंवा कदाचित बराच वेळ आम्ही रस्त्यावरच्या त्या बेकार आणि तिरस्कृत अंधारात एकमेकासमोर उभे होतो. तिसऱ्या कोणी त्या वेळी आम्हाला पाहिले असते तर आम्ही एखाद्या प्रेताच्या उशाशी उभे राहून कसली तरी प्रार्थना करतो आहोत किंवा एकमेकावर तुटून पडण्याआधी कुठल्या तरी मंत्राचा जप करीत आहोत असे वाटले असते !

तसं म्हटलं तर त्याला ओळखताच मी मालेची आठवण करायला सुरवात केली होती; कारण कोणत्याही संकटात मी नेहमी तिचेच नाव घेतो. त्याचबरोबर शेपूट घालून तिथून पळून जावं अशीही इच्छा मनात येत होती. घरी परत जाण्याऐवजी मुकाट्याने त्या दळभद्र्याबरोबर जावे; तो घेऊन जाईल तिकडे जावे आणि मालेला पत्ताही लागू देऊ नये अशी एक कामनाही मनात तरळून गेली. हा विचार मनात आला त्या वेळी

मी दचकलो होतो आणि अजूनही मला आश्चर्य वाटते आहे; कारण त्याच्यापासून सुटका व्हावी म्हणून तर मी मालेच्या कुशीचा आधार घेतला होता. काही वर्षांपूर्वी मी त्याच्याविरुद्ध बंड केले नसते तर... पण मला असे वाटले होते की त्या पळून जाण्याला बंड म्हणून मी स्वत:लाच फसवतो आहे आणि त्यामुळे शरमिंदेपणाच्या आगीत मी जळत राहिलो होतो. माझा चेहरा या आगीत नेहमीच जळत असतो.

मला होत असलेला त्रास त्या हरामखोराच्या ध्यानात नक्कीच आलेला असणार. माझा कोणत्याही प्रकारचा कमकुवतपणा त्याच्यापासून लपून राहिलेला नाही आणि त्याच्यापासून पळून जाऊन मालेच्या कुशीचा आश्रय घेण्याचे हे एक महत्त्वाचे कारण होते. त्याच्या हसण्यात मला वाळलेल्या पानांचा भयंकर खडबडाट ऐकू येत असे आणि त्या खडखडाटात त्याच्या सावलीखाली घालवलेल्या काळातील अनेक गोष्टी एकमेकींवर आदळत राहायच्या. मोठ्या कष्टाने डोळे उचलून त्याच्याकडे पाहिले होते. त्याचा हात माझ्या दिशेने पुढे येत होता. मी मात्र बिचकलो आणि दोन पावले मागे सरकलो आणि त्याचे हसणे आणखीच वाढले. दातओठ दाबून धरून मी त्याच्या नजरेला नजर दिली. माझा हात त्याच्या खडबडीत हातात देताना आणि त्याच्या श्वासांची दुर्गंधीयुक्त उष्णता माझ्या चेहऱ्यावर झेलून घेत असताना मला असे वाटले की जणू काही इतकी वर्षे स्वतंत्र राहिल्यानंतर आपण स्वत:ला पुन्हा त्याच्या हवाली करून टाकले आहे. आश्चर्य म्हणजे असे वाटल्यामुळं मला जेवढा त्रास व्हायला पाहिजे होता, तेवढा झाला नव्हता. कदाचित पळून जाणाऱ्या प्रत्येक गुन्हेगाराला मनातून असेच वाटत असावे की आपल्याला कोणी तरी पकडावे; पण हे कुणाला ठाऊक नसते ?

घरी जाईपर्यंत काहीही बोलणे झाले नाही. आपापल्या मौनात मग्न आम्ही हळूहळू चालत होतो. खांद्यावर एखादे प्रेत घेऊन चालल्यासारखे.

तेव्हा, मालाची बोलणी खाल्ल्यानंतर, तोंड वाकडे करून मी जेव्हा बैठकीत परत आलो तेव्हा तो पाजी मजेत बिडी ओढत बसला होता. ही खोली त्याची तर नाही ना असा मला क्षणभर भ्रम झाला.

मग स्वत:ला सावरून त्याच्याशी डोळे न भिडवता खोलीच्या सगळ्या खिडक्या उघडल्या, पंखा आणखी जोरात केला. त्राग्याची एक लाथ मारून त्याची पादत्राणे सोफ्याखाली ढकलून दिली, रेडिओ चालू करणारच होतो तेवढ्यात त्याचे फाटके हसणे ऐकू आले आणि मी त्याच्यापासून लांब जाऊन मुकाट्याने बसलो.

मनात आले की हात बांधून घेऊन त्याच्यापुढे उभे राहावे. सगळी हकीकत सांगून म्हणावे, 'बघ मित्रा, माझ्या या अवस्थेवर दया कर आणि माला यायच्या आधी मुकाट्याने येथून निघून जा, नाहीतर परिणाम फार वाईट होईल !'

पण मी काहीच म्हणालो नाही. म्हणालो असतो तरी जहरी हास्याशिवाय माझ्या

अपीलाचे दुसरे कोणतेही उत्तर त्याने दिले नसते. तो फार जुलमी आहे. प्रत्येक गोष्टींच्या मुळापर्यंत जाण्यात समाधान मानणारा आणि भावुकतेविषयी अत्यंत तिरस्कार असणारा.

तो खोलीची पाहणी करतो आहे हे पाहून मी चोरट्या नजरेने त्याच्याकडे पाहण्यास सुरवात केली. पाय पसरून सोफ्यावर बसलेला तो मला एखाद्या जनावरासारखा वाटला. त्याची अवस्था फार खराब दिसत होती. पण त्याचा चेहरा अजूनही माझ्याशी बराच मिळताजुळता दिसत होता. या विचाराने मला दुःखही झाले. पण एक विचित्र प्रकारचा आनंदही अनुभवाला आला.

एके काळी तोच माझा एकमेव आदर्श असायचा; आम्ही दोघे त्या वेळी तासन्तास एकत्र फिरायचो; आम्ही दोघांनी एकत्रपणे कितीतरी वेळा नोकऱ्यांचे राजीनामे एकदम दिले होते; काही ठिकाणावरून आम्हाला एकदमच काढून टाकण्यात आले होते; रुळलेल्या वाटेवरून चालत आपल्या आयुष्याचं कुरूप आणि पारंपरिक खुराडे बनवून ते वाया घालवणाऱ्या आणि त्या खुराड्याच्या कुंपणातच आपलं डोकं गहाण टाकणाऱ्या सगळ्या लोकांपेक्षा आम्ही स्वतःला श्रेष्ठ आणि ज्येष्ठ समजत होतो. आपल्या पोरांच्या हसण्याखिदळण्यावर ज्यांची हृदये नाचतात, ज्यांच्या मूर्ख बायका रात्रंदिवस त्यांना आपल्या तालावर नाचायला लावतात आणि ज्यांना आपल्या पांढरपेशेपणाशिवाय दुसरे दुःख नसते, त्या सगळ्या लोकांपेक्षा थोडा वेळ मी त्या काळच्या आठवणीत बुडून गेलो. असे वाटले की तो पुन्हा त्या जगाचा संदेश घेऊन आला आहे, पुन्हा मला त्या रोमँटिक ओसाडीत भटकायला घेऊन जायचा प्रयत्न करतो आहे. त्या ओसाडीपासून पळून जाऊन तर मी स्वतःसाठी फुलांची एक शय्या तयार केली आहे आणि माला प्रायः रोज रात्री तिच्यावर माझ्या आज्ञाधारकपणाचा पुरावा मागत असते आणि तिथे मी खूप सुखी आहे.

तो हसत होता, माझ्या मनात डोकावून पाहिल्यासारखा. सहजपणे तो माझ्यावर आपले वर्चस्व गाजवू लागला आहे हे पाहून विषय बदलण्यासाठी मी म्हणालो, ''किती दिवस रहाणार आहेस इथे ?''

त्याचे हसणे पुन्हा एकदा आमच्या घरातल्या सजवलेल्या, नटवलेल्या वातावरणात थरथर निर्माण करून गेले. आणि आता लगेच माला येईल आणि त्याचे तोंड ओरबाडून काढील अशी भीती मला वाटू लागली. इतक्या वर्षांच्या गुलामीनंतरही मी अजून मालेला नीट ओळखू शकलो नाही याचा पुरावा म्हणजे ही भीती होती.

थोड्याच वेळात ती एक खूप सुंदर साडी नेसून हसत मुरडत आमच्यापुढे येऊन उभी राहिली. हात जोडून मोठ्या मोहकपणाने नमस्कार करीत ती म्हणाली, ''तुम्ही खूप दमलेले दिसताहात. मी गरम पाणी ठेवले आहे. तुम्ही वॉश घ्या, मग काहीतरी

पिऊन ताजेतवाने व्हा, जेवण आपण उशीराच करू या.''

मी खूप आनंदित झालो. आता मालेने प्रकरण आपल्या हाती घेतले होते आणि मी उगीचच काळजी करीत होतो. उठावे आणि मालेचे चुंबन घ्यावे असे मनात आले. मी डोळ्यांच्या कोपऱ्यातून त्या हरामखोराकडे पाहिले. तो खरोखरच जरासा गांगरल्यासारखा दिसला. आता तो स्वत:च पळून गेला नाही तर मालेची सगळी बुद्धी, ज्ञान आणि रंग-रूप निरर्थक म्हणावे लागेल असे मला वाटले. हा दळभद्री पळून जाण्याऐवजी मालेच्या डावपेचात अडकला तर किती गंमत येईल आणि मग मी त्याला विचारेन, 'बोल साल्या आता, आता तरी कळले ना ?' मी डोळे मिटून घेतले आणि तो मालेच्या आजूबाजूला नाचतो आहे, तिच्यावर फिदा होतो आहे, तिच्या शेजारी पडला आहे अशी दृश्ये पाहू लागलो. एक विचित्र प्रकारचे समाधान अनुभवाला येत होते. डोळे उघडले तेव्हा तो न्हाणीघराकडे निघून गेलेला होता आणि माला वाकून सोफा ठीकठाक करीत होती. मी तिच्या नजरेत नजर मिसळून हसायचा प्रयत्न केला, पण नंतर तिचा उग्र चेहेरा पाहून घाबरून मी खाली पाहू लागलो. तिने अद्यापी मला माफ केले नव्हते हे उघड होते.

आंघोळ करून तो बाहेर आला तो माझे कपडे घालूनच. मधल्या काळात मालेने बीयर काढली होती आणि त्याचा ग्लास भरत विचारीत होती— ''जेवताना तुम्हाला तिखट कमी लागतं का जास्त ?'' मी मोठ्या कष्टाने माझे हसू आवरले. या साल्याला जेवायला तरी मिळत असेल का कुठे ? मी विचार करीत होतो आणि मालेच्या चातुर्यावर खुश होत होतो.

थोडा वेळ आम्ही पीत बसलो. माला त्याच्याशी मोठ्या जवळिकीने गप्पा मारीत होती. लहानलहान प्रश्न विचारीत होती— ''तुम्हाला हे शहर कसं काय वाटलं ? बीयर थंड तर आहे ना ? तुम्ही तुमचे सामान कुठे ठेवले आहे ?'' आणि तो उडवाउडवी करीत होता. मालेच्या गोडगोड बोलण्यावरून असे वाटत होते की जणू काही आपल्याच भागातला एखादा मनमोकळा मित्र थोड्या दिवसांसाठी आमच्याकडे राहयला आला आहे आणि त्याची भलीथोरली गाडी आमच्या दारापुढे उभी आहे.

मी फारच खुश झालो आणि माला भोजनाची तयारी करायला गेली तेव्हा त्या संध्याकाळी प्रथमच मी बेधडकपणे त्या दुष्टाकडे पाहिले. त्याने तीन-चार ग्लास बियर रिचवली होती आणि त्याच्या चेहऱ्यावरचा पिवळेपणा आता थोडा कमी झाला होता. पण माला बाहेर जाताच त्याच्या हसण्यात पुन्हा तेच विष आणि चॅलेंज अवतरले आणि मला वाटले की तो जणू काही म्हणतो आहे— तुझी बायको मला आवडली. पण बेट्या तिला सावध कर, तिला वाटतंय तेवढा मी लेचापेचा नाही.

क्षणभर माझा उत्साह थोडा मावळला. वाटलं की, प्रकरण एवढ्या सहजपणे मिटणारं नाही. आठवलं की, त्या काळीही त्याला सुंदर आणि चंचल बायका खूप

आवडायच्या; पण त्यांची जादू फार काळ टिकत नसे. तरी पण मला वाटलं की प्रकरण आता आपल्या हातातून निसटले आहे, आणि आता वाट पाहण्याशिवाय आपल्याला काहीही करता येणार नाही.

त्या दिवशी भोजन फारच उत्कृष्ट झाले होते आणि भोजनानंतर माला स्वत: त्याला त्याच्या खोलीपर्यंत पोहोचवायला आली होती. पण त्या रात्री माला माझ्याशी काहीही बोलली नाही. मी कितीतरी चेष्टा केली. म्हणालो, ''आंघोळबिंघोळ केल्यावर तो बराच नीटनेटका दिसत होता नाही ?'' तिला खूप छेडले, तह व्हावा म्हणून खूप प्रयत्न केले. पण तिने मला आपल्याजवळ अजिबात येऊ दिले नाही. त्या रात्री मला झोप आली नाही; पण दुसऱ्या दिवशी माला त्याला पळवून लावण्यात नक्की यशस्वी होईल असा मला विश्वास वाटत होता.

पण माझे अनुमान चुकीचे निघाले. माला खूप चतुर, खूप जाणती, खूप मनमोहिनी आहे, कबूल. पण त्या हरामखोराच्या धिटाईची काही बरोबरी करू शकत नाही. माला तीन दिवस त्याचा आदरसत्कार करीत होती. माझे कपडे घालून तो आता अगदी माझ्यासारखा झाला होता. मालेला दोन पती आहेत की काय असे वाटत होते. मी सकाळीच गाडी घेऊन ऑफिसला निघून जात होतो. माझ्यामागे ती दोघे काय बोलत असत कोण जाणे. पण संधी मिळताच ती मला आत नेऊन धमकावयाची— ''हा मुडदा येथून जाणार आहे की नाही ? तो घरी आहे तोवर आपण कुणाला बोलवू शकत नाही की कुणाकडे जाऊ शकत नाही. माझी मुलं म्हणतात की याला सभ्यपणे बोलता येत नाही. काय हवंय याला ?''

त्याला काय हवंय हे मी काय सांगणार ? कधी म्हणायचो— ''आणखी थोडं थांब, जायच्याच विचारात असेल.'' कधी म्हणायचो— ''काय सांगू, मलाच शरम वाटते.'' कधी म्हणायचो, ''तूच त्याला डोक्यावर चढवून ठेवले आहेस. तू जर कठोरपणे वागली असतीस तर...''

मालेने आपले वागणे बदलले नाही; पण चौथ्या दिवशी आपली मुलं घेऊन घर सोडून भावाकडे निघून गेली. मी खूप अडवले पण तिने ऐकले नाही. त्या दिवशी तो दळभद्री खूप हसला. मोठमोठ्याने पुनः पुन्हा.

माला गेली त्याला आज पाच दिवस झाले. मी ऑफिसात जात नाही. तो पुन्हा आपल्या मूळ रूपात आला आहे. माझे कपडे काढून त्याने पुन्हा आपला मळका सदरा- पायजमा घातला आहे. बोलत काहीच नाही पण मला ठाऊक आहे त्याला काय म्हणायचे आहे ते—अशी संधी पुन्हा येणार नाही. ती गेली आहे. ती परतायच्या आत येथून पळून जाणे चांगले. तिची काळजी नको करू. तिचं ती बघून घेईल.

आणि आजअखेर मी त्याला थोडा वेळ बेशुद्ध करण्यात यशस्वी झालोय. आता

माझ्यापुढे दोन मार्ग आहेत. एक म्हणजे तो शुद्धीवर येण्याआधी त्याला मारून टाकणे, दुसरा म्हणजे सामान बांधायचे, तो शुद्धीवर आला की अनेक वर्षांपूर्वी जो रस्ता सोडून मालेचा आश्रय घेतला होता त्या रस्त्यावर दोघांनी पुन्हा जायचे. माला असती तर तिने तिसरा रस्ता सांगितला असता. पण ती नाहीय आणि मी काय करावे हे मला कळत नाहीय.

# सामसूम

**महीप सिंह**

सगळ्या मिळून छत्तीस बिल्डिंग होत्या आणि त्याला जायचे होते त्या बिल्डिंगचा नंबर होता एकोणतीस. एकोणतीस चोवीसांश याचा अर्थ एकोणतीस नंबरच्या बिल्डिंगमधला चोविसावा फ्लॅट. प्रत्येक मजल्यावर चार फ्लॅट आहेत याचा अर्थ चोविसावा फ्लॅट सहाव्या मजल्यावर असला पाहिजे.

हे गणित तसे सरळ होते आणि कुणाच्याही ध्यानात येण्यासारखे होते. पण त्याची अडचण काही वेगळीच होती. बॉम्बे सेंट्रलला गाडी आली पाच वाजता. ती कॉलनी स्टेशनच्या अगदी जवळच होती म्हणून टॅक्सीतून सामान उतरवून घेऊन त्याने पैसे दिले तेव्हा अजून साडेपाच वाजायला तीन मिनिटे कमी होती... टॅक्सीवाल्याला ही बिल्डिंग शोधायला कॉलनीच्या दोन-तीन चकरा कराव्या लागल्या होत्या तरीसुद्धा. अटॅची घेऊन लिफ्टने सहाव्या माळ्यापर्यंत जायला फारतर पाच मिनिटं लागतील; पण पाच पस्तीसला एखाद्याच्या फ्लॅटची बेल वाजवणं बरे दिसेल का ? यावेळी तर ती गाढ झोपलेली असेल.

मग ?

सहा वाजण्यापूर्वी फ्लॅटची कॉल-बेल आपण वाजवू नये. पण अर्धा तास असं उभं राहून तरी कसा काय घालवणार ? लोकांचे येणे-जाणे सुरू झाले होते. फिरायला जाणारे, दुधाच्या बाटल्या घेऊन येणारे लोक त्याच्याकडे पाहू लागले होते. आणि त्यांच्या नजरेत प्रश्न होता—कुणाकडे जायचे आहे ?

त्याला मिसेस वर्मांच्याकडे जायचे आहे. मिसेस वर्मा... कसं वाटतं. तिच्याबद्दल विचार करताना आपण तिला काय म्हणावं ? तिची आठवण झाली की त्याच्यासमोर एक व्यक्तिमत्त्व साकारतं— एका स्त्रीचं. तिला त्याने आजवर अनेक नावं दिलेली आहेत. पण खरं तर कोणतंच नाव देऊ शकलेला नाही. कधी काळी त्याने तिला 'वहिनी' असे नातेवाचक नावही दिले, पण ते फार काळ चालू शकले नाही. ह्या नातेवाचक नावाने तो तिला आठवू शकत नाही. तिचे स्वत:चे घरगुती नाव फूलमती, चमेली किंवा गुलाब या चालीवरचे काहीतरी होते; पण ते त्याने कधीच ग्राह्य मानले नाही. तिचा पती तिला राधा म्हणत असे. पण हे नावसुद्धा तिला पुरेसं आहे असे

त्याला वाटले नाही. तेव्हा एकदा त्याने तिला न सांगताच एक नाव दिले— 'दिवा' आाणि त्यानंतर जेव्हा-जेव्हा तो तिच्याबद्दल विचार करीत असे तेव्हा तेव्हा दिवाबद्दल विचार करायचा.

पण दिवाला आपण दिवा आहोत हे कुठे माहीत होतं. हे तर कुणालाच माहीत नाही. ती मिसेस वर्मा आहे एवढेच लोकांना माहीत आहे. तिला पण माहीत आहे की आपण मिसेस वर्मा आहोत. तिला तिच्या मूळ नावाने हाका मारणारी क्वचितच एखादी व्यक्ती, एखादी आठवण किंवा एखादा संबंध वर्षा-सहा महिन्यांनी आला तर यायचा.

आता तो आपल्या फ्लॅटसमोर उभा होता. बाहेर नेमप्लेट लावलेली होती— मिसेस सी. वर्मा— चमेली वर्मा, चंचल वर्मा, चांदनी वर्मा. त्याने घड्याळ पाहिले. सहा वाजायला अजून काही मिनिटे अवकाश होता. आणखी थोडा वेळ काढावा म्हणून तो सहाव्या मजल्यावरून खाली जिन्यात डोकावून पाहू लागला. गोल गोल पायऱ्या एखाद्या खोल विहिरीसारख्या थेट खालपर्यंत गेलेल्या होत्या. शेजारचा लिफ्ट सारखा वरखाली येतजात होता आणि त्यातून बाहेर येणारी माणसे त्याच्याकडे बघत बघत जात होती.

आता सहा वाजून गेले होते. एक एक क्षण त्याला असह्य होत होता. त्याने कॉल बेलवर बोट ठेवले... डिंग... डिंग...डिंग.

घंटा खूप गोड आवाजात वाजली. एक क्षणभर त्याने वाट पाहिली. आतमध्ये काहीच हालचाल ऐकू आली नाही. त्याला वाटले ती झोपली असेल. काही वेळ तो तसाच उभा राहिला. पुन्हा डिंग... डिंग... डिंग.

दाराशी हँडलची खडखड झाली. ती समोर उभी होती... हाउसकोट घातलेली, केस अस्ताव्यस्त, आळसावलेला चेहरा, जड झालेल्या पापण्या आणि सुकलेले ओठ.

''ओऽ!... वेलकम...वेलकम... आज हा सूर्य इकडे कुणीकडे उगवला ?... श्यामा पण आली आहे ना बरोबर ?''

''नाही. एकटाच आलो आहे.''

''तिला का नाही आणलं...? मी तुला लिहिलं होतं की श्यामाला घेऊन ये म्हणून... यू स्काउंड्रल...बायकोला बरोबर घेऊन बाहेर पडायला लाज वाटते काय !''

''आत तर येऊ देशील !''

ती तिथेच खळखळून हसली, ''कम इन... कम इन.'' उजवीकडे वळून ती त्याला ड्रॉइंगरूममध्ये घेऊन गेली. ड्रॉइंगरूम खूप छान सजवलेली होती. संपूर्ण खोलीभर गालिचा पसरलेला होता. डायनिंग टेबल, मोठ्या काचेचे सेंटर टेबल, उजवीकडे ठेवलेला रेडियोग्राम, समोर ठेवलेला टेलिव्हिजन, आणि डनलॉप पिलोचा चकचकीत नवा सोफासेट. तो दबून गेला आणि त्याला घाबरल्यासारखे वाटू लागले.

सोफ्यावर बसत तो म्हणाला, ''फार छान फ्लॅट आहे तुझा आणि तू सजवलाही आहेस चांगला.''

ती हसली... एक तृप्त हास्य. पुढे आलेली बट एक झटका देऊन तिने मागे केली.

''चहा आणू ?''

''किटी कुठे आहे ?''

''तिच्या खोलीत झोपली असेल.''

ती उठली आणि किचनकडे गेली. तो सकाळी स्टेशनवर घेतलेलं वर्तमानपत्र चाळू लागला. वर्तमानपत्र चाळता चाळता त्याची नजर पुन्हा पुन्हा ड्रॉइंगरूममधल्या वस्तूंवरून फिरत होती आणि त्याला वाटत होतं... दिवा आता खूप आरामात आयुष्य जगते आहे... दिवाने आपल्या पूर्वायुष्यातली सगळी कटुता, सगळे कष्ट, सगळी लांछनं गुंडाळून ठेवली आहेत आणि आता ती खूप शांत, स्थिर आणि तृप्त असं जीवन जगते आहे.

''श्यामाची काय हालचाल ? तू काहीच सांगितले नाहीस.'' कपात चहा ओतत ती म्हणाली.

''तुला माहीतच आहे की तिच्या आयुष्यात हालचाल अशी काहीच नाही. फक्त थोडीशी चाल आहे आणि नीट पावलं टाकीत ती कायम चालते आहे.''

ती फिकुटपणे हसू लागली.

''मग तू तुझी स्वत:ची हालचाल सांग.''

''माझे जीवन हालचालीचे नाही, धावपळीचे आहे हे तुला माहीत आहे.'' तो म्हणाला— ''आणि धावणाऱ्या माणसाला पावलं मोजायची फुरसत नसते.''

दोघेही काही वेळ गप्प बसले.

''तुझी काय हालचाल ?'' त्याने विचारले.

''बास्... जगते आहे.'' एक थकलेलं स्मित तिच्या चेहऱ्यावर उमटलं आणि मग डोळे बंद करून तिने आपले ओठ मिटून घेतले. एखाद्याने लांबचा प्रवास पूर्ण केल्यानंतर आपल्या घराच्या छताखाली विश्रांती घ्यावी तसे.

''किटी कुठे आहे ?'' आपण हे आधीच विचारले होते हे त्याच्या ध्यानात राहिले नाही. मग स्वत:च म्हणाला, ''अजून झोपलेली दिसते बहुतेक.''

इतक्यात मॅक्सी घातलेली एक उंच मुलगी आपल्यापुढे उभी असल्याचे त्याला दिसले. ती बिछान्यातून उठून आल्यासारखी दिसत होती आणि त्याला पाहून काहीशी चकित झालेली होती.

''हॅलो किटी... ओळखलंस मला ?''

मग दिवा वळून तिच्याकडे पाहत म्हणाली, ''अग, तुझ्या जॉली अंकलना विसरलीस की काय ?''

ती हसली... ''हॅलो अंकल... तुम्ही कधी आला ?''

''आत्ताच.''

‘‘आँटी कशी आहे ?’’

‘‘ठीक आहे... पण तू काय दिल्लीला न येण्याची शपथ घेतली आहेस का ?’’

‘‘ममा मला घेऊन जात नाही. स्वतः मात्र एकटी जाते.’’

‘‘मी घेऊन जात नाही तुला ?’’ दिवा म्हणाली... ‘‘तुलाच कुठं जायची इच्छा नसते.’’

‘‘गेवेज् ट्रॅव्हल्स्‌मधे काम करतेय.’’

‘‘शिक्षण पूर्ण केलंस ?’’

हे बोलणे मध्येच कुठेतरी अडकून पडले आहे असे त्याला वाटले. किटीने एकदम वर्तमानपत्र चाळायला सुरवात केली. उठता उठता दिवा म्हणाली, ‘‘बरं आता आंघोळ वगैरे करून घे. मी नाश्ता बनवते.’’

नऊ वाजायला आले. त्याने पाहिले, किटीपण तयार झाली आहे, दिवा पण तयार झाली आहे. दोघींच्याही हातात पर्स आहेत, दोघींच्याही हातात किल्ल्यांचे जुडगे फिरताहेत, दोघीही आपापल्या साड्यांच्या सुरकुत्या नीट करताहेत, निऱ्यांवरून हात फिरवताहेत, दोघीही आपापल्या ओठांवरची लिपस्टिक एकसारखी करताहेत.

‘‘आमच्याजवळ आपापल्या किल्ल्या आहेत. दिवा म्हणाली— ‘‘ही तिसरी किल्ली तू सांभाळ. नीट बंद-बिंद करून जा.’’

रात्री तो परत आला तेव्हा दिवा घरी आलेली होती. दार उघडून ती मागे सरकली तेव्हा त्याला एक भपका मागे सरकल्यासारखे झाले. फ्लॅटच्या आत आल्यावर इकडेतिकडे सिगरेटचा धूर भरलेला आहे. आणि सगळ्या फ्लॅटभर एकदम निस्तब्धता पसरलेली आहे असे त्याला वाटले.

‘‘कुठे भटकत होतास दिवसभर ?’’

‘‘आजचा सगळा दिवस तर चंदरला शोधण्यातच निघून गेला.’’ तो म्हणाला— ‘‘आता तो कल्याण कँपमधे राहतो. कडक, रखरखीत उन्हात, ओबडधोबड आणि अस्ताव्यस्त पसरलेल्या कल्याण कँपमध्ये... अनेक मैल पसरलेल्या... त्याचं घर शोधलं तेव्हा मला वाटलं की आपण कोलंबसाप्रमाणेच नवं जग शोधून काढलंय.’’

‘‘जेवण...’’

‘‘जेवून आलो. चंदरची बायको पराठे फार छान करते.’’ वर पसरत असलेली निस्तब्धता हळूहळू खाली सरकू लागली.

ती उठून आपल्या बेडरूमकडे गेली आणि परत आली. तेव्हा तिच्या हातात सिगरेटची डबी आणि काड्यांची पेटी होती. जवळच्या सोफ्यावर बसून तिने सिगरेट पेटवली आणि ती ओढू लागली.

तेव्हाच एकाएकी त्याला वाटले की किटीबद्दल विचारायला हवं.

''किटी अजून नाही आली ?''

''तिच्या मैत्रिणीच्या घरी गेली असावी बहुधा.'' जांभई देत ती म्हणाली.

तो तिच्याकडे टक लावून पाहू लागला. दिवा किटीच्या बाबतीत खूप उदास किंवा खूप निरपेक्ष असावी असे त्याला वाटले.

''किटी आता बरीच मोठी झाली आहे.'' तो म्हणाला.

''हूं...'' ती म्हणाली. जणू काही हे तर होणारच होते.

''तिच्या लग्नाबद्दल तू काय विचार केला आहेस ?''

''तिच्या लग्नाबद्दल ती स्वत:च विचार करेल.'' उरलेली सिगरेट ॲश-ट्रेमध्ये चुरडत दिवा म्हणाली— ''जेव्हा पाहिजे तेव्हा, जिथं पाहिजे तिथं, ज्याच्याशी पाहिजे त्याच्याशी लग्न करेल.''

तो विचार करू लागला. त्याला वाटले, किटी तिच्या बॉयफ्रेंडबरोबर सिनेमा पहायला गेली असावी. मग त्याला वाटले किटी फारच साधी, फारच निरागस मुलगी आहे. जेव्हा पाहिजे तेव्हा, जिथं पाहिजे तिथे, ज्याच्याशी पाहिजे त्याच्याशी या परिस्थितीशी ती सामना करू शकेल ?

एवढ्यात बेल वाजली. दिवा खूप आळसटल्यासारखी उठली. दार उघडण्याचा, किटीच्या आत येण्याचा आणि दार बंद होण्याचा आवाज आला. दिवा पुन्हा आपल्या जागेवर येऊन बसली.

''किटी आली ?'' त्याने विचारले.

''हूं...''

त्याला वाटले किटी सरळ आपल्या खोलीत गेली असावी. मग त्याला वाटले, की किटी कपडे बदलून या खोलीत येईल आणि थोडा वेळ बसून गप्पा मारील.

दिवाने आणखी दोन-तीन सिगरेटी फुंकून टाकल्या होत्या. मधे बराच वेळ निघून गेला असावा असे त्याला वाटले. तो उठला. आपल्या अटॅचीमधून त्याने कुडता-पायजमा काढला आणि कपडे बदलण्यासाठी तो बाथरूमकडे गेला. बाथरूमकडे जाताना तो किटीच्या खोलीपुढून गेला. दाराला पडदा होता पण त्याला तिचे ओझरते दर्शन झाले. ती आपल्या पलंगावर पडून काहीतरी वाचत होती.

कपडे बदलून तो आला तेव्हा दिवाने ड्रॉइंगरूममधल्या दिवाणावर त्याच्या झोपण्याची व्यवस्था केली आहे हे त्याला दिसले.

''प्यायला पाणी ठेवते.'' असे म्हणून दिवा पाणी आणायला गेली.

बेडवर बसून तो खोलीतल्या एक एक वस्तू टक लावून पाहू लागला. टेलिव्हिजन, रेडियोग्राम, डायनिंग टेबल, सोफासेट, सगळ्या निर्जीव वस्तू आपापल्या जागेवर ठेवलेल्या. एकीचा दुसरीशी काही संबंध नाही. तो विचार करू लागला. या खोलीतल्या

वस्तूंची पोझिशन बदलता येणार नाही का ? डायनिंग टेबल तिथे न ठेवता त्या भिंतीला लावून ठेवले तर कसे ? सोफासेट तिकडे ठेवता येईल. दिवाण तिकडे सरकवता येईल. टेलिव्हिजन?... तो खोलीत इकडेतिकडे पाहू लागला. मग त्याला वाटलं की या वस्तू जेथे ठेवलेल्या आहेत तेथेच ठीक आहेत.

दिवाचा थरथरता आवाज ऐकू आला— ''गुड मॉर्निंग... झोप आली ?''

''मला कोणत्याही जागी झोप येते. शी इज व्हेरी काइंड टू मी.''

ती खळखळून हसली.

टेबलावर नाश्ता घेत असताना तो म्हणाला, ''आज नाइट शो ची तीन तिकिटे मी घेऊन येईन.'' किटीकडे वळून तो म्हणाला, ''तुला ऑफिसनंतर कुठे जायचे तर नाही ना ?''

किटी तिच्या टोस्टला बटर लावत होती.

''कुठे काही खास असं नाही अंकल.''

त्याने दिवाकडे पाहिले— ''घरातून जरा लवकरच बाहेर पडू. थोडी चौपाटीची सैर करू.''

मग ते गप्पा मारू लागले... कुठे कोणता चित्रपट लागला आहे. बरेचसे चित्रपट पाहिलेलेच होते... काही दिवाने... काही किटीने.

''तुझ्याबरोबर कोणता चित्रपट पाहिला होता ?'' आपण नको ती गोष्ट विचारली असे अचानकच त्याला वाटू लागले. दिवाच्या चेहऱ्यावर एक रुक्ष स्मित पसरले होते आणि ते भयंकर दिसू लागले होते. किटीचा चेहराही थोडा व्यग्र झाल्यासारखा वाटत होता.

''तुझ्या हातचे आलू-पराठे मी विसरू शकत नाही. इतके स्वादिष्ट आलू-पराठे मला दुसरीकडे कुठेही खायला मिळाले नाहीत. खरंच सांगतो, कुकिंगसाठी जर एखादे नोबेल प्राइझ असेल तर ते तुला फक्त तुझ्या आलू-पराठ्यासाठी मिळू शकेल,'' तो म्हणाला.

दिवा आणि किटी दोघीही हसू लागल्या.

''अंकल, तुम्ही फार लबाड आहात,'' किटी म्हणाली— ''ममाला लोणी लावता आहात ना... पण ममा, कितीतरी दिवसात तू आलू-पराठे केलेले नाहीत. रोज सकाळी तोच तो ब्रेड, बटर आणि अंडी खाऊन मी तर बोअर होऊन गेलेय.''

''उद्या नाश्त्याला आलू-पराठे करीन.''

दिवाचा चेहरा फुलला होता. कुठल्या तरी कोपऱ्यात लपलेलं मातृत्व तिच्या चेहऱ्यावर थोडे थोडे प्रकट होऊ लागलं होतं. एका स्लाइसवर लोण्याचा भलामोठा थर पसरून तिने तो किटीच्या प्लेटमध्ये ठेवला.

''ओ... नो ममा... मी नाही खाणार.''

''डोंट बी सिली...'' असे म्हणून ती दुसऱ्या स्लाइसला लोणी लावू लागली.

तो पुन्हा वर्तमानपत्र चाळू लागला आणि सिनेमाबद्दल गप्पा मारू लागला. दोन-तीन सिनेमे न पाहिलेले होते पण त्यांना रिलीज होऊन दोन-तीन दिवसच झालेले होते. त्यामुळे त्यांची तिकिटे मिळण्याची शक्यता नव्हती. तो म्हणाला— ''यातल्या ज्याची तिकिटे मिळतील त्याची आणतो.''

संध्याकाळी ते चौपाटीच्या वाळूत बसले होते.

अचानक दिवा म्हणाली— ''वर्षा-सहा-महिन्यातून कुठे एखादा दिवस असा येतो.''

त्याने दिवाकडे पाहिले. समोर समुद्रात उभ्या असलेल्या एका होडीकडे ती पाहत होती. मग ती त्याच्याकडे पाहू लागली. ''मग जरा हलकंहलकं वाटायला लागतं, माझंही एक कुटुंब आहे... मी आणि किटी मायलेकी आहोत...''

ती हसली आणि किटीकडे पाहू लागली. किटी मुठीत वाळू भरत होती. आणि आपल्या बोटांच्या मधून सोडून देत होती.

''किती विचित्र गोष्ट आहे. आमच्या दोघीत जोपर्यंत तिसरं कोणी येत नाही तोपर्यंत आम्ही मायलेकी आहोत हेच आम्हाला जाणवत नाही. एकमेकींशी बोलल्याविना आमचे आठवडेच्या आठवडे निघून जातात. फ्लॅटमधे एकमेकींच्या सावल्या पाहूनच आम्हाला परस्परांचे असणे जाणवते. वेगवेगळ्या खोल्या, वेगवेगळी बाथरूम, एवढेच नव्हे तर टूथपेस्टही वेगवेगळी.''

किटी खूप शून्यपणाने, मुकाट्याने हे ऐकत होती. ''चला, भेळपुरी खाऊ या,'' ती म्हणाली. सगळेजण उठून भेळपुरीवाल्याकडे निघाले.

मग सगळे जण हळूहळू चालत लॅमिंग्टन रोडवर येऊन सिनेमा पाहू लागले. त्याला एका बाजूला बसायचं होतं पण दिवा आणि किटी यांनी अशी काही स्थिती निर्माण केली की त्याला त्या दोघींच्या मध्ये बसावे लागले.

फिल्म पाहून बाहेर पडले तेव्हा किटी म्हणाली. ''अंकल, चला थोडा वेळ पुन्हा चौपाटीवर जाऊ या. रात्री तिथं बसायला मोठी गंमत वाटते.''

त्याने दिवाकडे पाहिले.

''चल ना ममा...'' किती दिवाला बिलगली.

ती हसली— ''उद्या ऑफिसला जायचं नाही ?''

''उद्याची कॅज्युअल घेऊन टाकू...'' ती मोठ्या उत्साहाने, म्हणाली— ''आणि उद्या संपूर्ण दिवस अंकलबरोबर पिकनिकला जाऊ. आणि अंकल, उद्याचे तुमचे सगळे कार्यक्रम कॅन्सल.''

दिवाने त्याच्याकडे पाहिले— खूप सखोल, खूप भरलेल्या खूप मोहक दृष्टीने. जणू तो 'तो' नाही. तो 'तो' आहे. तो... तो... किटीचा 'अंकल'... किटीचा पिता...

गाडी सकाळी सकाळी सात पस्तीसला सुटते— वी.टी.स्टेशनावरून. दिवाने दिवसभरासाठी आलूपराठे बनवले होते. त्याच्याबरोबर अनेक प्रकारची लोणची आणि सॅलडही दिले होते. सकाळचा नाश्ताही खूप लवकर तयार केला होता. किटी पण इकडेतिकडे काहीतरी करीत असलेली त्याला दिसत होती. किटी अधूनमधून त्याला आठवण करून देत म्हणत होती— "मद्रासला तुम्ही माझ्यासाठी थोडे शंख विकत घ्या. एक चांगला मोठा पंजाएवढा. पण कुठेही थोडासासुद्धा तुटलेला फुटलेला नाही हे नीट पाहून घ्या. आणि दुसरा मोठा शंख, देवळातून वाजवतात तसला. आणि मद्रासहून तुम्ही सरळ दिल्लीला निघून जाल. तिथे माझ्या वस्तू सांभाळून ठेवा. ममा जेव्हा पुढच्या वेळी येईल तेव्हा तिच्याजवळ द्या."

"तू दिल्लीला येणार नाहीस...?" दातांनी टोस्ट तोडीत त्याने विचारले.

"यावेळी मी ममाबरोबर येईन... नाही, ममाबरोबर नाही, एकटीच येईन. तुम्ही मला दिल्लीची चांगली सैर घडवाल ना ? सगळ्या ठिकाणी फिरवून आणावं लागेल."

चहाची किटली टेबलावर ठेवीत दिवा म्हणाली, "किटी बेटा, अंकलच्या गाडीची वेळ झालीय. तू थोडं रस्त्यावर जाऊन टॅक्सी घेऊन ये पाहू."

किटी टॅक्सी आणायला गेली.

त्याबरोबर दिवा खुर्चीवर बसली.

सामान बांधून झालं होतं.

तो कपडे घालून तयार होता.

त्याने चहाचा शेवटचा घोट घेतला आणि तो दिवाकडे पाहू लागला. ती शून्य नजरेने हसण्याचा प्रयत्न करीत होती.

त्याने तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेतले.

दिवाची नजर अधिकच शून्यवत झाली.

टॅक्सी निघाली तेव्हा दोघींनी हात हलवले. त्याने पाहिले, दोघी लिफ्टकडे वळल्या आहेत.

एक दोन वळणं घेऊन टॅक्सी रस्त्यावर आली. रस्ते अजून रिकामे होते. सामसूम अजून पूर्णपणे संपलेली नव्हती. फार छान हवा वाहत होती. मागे राहिलेल्या फ्लॅटच्या काही प्रतिमा त्याच्या समोर येऊ लागल्या...

लिफ्टमधे दिवा आणि किटी गप्प आहेत... लिफ्टमधून बाहेर पडून दिवा फ्लॅटचा दरवाजा उघडते आहे...किटी सरळ आपल्या खोलीत निघून जात आहे... दिवा

भांडीवाल्याबाईला डायनिंग टेबल स्वच्छ करायला सांगते आहे. किटी आपल्या बेडवर पडून कुठल्यातरी मासिकाची पाने चाळते आहे... मग उठून आंघोळीला जाते आहे... दिवा आपल्या खोलीत येऊन सिगारेट पेटवते आहे आणि वर्तमानपत्राचे मथळे पाहते आहे... मग ती पण आंघोळीला जाते आहे... बाई टेबलावर नाश्ता मांडते आहे... ब्रेड, बटर, उकडलेली अंडी, दूध...

मग नऊ वाजतात. दोघी आपापल्या पर्स सांभाळताहेत, आपापल्या किल्ल्यांचे जुडगे सांभाळताहेत... आपापल्या साड्यांचा निऱ्यांवरून हात फिरवताहेत... लिपस्टिक लावलेले ओठ आरशात पाहताहेत आणि फ्लॅटच्या बाहेर पडताहेत...

त्याला समोर व्ही.टी.स्टेशनाची भव्य इमारत दिसू लागली होती.

# नरकवासी

**शानी**

मी हलक्या पावलाने आत आलो. बाहेरचे गेटसुद्धा मी हळूच उघडले होते—आवाज होऊ न देता. घराचे समोरचे दार पुढे केलेले होते—नेहमीसारखे. मी ते पण हळूच ढकलले. खरं तर मला जमीलपुढे एकदम अचानक जाऊन उभा राहायचे होते—हृदयविकाराच्या झटक्यासारखे !

भोपाळसारख्या शहराची दुपार—उतरत असलेली—दिवसा इथे इतकी सामसूम आणि आळस भरलेला असतो की लोक बहुतेक झोपलेले असतात. जमील घरी भेटण्याची ही वेळ आहे हे मला ठाऊक होते. शहराच्या स्वभावाच्या ढंगावरूनच नव्हे तर त्याच्या काम करण्याच्या पद्धतीवरच्या विश्वासामुळेही. त्याचे कॉलेज सकाळ-संध्याकाळ असायचे. आणि त्यामुळे सगळी दुपार मोकळी असायची.

जमील दिवाणावर पसरलेला होता—भिंतीकडे तोंड करून. आवाज आला तसे त्याने चमकून पाहिले आणि क्षणभर पाहतच राहिला. चकित. मग ''अरे'' म्हणत धडपडून उठला आणि आम्ही दोघे एकमेकांना बिलगलो. त्याची मिठी फार घट्ट होती. त्याचे हात लांब आणि सुदृढ होते आणि तळहात जणू काही माझ्या पाठीत घुसू पाहत होते—स्नायूंच्या आणि मांसाच्या आरपार. हाताची बोटेही बोलतात हे प्रथमच जाणवले.

''कधी आलास ?'' काही क्षणानंतर मान बाजूला घेत त्याने विचारले—गळा दाटल्यासारख्या स्वरात. त्याचा चेहरा अजूनही माझ्या इतक्या जवळ होता की आम्ही परस्परांना पाहू शकत नव्हतो.

''सकाळी,'' मी म्हणालो.''दक्षिण एक्सप्रेसने.''

वेगळे झालो. बसलो.

''मी आज सकाळीच आठवण करीत होतो,'' तो म्हणाला. आणि तक्क्याला टेकून माझ्याकडे पाहू लागला. डोळे भरून सामावून घेणारी ती नजर होती—सगळं काही. तेवढ्यात शेजारच्या खोलीचा पडदा बाजूला सारीत त्याची बायको— कनीज—आली. हसत हसत सलाम केला. जवळ बसली. बोलली. आनंदित झाली.

''बाजी कशा आहेत ?'' मी कनीजला म्हणालो— ''त्यांना माझा सलाम...''

‘‘नमाज पढत आहेत,’’ ती आत पाहत म्हणाली— ‘‘आणि तुमच्यासाठी काय आणू ? आधी जेवून घ्या...’’

‘‘...आता या वेळी ?’’ मी हसू लागलो. नेहमीसारखा. मला ठाऊक होते की ती जेवायचे घेऊन येणार आणि मी खाणार. ती उठून आत निघून गेली.

‘‘हल्ली बाजींची तब्येत कशी काय असते ?’’ मी जमीलला विचारले.

बाजींची बसण्याची जागा बाहेरूनच दिसते. आणि त्या नमाज पढताहेत हे मला आत येतानाच दिसले होते. प्रश्न गैरसोयीचा वाटण्यासारखा होता. जमील सिगरेटचे पाकीट चाचपडू लागला. सापडल्यावर एक पेटवली आणि माझ्याकडे पाहत त्याने डोके हलवले. म्हणजे आता ठीक आहे. आणि फिकुटपणे हसला. बाजी-भाईजान म्हणजे आईवडील. बाजी गेल्या काही महिन्यापासून आजारी असलेल्या. घरात घडलेल्या नव्या दुर्घटनेच्याही आधीपासून भाईजान अचानक एके दिवशी गेले. कदाचित त्या दिवसापासूनच. रात्री ते चांगले व्यवस्थित झोपले होते आणि सकाळी उठले नाहीत.

‘‘कोण आहे अल्लन ?’’ आतून बाजींचा आवाज आला. त्या बहुतेक नमाज पढण्याच्या चटईवरून उठत होत्या. अल्लन म्हणजे जमील. जमीलने माझे नाव सांगितले. मी दिल्लीहून आलो आहे म्हणून सांगितले. सलाम म्हणतोय म्हणूनही सांगितले. त्यांनी तिकडूनच आशीर्वाद दिला—खूप थकलेल्या आवाजात ? मग काहीतरी बडबडत राहिल्या—काय ते काही मला समजले नाही. दारापर्यंत जाऊन त्यांची विचारपूस करावी असे वाटले पण हिंमत झाली नाही. त्यांच्यासमोर जाणे मला शक्य नव्हते.

‘‘आणखी काय ?’’ थोड्या वेळाने जमीलने मला विचारातून परत आणण्यासाठी विचारले—दुसरीकडे लक्ष वेधण्यासाठी.

‘‘कशी काय आहे तुझी दिल्ली ?’’

‘‘माझी ?’’

जमील हसला.

दिल्ली म्हणजे एक नरक आहे, पूर्वी मी हे नेहमी म्हणायचो. चार वर्षांपूर्वी जेव्हा मी या शहरातून बाहेर पडलो तेव्हा माझ्या मनात फार कटुता होती. असे बहिष्कृत होणे ही मागच्या सरकारची कृपा होती आणि मी दिल्लीला आलो नाही तर मला दिल्लीत उचलून टाकलंय हे मी विसरू शकत नव्हतो. आता जरी तशी काही गोष्ट राहिलेली नसली तरी मी दिल्लीचा होऊ शकत नाही आणि दिल्ली माझी होऊ शकत नाही हे जमीलला ठाऊक होते.

‘‘चल, मेरठच्या दंग्याबद्दल का होईना. काय परिस्थिती आहे ?’’

‘‘तिथला दंग्यांचा इतिहास खूप जुना आहे. सन सत्तेचाळीसच्याही आधीचा. नवीन मी काय सांगणार ? जे वर्तमानपत्रात येते आहे तेच सांगू शकतो. हो, असं ऐकलं आहे की मुरादाबाद आणि अलिगढमध्ये वातावरण तंग आहे म्हणे.’’

''तुझा वर्तमानपत्रांवर विश्वास बसतो ?''

मी गप्प बसलो.

''जे लोक तोंडावर बसलेले आहेत त्यांना माहीत असते.'' तो म्हणाला.

''कुठे आहे तोंड ?''

''दिल्ली तोंड नाही का ? या देशाचं, मेरठचं, जमशेटपूरचं किंवा भागलपूरचं...?''

मी खोलीच्या भिंती पाहू लागलो. भिंतीवर अनेक आकारांची पेंटिंग्ज लावलेली होती. कनीजने काढलेली. हुसेन आणि हेब्बार यांचा संमिश्र प्रभाव त्यामधून स्पष्टपणे जाणवत होता. माझा पवित्रा बचावाचा होता हे उघडच होते. कदाचित आम्ही दोघेही ज्या गोष्टीला मनातून भिऊन होतो तिला तोंड फुटू नये म्हणून आम्ही दोघेही बचावाचा पवित्रा घेत होतो.

''तुझा चेहेरा पुन्हा पहिल्यासारखा दिसू लागला आहे,'' जमील विषय बदलीत म्हणाला, ''गेल्या आजारपणात तो कुठे गेला होता कोण जाणे.''

''ही हार्ट अटॅकची देणगी आहे,'' मी म्हणालो आणि दांभिकपणे हसलो. जणू काही मी एखादा गड सर करून आलो होतो.

''आता तू पूर्ण बरा झाला आहेस ना ?'' त्याने विचारले.

''पूर्ण आहे का नाही, ठाऊक नाही; पण बरा मात्र नक्कीच झालो आहे, हृदयविकाराचे रोगी जितपत बरे होतात तितपत.''

आणि हे म्हणत असतानाच मला वाटले की माझ्या आवाजात आत्मदयेचा स्वर आला आहे. म्हणून आपल्या जुन्या दांभिक सुरात परत येत मी म्हणालो, ''खरं तर मी आता पर्वा करायचंच सोडून दिलं आहे. जेव्हा येणार असेल तेव्हा येईल. तेव्हा डॉक्टर असले तरी थांबणार नाही किंवा मी थांबवले तरी थांबणार नाही.''

''बरेच दिवस इकडे कुणालाच पत्ता नव्हता,'' जमील म्हणाला— ''अफवेसारखी बातमी आली होती काहीतरी उलटसुलट. आम्ही घाबरून दिल्लीला फोन केला तेव्हा तुझ्या तिथल्या मित्रांनी सांगितले की तसं काही नाही आहे. हॉस्पिटलमध्ये ठेवलंय हे खरं आहे; इन्टेन्सिव्ह केअर युनिटमध्ये पण आहे, पण हार्टबिर्टचं काही प्रकरण नाही. दिल्लीत तुला बघून परत आलेल्या पंकजने मग सांगितले की सगळे किती सीरिअस होते... हे कसं काय झालं ?''

''असंच... असल्या गोष्टी होतात त्या अशाच.''

''अचानक.''

''घरी ?''

''नाही. ऑफिसात.''

''कसे काय झाले ?''

''...मी एका भेटायला आलेल्या माणसाशी बोलत होतो. एकदमच मला अस्वस्थ

वाटायला लागलं. छातीत ओढल्यासारखं झालं आणि वेदनेच्या कळा उठू लागल्या आणि मी घामानं चिंब भिजून गेलो. माझा आवाज एकदम मंद झाला. हृदयगती थांबू लागली होती. मला उठायचं होतं; पण माझ्यात ताकदच नव्हती. मला बसून राहायचं होतं; पण इतका अस्वस्थपणा आणि घाबरलेपणा आलेला होता की...''

बोलता बोलता मी थांबलो; कारण मला हवा तसा जमीलचा चेहरा भयग्रस्त झालेला होता. मी सोसलेल्या यातना येथे फार वरवरपणे अनुभवल्या गेल्या होत्या, त्यांचा हिशेब पूर्ण करताना मला आनंद होत होता. शिवाय मला दिल्लीच्या मित्रांच्या वागण्याचा रागही येत होता. ठीक आहे, काही एक विचाराने माझ्या आजाराचं गंभीरपण दडवून ठेवण्यात आले होते; पण त्यामुळेच ज्या गोष्टी मला हव्या होत्या त्यापासूनच मी वंचित राहिलो. जवळजवळ एका वर्षानंतर मी या शहरात प्रवेश करीत होतो, दुर्मिळ होता होता अचानक वाचलेल्या माणसासारखा.

''तुला आठवतं, मी तुला सांत्वनपर पत्र कधी पाठवलं होतं ? एप्रिलची सात तारीख होती आणि एक तासभर आधी मी तुला पत्र लिहिले होते. ज्या वाटेवर हसीन गेला आणि परत आला नाही, त्या वाटेवर आपणही थोड्याच वेळात जाऊन पोहोचणार आहोत असं मला बिल्कुल वाटलं नव्हतं.''

तेवढ्यात कनीज बाहेर आली. आणि माझ्यासमोर कबाब आणि रोट्यांची थाळी ठेवीत म्हणाली, ''घ्या. खा.'' मग एक स्टूल पुढे ओढून घेऊन समोरच बसली. पहिला घास घेतानाच मला वाटले की आपण हसीनचे नाव घ्यायला नको होते. मला घ्यायचेही नसावे, पण बोलण्याच्या ओघात आले; पण नाहीतरी का म्हणून ? मी सांत्वनासाठी आलो नव्हतो का ? सांत्वन आणि तेही हसीनबद्दलचे. जो माणूस कालपरवापर्यंत या शहरात दुसऱ्यांच्या सांत्वनासाठी जायचा आणि काय बोलायचे हे त्याला कळायचे नाही, तो माणूस म्हणजे हसीन. तो मुकाट्यानं बसून राहायचा—शून्य दृष्टीने एका दिशेने पाहत राहायचा.

ही बातमीही मला ऑफिसातच मिळाली होती. दिल्लीत. जमीलने कळवले नव्हते. या शहरातून ही बातमी आलीच नव्हती. बुऱ्हाणपुराहून सईद महमदने लिहिले होते :

''तुला हे कळल्यावर धक्का बसेल,'' त्याने पत्रात लिहिले होते की ''आपल्या दोघांचा अत्यंत प्रिय मित्र हसीन अहमद सिद्दीकी नायजेरियात मरण पावला. हार्टफेलने. नसीरभाभी त्याची मैयत घेऊन भोपाळला आली होती आणि त्याचे दफन करून मी कालच परत आलो. आपलं जे काय व्हायचं ते झालं; पण तीन लहानलहान पोरांना बरोबर घेऊन मागे राहिलेल्या एका तरुण बाईवर जो अन्याय झाला आहे, त्याची भरपाई कशाने तरी होईल का याचा विचार कर.''

पत्र हातात धरून मी कितीतरी वेळ बसून राहिलो होतो. मी ते निदान तीन वेळा

तरी वाचले होते आणि हसीनच्या नावाकडे पाच वेळा पाहिले होते. खरं वाटायला हवं होतं; पण वाटत नव्हतं. आणि जेव्हा वाटलं तेव्हा त्या एका क्षणाच्या एक-शतांशात मला मोकळं झाल्यासारखं वाटून मी निश्वास सोडला होता. मग मी हळूहळू दुःख आवरून घेतलं, अंतःकरणात साठवलं आणि एकदम दुःखी झालो होतो.

''हे काय घडलं ?'' त्यानंतर आलेल्या प्रत्येकाला मी सांगत होतो— ''हे काय त्याचं जायचं वय होतं ? आणि तेही हृदयविकाराने ? तो तर माझ्याहून दोन वर्षांनी लहान होता. देवाला घाबरणारा आणि निर्व्यसनी माणूस होता. सिगारेटसुद्धा पीत नसे.''

हे सगळं सांगत असताना मी घाबरलेलो होतो किंवा माझी भीती घालवू पाहत होतो. तरीही ऑफिसातून घरी परत येईपर्यंत या गोष्टीने माझा पिच्छा सोडला नव्हता. ती माझ्या इतक्या आत जाऊन पोहोचलेली होती की त्यामुळे मी एकदम गप्पच झालो. ही बातमी घरी सांगण्याएवढी महत्त्वाची होती, पण त्या दिवशी मी ती बायकोलाही सांगितली नाही— घरी पण सारखा त्याच गोष्टीचा उल्लेख होत राहील आणि रात्री हसीनचा चेहरा मला झोपू देणार नाही या भीतीने. त्या रात्री मी झोपलो खरा; पण हसीनने मला खूप त्रास दिला. चारही बाजूंनी त्याचा चेहरा यायचा आणि माझ्यावर आक्रमण करायचा. आणि स्वप्नात रात्रभर त्याची मयत दिसायची— कितीतरी दिवसांची जुनी मैयत. त्या दिवशीच नाही तर दुसऱ्याही दिवशी असेच झाले आणि त्यानंतरच्या दिवशीही. तरी मी कुणाजवळ काहीही बोललो नव्हतो. सांत्वनाचं पत्र लिहायचं मी तीन दिवस टाळत होतो. अखेर जमीलला पत्र लिहिले. हसीनप्रमाणेच मलाही सांत्वनात काय म्हणायचे ते कळत नव्हते...

गोष्ट विचित्र आहे खरी; पण हसीन माझा मित्र राहिलेला नव्हता हे खरं आहे. विशेषतः अलीकडच्या वर्षांत—तो नायजेरियाला गेला होता तेव्हा किंवा त्याच्याही आधीपासून असेल बहुतेक. मी हळूहळू त्याच्या भावाचा—जमीलचा—मित्र होऊ लागलो होतो. पंधरा वर्षांपूर्वी मी भोपाळला आलो होतो तेव्हा त्याच्याशी मैत्री झाली होती. आम्ही दोघेही बाहेरून भोपाळला आलेलो होतो आणि आम्हा दोघांचाही येथे काही ठावठिकाणा नव्हता. हसीनच्या व्यक्तिमत्त्वात एक विशेष प्रकारचे पुरुषी आकर्षण होते— एकदम आपल्याकडे ओढून घेणारे. तो उंच आणि सडपातळ होता आणि त्याला हळूहळू टक्कल पडू लागले होते. पहिल्या दिवसापासूनच माझ्या ध्यानात आले होते की सूक्ष्म भावभावना असलेला हा माणूस रागीट आणि आक्रमक आहे. आणि त्याला चांगलाच सेन्स ऑफ ह्युमर आहे. तो अशा काही लहान लहान आणि छान छान अतिशयोक्ती करायचा की हसता हसता कुणीही त्याच्या अधीन होऊन जायचा. त्या वेळी आम्ही जुन्या भोपाळमधल्या अमीरगंज गल्लीत राहत होतो आणि तरुण होतो. हसीन एका प्रायव्हेट कॉलेजात विज्ञान शिकवायचा आणि मी एका ऑफिसात लेखणी

झिजवत होतो. जुन्या श्रीमंत अमीरउमरावांचा मोहल्ला होता आणि आमच्यासारखे फाटके लोक फार थोडे होते—आम्ही आमची तोंडं लपवायचो. वास्तविक आमच्या दोघांची मैत्री म्हणजे दोन निर्धन, अगतिक आणि रागीट माणसांची, दोघांनाही समाधान देणारी मैत्री होती. आधी मीच लट्टू झालो होतो; पण नंतर त्यालाही लट्टू व्हायला भाग पाडले होते. तरी पण आम्ही दोघंही वेगवेगळ्या ढंगाची माणसं होतो. तो विज्ञान शिकवायचा, पण पुराणमतवादी आणि धर्मनिष्ठ होता आणि स्वत:ला स्वर्गात जाण्यास योग्य असा पुण्यात्मा समजायचा. माझा विज्ञानाशी काहीच संबंध नव्हता; पण त्याचाच आधार घेऊन मी स्वत:ला आधुनिक मानायचो आणि पुरोगामी व्हायचो— हसीनचा फतवा माझ्या माथ्यावर मारलेला असायचा की मी नरकात जाणारा पापात्मा आहे म्हणून. खरी गोष्ट अशी होती की आम्ही दोघेही एकमेकांना नरकातले पापात्मे समजत होतो आणि ज्याला आम्ही 'कांदू' म्हणत होतो त्या तिसऱ्यालाही दोघे मिळून तसेच म्हणायचो.

''तू कपटी आहेस,'' एकदा रागाने खवळून तो मला म्हणाला होता— ''पहिल्या प्रतीचा पाखंडी आणि धूर्त आहेस...''

''का, तुझ्यापेक्षा जास्त ?''

''होय. मी तर तुझ्या पायधुळीच्याही बरोबर लागत नाही.''

''तसा तू एरव्हीही लागत नाहीसच,'' मी हसण्यावरी घालवू पाहत होतो.

''तुला दोन्हीकडच्या मजा मारायच्या आहेत.'' जवळजवळ आपलेच केस उपटत तो म्हणाला होता, ''नास्तिक बिस्तक काही नाहीस. हे सगळं तुझं ढोंग आहे.''

''तुझ्यासारखा पुण्यात्मा होण्यापेक्षाही मोठं ढोंग ?'' मी प्रतिवाद केला.

''कशाला उगीच उपास काढतोस दोस्ता. मी नेहमीच म्हणत असतो की जे खरेखुरे रोजे करणारे असतात ते सेहरी (रोजा करण्यापूर्वी पहाटे, रात्री ठेवलेले खाणे) नंतर इफतार (रोजा सोडतानाचे खाणे) आणि इफतारनंतर सेहरी या गोष्टींची काळजी करीत नाहीत.'' रमजानच्या दिवसात सकाळ-संध्याकाळ पिशवी हातात घेऊन कधी कोंबड्यासाठी तर कधी तितरसाठी, कधी लाव्ह्यासाठी तर कधी मासळीसाठी, तर कधी बिर्याणीसाठी जे बाजाराकडे धावत असतात त्यांची मी टिंगल करायचो. त्यामुळे हसीनला वाईट वाटते हे माहीत असूनही. कारण मला तेच हवे असायचे.

''तू हियातही नाहीस आणि शियातही नाहीस. न इकडचा, न तिकडचा. अल्ला तुझ्यावर रहम करो !''

तो मला म्हणत असायचा.

ही काही एखाद्या दिवसाची गोष्ट नव्हती. आम्ही दोघं नेहमीच कोणत्या ना कोणत्या तरी बाबीवर असे भांडत बसायचो. रागात एकमेकांना पुन्हा कधी तुझ्याशी बोलणार नाही अशी धमकीही द्यायचो; पण दुसऱ्या दिवशी किंवा तिसऱ्या दिवशी पुन्हा

भेटलो की पुन्हा भांडायचो...

देशात दंग्यांचं पीक आलेलं होतं तो हा काळ होता. एकापाठोपाठ या ना त्या शहरात दंगे भडकू लागले होते—जबलपूर, भिवंडी, जळगाव, अहमदाबाद, जमशेटपूर आणि...

आम्ही भोपाळ शहरात राहत होतो. या शहराला दंग्याचा इतिहास नव्हता; तरी पण आम्ही घाबरलेलो होतो. कारण शहरात तंग वातावरण होते. सरकार सावध झालेले होते. ठिकठिकाणी पोलिस आणि होमगार्ड तैनात केले गेले होते. रोज अफवा उठवा होत्या आणि रोज बातम्या यायच्या—भयोत्पादक बातम्या. अनेक वर्षे शेजारी राहिलेले हिंदु-मुसलमान परस्परांकडे शंकित आणि भयग्रस्त नजरेने पाहू लागले होते आणि लहानसहान समूहात वाटले गेले होते.

''बघ,'' अशाच एका संध्याकाळी हसीन घाबरलेल्या आवाजात म्हणाला, ''सुव्वरच्या बच्च्यांनी देशाची फाळणी करून काय करून टाकलंय...''

सकाळच्या वर्तमानपत्रात त्याने हृदयाचा थरकाप उडवणाऱ्या काही बातम्या वाचल्या होत्या. त्याची दाढी वाढलेली होती आणि केस कोरडे कोरडे आणि विस्कटलेले. एरव्ही दिसतो त्यापेक्षाही आज तो जास्तच टकलवाला दिसत होता.

''आता हा देश राहण्याच्या लायकीचा राहिला नाही.'' तो म्हणाला— ''एखाद्या दिवशी आपल्यालाही कापून टाकून देतील आणि रडायलाही कुणी असणार नाही.''

''का, मी आहे की,'' मी हसून म्हणालो. वस्तुत: मी त्याची आणि माझी स्वत:ची भीती हसण्यावारी घालवू पाहत होतो अंधारात गायल्या जाणाऱ्या गाण्याप्रमाणे.

''तू पण असणार नाहीस,'' डोळे वटारून तो त्वेषाने म्हणाला—''उद्या काफिरांची झुंड खंजीर आणि कुऱ्हाडी घेऊन तुझ्या दारावर चाल करून आली तर तुला काय वाटतं आणि तुझे काय विचार आहेत हे कुणीही विचारणार नाही. ओळख पटण्यासाठी तुझे नाव पुरेसे आहे—तू तर म्हणायचास की ओळखीसाठी फक्त नाव पुरेसं नसतं म्हणून.''

''ती वेगळी गोष्ट होती. वेगळ्या संदर्भात मी बोललो होतो. प्रकरणांची अशी सरमिसळ करू नकोस. तू चलाखी करतो आहेस हे मला कळतंय.''

होय, मी चलाखी करीत होतो. जाणूनबुजून अडाणी बनण्याची चलाखी. सत्याला घाबरून पळून जाण्याची चलाखी. हसीनशी असहमत होण्याची आणि त्याला घायाळ करण्याची चलाखी. मला हसीनशी मुळीच सहमत व्हायचे नव्हते. कारण त्याचे म्हणणे कबूल करावयाचे म्हणजे आपण ज्या टेकडीवर उभे आहोत तीच नष्ट करण्यासारखे झाले असते.

मध्यंतरी अशी एक गोष्ट घडली की तिच्याविषयी मी कधीच काही विचार केला नव्हता. हसीन एकाएकी मला भेटेनासा झाला. सकाळी त्याचे कॉलेज असायचे, दुपारी माझे ऑफिस असायचे. आमची भेट व्हायची एकच वेळ असायची. ती म्हणजे

संध्याकाळची. पण अलीकडे तो अनेक संध्याकाळी गुप्त होऊन जायचा. हसीनचे घर काही मला अनोळखी नव्हते. जमीलही काही मला नवखा नव्हता. तो हसीनचा धाकटा भाऊ आहे आणि त्याच्याच कॉलेजात शिकतो आहे हे मला ठाऊक होते. जेव्हा जेव्हा मी हसीनकडे गप्पा मारायला, चहापाण्याला किंवा जेवायला जायचो, तेव्हा तेव्हा जमील बहुतेक असायचाच. त्यांचे वडील—भाईजानही—असायचे. या बाबतीत ते एक औरच घर होते. कुणीही मित्र किंवा पाहुणा आलेला असो, सगळं घर त्याला भेटायचं आणि सगळेजण गप्पागोष्टीत सामील व्हायचे. आमच्यामध्ये भाईजान बसले म्हणजे मला कधीकधी खटकायचे; कारण त्यामुळे आमचे स्वातंत्र्य हिरावल्यासारखे व्हायचे; पण जमील असला तर मला बरं वाटायचे. खरे तर मला जमील सुरवातीपासूनच आवडला होता.

जमीलची आणि माझी आधी भेट झाली नाही किंवा हसीनच्या माध्यमातूनच आम्ही भेटलो. हा केवळ योगायोग नव्हता. मी सरळच त्याचा मित्र झालो असतो असे आता विचार करायला लागलो म्हणजे वाटते. हसीनचा ठावठिकाणा विचारायला मी अनेक वेळा त्याच्या घरी गेलो होतो तेव्हा जमील मला एकटाच भेटला होता. त्या वेळीही मला असेच वाटले होते. हळूहळू मी हसीनपासून तुटत गेलो.

''अलीकडे हसीनभाईला संध्याकाळी भेटणे अवघडच झाले आहे.'' मला दोन-तीन वेळा येऊन निराश झालेले पाहिल्यावर जमील म्हणाला होता, ''वास्तविक ते आणि सईद महमूद त्याच भानगडीत आहेत.''

''कसली भानगड ?''

''तुम्हाला माहीत नाही म्हणजे आश्चर्य आहे. दोघंही बाहेर जाण्याच्या खटपटीत आहेत हे तुम्हाला माहीत नाही ?''

''बाहेर म्हणजे ?''

''बाहेर म्हणजे कुठेही. मिडलईस्ट, लीबिया, आफ्रिका—जिथे कुठे जॉब मिळेल, चांगले पैसे मिळतील अशा ठिकाणी कुठेही. सईद महमूदचा तर नाइलाज आहे. या कॉलेजच्या मास्तरकीत तसा तो कंगालच राहिलेला आहे. शिरावर चारचार मुलींचं ओझं—मुलाला पोलिओ झालेला... हसीनभाईंचं काय आहे की त्यांना चांगलं जीवन जगायचं आहे...''

सईद महमूद त्या वेळी भोपाळमध्येच होता आणि त्याच कॉलेजात इंग्रजी शिकवत होता. तो आम्हा तिघांचाही मित्र होता; पण कुणालाच सापडायचा नाही. कारण नेहमी तो घाईगडबडीतच असायचा. कुठेही दोन क्षणांपेक्षा जास्त वेळ थांबू न देणारी अस्वस्थपणाची घाई. तो आला तर बसायचाही नाही. बसला तर उठायच्या तयारीतच असायचा आणि खरे तर तो आला म्हणजे कोणत्याही क्षणी हा उठून निघून जाईल अशी धास्ती वाटायची. हसीनची आणि त्याची मैत्री समव्यावसायिक असल्यामुळे होती.

पण स्वभावाच्या दृष्टीने विचार केला तर तो माझा समानशील होता. तरी पण मला आश्चर्य नाही वाटले. कारण दोघेही एकाच हेतूने एकत्र आलेले होते, कारणे वेगवेगळी असेनात का.

''काय, झालं का पळून जाणं ?'' बऱ्याच दिवसांनी हसीन तावडीत सापडला तेव्हा मी त्याला पकडले.

हसीनने माझ्याकडे त्याच्या नेहमीच्या ढंगाने पाहिले. लहान लहान डोळे गोल होत तीक्ष्ण बनायचे आणि आक्रमक वाटू लागायचे.

''कोण चाललंय पळून ?''

''तू, आणखी कोण ?''

''मी पळून नाही चाललो. मी जातोय.''

''एकूण एकच.''

''एकूण एकच नाही,'' तो जोर देत म्हणाला, ''पळून गेलेले पाकिस्तानात आहेत आणि ते कधीही परत येणार नाहीत.''

''तू तरी कुठला परत यायला ?''

''का ? मी काय त्या काळ्या लोकांच्या आणि हबशी लोकांच्या देशात मरायला चाललोय ?''

''कुणास ठाऊक.''

''तुझ्यासारखे मित्र असलीच प्रार्थना करतील. करा...''

''मैदान तर सोडून चालला आहेस.''

''दोनचार वर्षांसाठी बाहेर पडणे म्हणजे काय मैदान सोडून जाणे का, पळून जाणे ?'' तो खवळून म्हणाला— ''मी माझ्या आणि माझ्या मुलांच्या भवितव्याबद्दल काही विचार करू नये का ? इथेच सडत राहू का ? माझ्या आजूबाजूला लुच्चे, लफंगे, व्यभिचारी आणि बदमाश कशी मजा मारताहेत बघत राहू ? रोज जळफळत बसू ?... रोज रक्त आटवू ?''

''मुलं आणि भवितव्य मलाही आहे,'' मी म्हणालो.

''तुला चिखलातच राहायचं असेल तर कोण काय करणार ?'' तो म्हणाला— ''तुला वर येताही येत नाही आणि यायची इच्छा पण नाही.''

''पैशाच्या पाठीमागे धावणे म्हणजे का वर येणे ?''

''ही आजारी, बेकार आणि भित्र्या माणसांची फिलॉसफी आहे,'' तो ओरडून म्हणाला— ''ती राहू दे तुझी तुझ्याजवळच.''

आणि तो त्वरेने निघून गेला.

नायजेरियाला जाण्यापूर्वीचे हसीनचे आणि माझे हे अखेरचे बोलणे होते. निदान या बाबतीतले. त्यानंतरही आम्ही भेटलो पण अगदी वरवर आणि त्या बोलण्याला तसा

काही अर्थ नव्हता. एरव्हीही आम्ही दोघे एकमेकापासून तसे तुटलोच होतो. मग एके दिवशी कळले की तो गेला आहे. मला न भेटता आणि कुठेतरी मला खोलवर दुखवून. सईद महमूदही गेला होताच पण त्याचे जाणे म्हणजे आशेने मारलेली एक उडी होती. बायकोचे उरलेसुरले दागिने आणि वडिलोपार्जित जमीन विकून तो सौदी अरेबियाला गेला होता; तर हसीनची नायजेरियाच्या एका शाळेत व्यवस्थित नेमणूक झालेली होती आणि त्याच्यासाठी विमानाचे तिकिटही आले होते...

''आणखी काही आणू ?'' कनीज मला म्हणत होती, माझ्यासमोर उभी आणि थाळीकडे वळलेली. मी दचकल्यासारखा झालो.

''आणखी काय ?''

''कबाब, नाहीतर एखादी रोटी.''

''पुरे, पुरे.'' मी म्हणालो, ''आधीच जास्त झाले आहे. नियमाप्रमाणे तर मला खायलाच नको होते. दुपारचे जेवण मी. बहुधा टाळतोच. विशेषत: बाहेर असलो म्हणजे डॉक्टर म्हणतात की हा नियमच करा...''

''आणि तू ऐकलेस ?'' जमील हसून चिडवत म्हणाला आणि मी हसू लागलो. दिल्लीतली गेली तीनचार वर्षे मी डॉक्टरांच्यासाठी किती टाचा घासल्या आहेत ते जमीलला ठाऊक आहे. दिल्लीत अजून बस्तानही बसलं नव्हतं आणि समजलं की मी एका भयंकर रोगाच्या तावडीत सापडलो आहे. काय करणार ? तिरस्कार किंवा त्यांच्याविरुद्ध घमेंडीचे बोलणे काही माझ्या कामाला येणार नव्हते. अखेर मी हॉस्पिटलमध्ये पोहोचलो आणि फाइल होऊन गेलो— केस नं. सी-535. नरकातले दिवस होते ते.

थाळी उचलली पण कनीज तेथून गेली नाही, उभी राहिली आणि दोन एक क्षण माझ्याकडे रोखून पाहत म्हणाली, ''गेल्या काही दिवसात तुमच्या हार्टबिर्टला खरंच काही झालं होतं ?...''

मी चमकून पाहिले. ''होय, घाव लागला होता.'' कनीजला माहीतही नाही ? या घरात माझ्यासाठी जवळपास मरणासन्नतेचं वातावरण तयार झालेलं असेल आणि मी येईन तेव्हा हरवलेले माणूस अचानक सापडावे तसे माझे स्वागत होईल असे मला वाटले होते.

''याची फार वाईट अवस्था झालेली होती,'' जमील कनीजला सांगू लागला— ''मासिव्ह हार्ट अटॅक होता. जवळजवळ पन्नास तास जीवन आणि मरण यांच्यामधे लोंबकळत होता. दिल्लीसारखं शहर होतं, म्हणून पेसमेकर लावून वाचवता आले. नाहीतर काय झाले असते देव जाणे.''

कनीजचा चेहरा क्षणभर पांढरा पडला. भीतीने. तिचे मेव्हणे असेच गेले होते.

बहीण पण अशीच गेली होती. सासरेही असेच गेले होते आणि आता दीर पण— दीर म्हणजे हसीनभाई. जायच्याआधी स्वत:ला सावरीत ती म्हणाली— ''आणि सिगारेट प्यायचं मात्र सोडू नका, बरं.''

थोड्या वेळाने माझ्या समोरच्या तिपाईवर चहाचा ट्रे आला. स्टूल पुढे ओढून घेत कनीज माझ्या समोर बसली आणि चहा तयार करू लागली. आतल्या खोलीत बाजी होत्या पण त्या तेथे आहेत हे येथे बसून कळण्यासारखे नव्हते. आधी तर त्या नमाज पढत होत्या; पण एवढा वेळ झाला तरी बाहेर आलेल्या नव्हत्या आणि आपणच उठून त्यांना भेटावे एवढे धैर्य माझ्यातही नव्हते. मी पुन्हा कनीजची पेंटिंग्ज अडकवलेल्या भिंतींकडे पाहू लागलो. गेल्या कित्येक वर्षांपासून ती त्याच ठिकाणी तशीच लटकवलेली होती. पण जणू काही प्रथमच ध्यानात आले की ती तुग्रांच्या (धार्मिक वचनांच्या फ्रेम्स) जवळपासच आहेत. एका फ्रेमवर होते अल्लाह. दुसरीवर होते मुहम्मद. घरात उघडणाऱ्या त्या दाराच्या वर कुराणातली आयत होती— 'इनल्लाहे मुअस्साबेरीन' म्हणजे धैर्य धारण करणाऱ्यांच्या पाठीशी परमेश्वर उभा असतो.

मी धैर्य धारण केले होते ? चहाचा शेवटचा घोट घेत मी विचार केला— हॉस्पिटलमध्ये मला पहायला किंवा भेटायला जे मित्र आले नव्हते, त्यांना मी क्षमा का केली नाही आणि जे माझ्या पलंगाजवळ येऊन उभे राहिले होते, त्या शत्रूंच्या बाबतीत मी मऊ का झालो ?

''या अल्लाह !'' आतून बाजींचा करुण आवाज आला... ''रजा बे रब्बी...''

कनीजने जरा जास्तच आवाज करीत भांडी उचलली आणि ती ट्रेमध्ये ठेवू लागली. एका मागोमाग एक. मग उठून आत निघून गेली.

''बाजींना कसे काय आवरले ?'' काही क्षणांच्या शांततेनंतर मी विचारले.

''सगळेजण आवरतात स्वत:ला !'' तो म्हणाला, ''हसीनभाईची बातमी नायजेरियाहून आली, त्या वेळी बाजी खूप आजारी होत्या. वाचणार नाहीत असे वाटत होते. काय करावे ते माझे मलाच समजत नव्हते. डॉक्टरांना विचारले तर म्हणाले अशा अवस्थेत धक्का सहन होईल की नाही सांगता येत नाही; पण त्यांना न सांगणेही बरे नाही. अखेर किती काळ दडवून ठेवणार ? त्यांना सांगू नये म्हणून मी दोन दिवस झगडत राहिलो. आम्हा सर्वांमध्ये हसीनभाई त्यांना जास्त आवडायचा हे तर तुला माहीतच आहे. त्यांना कधीच कळू द्यायचं नाही यात अशक्य असे काय आहे असे माझे म्हणणे होते. खोटी पत्रे मागवता आली असती किंवा असेच काहीतरी केले असते. जास्तीत जास्त काय झाले असते. पोरानं पाठ फिरवली, नायलायक निघाला— एवढाच आघात झाला असता... पण शेवटी मला पराभूत व्हावे लागले. मग त्यांना सांगण्यात आले आणि आता जे काही आहे ते तुझ्यापुढे आहेतच...''

मी विचारले खरे पण विचारताक्षणीच आपला प्रश्न किती विसंगत आहे हे माझ्या

ध्यानात आले. हाच प्रश्न प्रत्येक भेटणारा मला पण विचारीत असे आणि त्या वेळी मी कावून जात असे. मी म्हणू लागलो, ''मला असं म्हणायचं आहे की याच्या आधी काही...''

''नाही, अजून काही नाही. एकदोन दिवस आधी आपली तब्येत ठीक नाही म्हणून तक्रार करीत होते हे खरे. त्या दिवशी ते रोजच्यासारखेच कामाला गेले होते. संध्याकाळी डॉक्टरकडे जाऊ असे भाभीला सांगून ठेवले होते. संध्याकाळी ते निघाले पण होते; पण त्याच वेळी त्यांचा एक पाकिस्तानी मित्र आला होता— एक व्हिडिओ कॅसेट आणि टीव्ही पाहण्यासाठी. हिंदी चित्रपटांच्या कॅसेट्स् आणि हिंदुस्थानी संगीताच्या एल्.पी.रेकॉर्डसचा त्यांनी तिकडे केवढा प्रचंड खजिना जमवला होता याची तुला कल्पना नाही.''

'होय, मला ठाऊक नव्हते. सात वर्षांपूर्वी हसीन येथे होता तेव्हा हिंदी चित्रपटांचा तिरस्कार करीत असे आणि हिंदुस्थानी संगीताचीही त्याला काही आवड नव्हती.

''आपल्या पाकिस्तानी मित्राला ड्रॉइंगरूममध्ये बसवून कॅसेट आणण्यासाठी ते आत गेले आणि कॅसेट पाहता पाहताच त्यांना अस्वस्थ वाटू लागले आणि तिथेच आडवे झाले. बास. फार तर दोन मिनिटे लागली असतील. त्यांचे कफन-दफन तिकडेच झाले असेल असे मला वाटले होते. आम्ही रडूनबिडून मोकळे झाले होतो. दहा-बारा दिवसांनी भाभीला आणि मुलांना उतरवून घेण्यासाठी मी मुंबईला गेलो तेव्हा भाभी नायजेरियाहून हसीनभाईंचा ताबूत घेऊन आल्या असतील अशी मला कल्पनादेखील नव्हती. पुन्हा सगळ्यांच्या जखमांवरची खपली निघाली. पुन्हा एकदा नव्याने अंत्यसंस्कार झाले...''

''आणि नशीब तरी किती कठोर बघ...'' थोडा वेळ थांबून जमील सांगू लागला... ''त्यांनी परत यायचं ठरवलं आणि नेमकं त्याच वेळी हे घडून आलं. सहा महिन्यापूर्वी नुकतेच ते येथे आले होते तेव्हा म्हणत होते— ''आता काय फार थोडे दिवस राहिले आहेत, हे कॉंट्रॅक्ट संपले की हिंदुस्थानात परत येणार ! म्हणाले— ''आता तिकडे आणखी नाही राहवत. काहीही म्हण, आपला देश तो आपला देश...'' त्यांनी इथल्या शामला हिल्स भागात आपल्या पसंतीचे एक घरही तयार करवून घेतले होते. परत आल्यावर काय करायचे तेही त्यांनी ठरवले होते आणि खूप आनंदात होते. ज्या घराची एक-एक वीट त्यांनी इतक्या प्रेमाने रचली होती, त्या घरात आपण कधीही राहू शकणार नाही असा विचार त्यांच्या मनाला शिवलादेखील नसेल. मागच्या वेळी एक फार विचित्र गोष्ट घडली. मी त्यांना पोहोचवायला एअरपोर्टवर गेलो होतो, तेव्हा आयुष्यात प्रथमच काळजात एक कळ उठली. एकदमच वाटलं की त्यांना खूप घट्ट मिठी मारावी, अगदी कडकडून भेटावं, पण मग वाटलं की हा निव्वळ भावुकपणा होईल. हसीनभाई काही कायमचे निघून चाललेले नाहीत. स्वत:ला काबूत ठेवून मी ती संधी कायमचीच घालवून बसलो. आणि आता हे दु:ख एक मोठी सल होऊन बसलं आहे

आणि सतत माझा जीव घेत आहे. कसल्या तरी दबावामुळे, कसल्या तरी बौद्धिक प्रभावामुळे किंवा एखाद्या अजाण हट्टापायी आपण, तो माणूस जिच्यात दडलेला असतो ती संधी वाया घालवतो याचा तू कधी विचार केला आहेस ? आपण या गोष्टी पुन्हा केव्हातरी करू म्हणून पुढे ढकलतो— पण त्या पुन्हा आपल्या आयुष्यात कधीही येणार नाहीत हे आपल्याला माहीत नसते.''

कनीजने पानाचे तबक माझ्याकडे सरकवले. पानदान घेऊन येऊन ती तेथे कधी बसली हे मला कळलंही नव्हतं. मी मुकाट्याने पान घेतले.

जमीलने मला कुठेतरी खोलवर स्पर्श केला आहे हे मला कळत होते. पण तो नुसताच स्पर्श होता का ? आपल्या मिठीत घेऊन पिळून काढणं नव्हतं का ? मी समोरच्या भिंतीकडे पाहू लागलो. त्यावरच्या फ्रेममध्ये लिहिलेले होते—अल्लाह, अल्लाह, अल्लाह...

मग फोटो आले हसीनचे. हसीनभाई आपल्या ड्रॉइंगरूममध्ये बसून टीव्ही पाहत आहेत. हसीनभाई बागेत आपल्या तिन्ही लहान मुलांसमवेत. हसीनभाई आपल्या गाडीत स्टियरिंगपुढे आणि भाभी कारचे दार हातात धरून उभ्या. मी एक अलीकडचा फोटो उचलला— बहुधा इकडचाच असावा. त्या फोटोत फक्त हसीन होता, फक्त त्याचा हसरा चेहरा. फोटोत तो खूप लवकर म्हातारा होतो आहे असे वाटत होते आणि त्याच्या चेहऱ्यावर समृद्धीचे कसलेही चिह्न दिसत नव्हते ही आश्चर्याची गोष्ट होती. उलट तो एखाद्या झाडासारखा वाळत चाललेला दिसत होता. पहिल्यापेक्षा टक्कल जास्त वाढलेले होते आणि त्याची दाढीही बरीच वाढलेली होती.

''हा तर इकडचाच दिसतो ?'' मी म्हणालो.

''हो. याच ठिकाणी ते पडलेले होते त्या वेळी मी हा फोटो काढला होता. नुकतेच मागच्या वेळी आले होते तेव्हा.''

''यात दाढी वाढलेली का दिसते आहे ?''

''अलीकडे त्यांनी दाढी ठेवलेली होती. तू त्यांना कधी भेटला होतास ?''

''तीनचार वर्षांपूर्वी. इथेच. त्या वेळी मी दिल्लीहून आलो तेव्हा योगायोगाने तो इथेच होता. मध्यंतरी एकदोन वेळा तो त्याच्या व्हिसा वगैरेच्या कामासाठी दिल्लीला आला होता. मला निरोपही पाठवला होता आणि माझ्या घरीही आला होता; पण मी कुठे अडकलो होतो कुणास ठाऊक, वेळेवर येऊ शकलो नाही आणि तो न भेटताच निघून गेला.''

मी जमीलशी अगदी खोटे बोलत होतो. खरी गोष्ट अशी होती की मला हसीनला भेटायचेच नव्हते आणि मी त्याला जाणूनबुजून टाळले होते. आणि आता त्याचा फोटो हातात धरून त्याच्याकडे कितीतरी वेळ पाहत बसलो होतो आणि अस्वस्थ करणारी कसली तरी अज्ञात वेदना होऊ लागली होती.

''मला झटका आला तेव्हा डॉक्टरांनी काय विचारले माहीत आहे ?''

जमील माझ्याकडे पाहू लागला. कनीज उठून गेलेली होती आणि आम्ही दोघेच होतो.

''म्हणाले, ज्या दिवशी तुम्हाला हा त्रास झाला त्या दिवशी किंवा एकदोन दिवस आधी काय काय घडले होते ? कसला तरी ताण, एखादा धक्का, किंवा एखादी वेडीवाकडी बातमी, जिच्यामुळे तुम्ही डिस्टर्ब झाला असे काहीतरी.''

मी म्हणालो, ''नाही, असे काहीही झालेले नाही. आता मेरठमधे दंगा चाललेला होता; पण तिथे माझे जवळचे कोणीच नव्हते. जुन्या दिल्लीतले वातावरण तंग झालेले होते आणि कर्फ्यू लावलेला होता हेही खरे, पण मी तर नव्या दिल्लीत राहत होतो. मग मी आणखी विचार केला आणि हसीनभाईचे नाव घेतले. म्हणालो की तो माझा मित्र होता खरा, पण अलीकडच्या काळात आम्ही एकमेकांपासून खूप लांब गेलो होतो. ही गोष्ट कितपत खरी आहे कुणास ठाऊक असं आता वाटतंय. खरी गोष्ट अशी आहे की काहीही असले तरी हसीन एक निर्मळ मनाचा प्रामाणिक आणि सज्जन माणूस होता आणि माझे त्याच्यावर खूप प्रेम होते, खूप...''

आणि असे म्हणता म्हणता माझा गळा भरून आला आहे, डोळे भरून आले आहेत आणि मी खरोखरच रडू लागलो आहे असे दिसते. होय, खरोखरच !

# रजा

**कामतानाथ**

सामान दारापाशी ठेवून रिक्षावाला निघून गेला. त्याने होल्डॉल तिथेच बाहेर ओटीवर राहू दिले आणि पेटी घेऊन तो जिना चढू लागला. आई बाहेरच गच्चीवर रिकाम्या बाजेवर बसलेली होती. तिने त्याच्याकडे पाहिले. ओळखले की नाही ते त्याला कळले नाही. आईला आता कमी दिसतंय एवढे त्याला ठाऊक होते. त्याने पेटी तिथेच जमिनीवर ठेवली आणि वाकून आईच्या पायाला स्पर्श केला.

''आलास,'' आई म्हणाली.

''हो,'' तो म्हणाला. क्षणभर थांबला. मग होल्डॉल आणण्यासाठी खाली गेला.

होल्डॉल आणून त्याने ते पण तिथेच गच्चीवर टाकले आणि बाजेवर बसून धापा टाकू लागला. होल्डॉल बराच जड होता. तो उचलून जिना चढताना त्याला थकल्या-सारखे झाले होते.

सतीश—त्याचा धाकटा भाऊ—आतल्या खोलीतून बाहेर आला आणि त्याने वाकून नमस्कार केला. तो काहीच बोलला नाही. फक्त पाय मागे घेत आपली नाराजी असल्यासारखे दाखवले, हे असले काही आपल्याला आवडत नसल्यासारखे. सतीश पण काहीच बोलला नाही. छातीवर हात बांधून तिथेच मुकाट्याने उभा राहिला.

आईच्या चेहऱ्यावर विचित्र असे गांभीर्य पसरलेले त्याला दिसले. घर सोडून त्याला तीन महिने झाले होते. पण या तीन महिन्यात काय झाले होते कोण जाणे, त्याला आपले घर परक्यासारखे वाटू लागले होते. त्याने चारही बाजूंनी नजर फिरवली. पाइपा-जवळच्या भिंतीवर शेवाळे धरले होते. अंगणातली जाळी कोपऱ्यात तुटली होती आणि तिच्या कामट्या सुसरीच्या तोंडासारख्या वर आलेल्या दिसत होत्या. गच्चीच्या भिंतीच्या विटा अजूनही फुटलेल्याच होत्या. खोलीच्या खिडकीचे दार अर्धवट मोडलेले होते. पाइपाच्या वरच्या माळ्यावर ढलप्या भरून ठेवलेल्या होत्या. आणि हो, जिन्यासमोरच्या देवडीच्या एका कोपऱ्यात लाकडाच्या भुस्स्याचा ढीग होता, तो पूर्वी नव्हता. विशेष काही बदललेले नव्हते, तरी आपलं घर आपल्याला परकं का वाटतंय या विचारात तो पडला. कदाचित बरेच दिवस एखादी गोष्ट पाहिली नाही म्हणजे असे होत असावे.

"खाली भाडेकरू आहेत का ?" त्याने आईला विचारले.

"सध्या गावाकडे गेले आहेत."

"कोण आहेत ?"

"कोणीतरी गुप्ता म्हणून आहेत."

"कुठं काम करतात ?"

"पी.डब्ल्यू.डी.मध्ये," धाकट्या भावाने उत्तर दिले.

तो गप्प बसला.

सतीश थोडा वेळ तिथेच उभा राहिला. मग आत खोलीत निघून गेला. एका क्षणानंतर त्याची बायको डोक्यावरचा पदर पुढे ओढीत खोलीतून बाहेर आली आणि एखाद्याने आगीच्या ज्वाळेपासून लांब राहावे तशी स्वत:ला वाचवत असल्यासारखी समोर स्वयंपाकघरात जाऊन शेगडी पेटवू लागली.

त्याने बूट काढले आणि बाजेच्या खाली ढकलीत भिंतीचा आधार घेतला.

"संतू पकडला गेला," आई म्हणाली.

"काय झालं ?" त्याने विचारले. संतू त्याच्या सर्वात धाकट्या भावाचे नाव होते.

"कुठून तरी अफू आणली होती," त्याच्याकडे सरकत अत्यंत हळू आवाजात आई म्हणाली. "तीच घरात जप्त करण्यात आली. पोलिस आले होते. घरातून पकडून घेऊन गेले."

"कुठे ठेवली होती ?" त्याने विचारले. संतूच्या सवयी त्याला ठाऊक होत्या.

"खाली जिन्याच्या माळ्यात."

"कधी घडलं हे ?"

"काल रात्री, दोन वाजता."

"दोन वाजता !"

"हो. तो शेठजीच्या पोरगा आहे ना, मुन्नन ! तो कुठल्या तरी सायकलचोरीच्या भानगडीत पकडला गेला होता. त्याला घेऊनच पोलिस आले होते."

"सतीश घरी नव्हता ?"

"होता." आई हळू आवाजात म्हणाली, "त्याचा स्वभाव तर तुला ठाऊकच आहे. घराबाहेर पडला नाही."

"सतीश !" त्याने धाकट्या भावाला हाक मारली.

सतीशने हाकेला ओ दिली नाही. मुकाट्याने बाहेर आला.

"काय झालं होतं ?" त्याने विचारले.

सतीश क्षणभर गप्प राहिला. आईकडे रोखून पाहिले. मग म्हणाला, "काय होणार होतं ! अफू घरात आणून ठेवलेली होती. ती जप्त झाली."

''कुठे ठेवली होती ते पोलिसांना कसे समजले ? घराची झडती घेतली होती का ?''

''मुन्नन्ला ठाऊक होते. तोच पोलिसांना घेऊन आला होता.''

''पण मुन्नन तर संतूचा मित्र आहे. तो कशाला पोलिसांना घेऊन येईल ?''

सतीश क्षणभर गप्प बसला. मग म्हणाला, ''सायकल चोरताना कुठंतरी सापडला होता. पोलिसांनी बडवलं असेल. आणखी काय करतो म्हणून विचारल्यावर सांगून टाकलं असेल.''

''काय घडलं ते तुला नीट ठाऊक आहे ?''

''जे सांगतोय तेच घडलं होतं. आजपासून थोडाच हा धंदा चाललाय !''

''अफू किती होती ?''

''असेल अर्धा शेर.''

''मग संतू कुठे आहे ?''

''तुरुंगात.''

''पोलिस सरळ तुरुंगात कसे नेऊन टाकतील ? आधी मॅजिस्ट्रेटपुढे उभं करावं लागेल.''

''केलं होतं.''

''तू गेला होतास ?''

''होय.''

''मग तू जामीन नाही दिलास ?''

''मी जाईपर्यंत जेलचा रिमांड देण्यात आला होता.''

''तू किती वाजता गेला होतास ?

''दोन वाजता.''

''दिवसा ?''

''होय.''

''रात्री त्याला पकडून नेलं तेव्हा तू गेला नाहीस ?''

''नाही गेलो.''

''मग जामिनासाठी आज काही प्रयत्न केला नाही ?''

''आज कोर्ट बंद आहे.''

''सुट्टीतही एक मॅजिस्ट्रेट नेमलेला असतो.''

''मला ठाऊक नाही.''

तो गप्प बसला. सतीशने वळून स्वयंपाकघराकडे पाहिले. त्याची बायको चहाचा कप घेऊन स्वयंपाकघराच्या दारात उभी होती. तिच्याकडून कप घेऊन तो त्याला देऊ लागला. त्याने कप घेतला. म्हणाला, ''आईला पण दे ना.''

''देतो आहे,'' सतीश म्हणाला आणि दुसरा कप आणून त्याने तो आईला दिला. तो चहा पिऊ लागला.

होळीच्या सुट्टीत तो घरी आला होता. याच्याआधी तो इथेच होता. पण चार महिन्यांपूर्वी तो एकटाच गेला होता. मग एक महिन्यानंतर घर मिळालं तेव्हा बायकोला आणि मुलांनाही घेऊन गेला. त्या दिवशी आई खूप रडली होती.

''या घराचं हे काय व्हायला लागलंय ?'' ती म्हणाली होती, ''आजवर तू होतास तर संतू तुला थोडंतरी मानत होता. आता तर त्याला पूर्ण मोकळीक मिळेल. तुला तर ठाऊकच आहे की सतीशला कुणाशी काही देणंघेणं नसतं. पिंकी आणि नीता यांच्यामुळे माझं मन रमायचं. आता सगळा दिवस रडत बसण्यात घालवावा लागेल. कम्मनमुळेच मी इथे अडकून पडले आहे, नाहीतर मी पण तुझ्याबरोबर आले असते.'' आणि गीता व पिंकी या दोघांना छातीशी धरत ती रडू लागली होती.

कम्मन तिचा भाचा होता. आठ वर्षांचा. कॉलऱ्यात बहीण मरण पावली होती. त्यावेळी कम्मन सहा महिन्यांचादेखील नव्हता. आईनेच त्याचे पालनपोषण केले. त्याला मोठा केला. तो सुरवातीपासूनच इथे राहत होता आणि आजीला 'आई' म्हणत होता. चौथीत शिकत होता.

''कम्मन कुठे आहे ?'' त्याने विचारले.

''गेला असेल खेळायला कुठेतरी,'' आईने उत्तर दिले.

तेवढ्यात कम्मन आला. ''नमस्ते, मोठे मामा !'' तो म्हणाला आणि इकडेतिकडे पाहू लागला.

होळीला तो एकटाच घरी आला होता. बायको-मुलांना घेऊन माहेरी गेली होती. आता सतीश राहतोय त्या खोलीत आधी तो राहत होता. तेव्हा सतीश खाली राहायचा. तो गेल्यानंतर खालची जागा भाड्याने दिली होती. आई आणि कम्मन स्वयंपाकघराच्या शेजारच्या खोलीत राहतात. त्या खोलीला पूजेची खोली असे म्हणायचे. कारण त्या खोलीत लाकडाचा एक देव्हारा होता आणि त्यात देवांच्या मूर्ती ठेवलेल्या होत्या. आई रोज सकाळी उठून त्यांची पूजा करायची.

आपण रिक्त हस्ताने घरी आलो आहोत हे त्याच्या ध्यानात आले. निदान कम्मनसाठी काही तरी आणायला हवे होते.

''अभ्यास वगैरे ठीक चाललाय ना ?'' त्याने कम्मनला विचारले.

''हो.'' कम्मन म्हणाला,

''मला सिगरेट आणून देतोस ?''

''हो. देतो ना.''

खिशातून एक रुपयाची नोट काढून त्याने ती त्याला दिली.

''चारमिनारचं एक पाकीट घेऊन ये. आणि उरलेल्या पैशातून तुझ्यासाठी घेऊन ये काहीतरी.''

''काय घेऊ ?''

''घे काहीतरी. जिलबी घे.''

त्याला जिलब्या खूप आवडायच्या. इथे राहत होता तेव्हा बहुतेक रोज सकाळी दही-जिलबीची न्याहरी करायचा.

कम्मन निघून गेला. सामान त्याने आईच्या खोलीत आणले आणि पंचा काढून कपडे बदलू लागला. त्याच्या पाठोपाठ आई पण आत आली.

''देव्हारा काय झाला ?'' खोलीत देव्हारा दिसला नाही म्हणून त्याने विचारले.

''शुक्लीणबाईच्या घरी पाठवून दिला,'' आई म्हणाली.

''माझी तब्येत नसते धड. एकदोनदा सकाळीच उठून आंघोळ केली तर पडसे झाले. सतीशच्या बायकोला म्हणाले की 'तू आरती तरी करीत जा' पण ती म्हणाली की 'नाही जमणार.' ''

तो गप्प बसला.

''दरवाजाची खोली पण भाड्याने दिलेली आहे का ?''

''नाही. ती आपल्याच ताब्यात आहे. संतू राहतो त्या खोलीत.''

कपडे बदलून तो बाजेवर पडला. समोरच्या भिंतीवर वडिलांचा फोटो लावलेला होता. सहासात वर्षांपूर्वी त्यांचे निधन झाले होते. त्या वेळी त्याला नुकतीच नोकरी मिळाली होती. त्या वेळी सतीशचे ड्राफ्टस्‌मनचे ट्रेनिंग चालू होते. संतू नववीत होता. ते दिवस फार कठीण होते. वडिलांना रिटायर होऊन चारपाच वर्षे झालेली होती. फंडाचा सगळा पैसा बहिणीच्या लग्नात खर्च होऊन गेला होता. तो कसाबसा एम्.ए. झाला होता. वडिलांनी कुठल्यातरी प्रायव्हेट फर्ममध्ये नोकरी धरली होती. तो स्वतः शिकता शिकता शिकवण्या करीत होता. एकाच वेळी तीनचार शिकवण्या करायचा तरीही घरचा खर्च भागत नव्हता.

आईने अंथरुण घातले होते. तो पडला आणि पडल्या पडल्या वाटेत विकत घेतलेले एक मासिक वाचू लागला. प्रवासाचा शीण जाणवू लागला होता. मित्रांना भेटून यावे असे एकदा मनात आले. त्याने घड्याळात पाहिले. साडेसात वाजले होते. त्याने टाळले. सकाळी पाहू असा विचार केला.

''द्वारिका वारले,'' आई म्हणाली.

''कधी ?'' त्याने विचारले. द्वारिकाबाबू या गल्लीतले सगळ्यात जुने रहिवासी होते. त्याच्या वडिलांच्या घनिष्ठ मित्रांपैकी एक होते. तो त्यांना काका म्हणत असे.

''एक महिना झाला असेल,'' आई उत्तरली.

''आजारी होते ?''

''दोन-चार दिवस ताप आला असेल.''

त्याच्या वडिलांचे निधन झाल्यानंतरसुद्धा द्वारिकाबाबू दरवर्षी होळीला त्याच्या घरी यायचे आणि काही ना काही तरी मागून घेऊन खायचे. वडील होते तेव्हा तर दरवर्षी थंडाई बनवली जायची. कधीकधी दारूचीही एखादंदुसरी बाटली फुटायची.

''होळीची तयारी झाली ?'' त्याने विचारले.

आईने काही उत्तर दिले नाही.

''पापड तयार झालेत,'' कम्मन म्हणाला.

''करंज्या वगैरे नाही झाल्या का ?'' त्याने विचारले.

''सतीश म्हणतो त्याच्याकडे पैसे नाहीत म्हणून. खव्याच्या तेलाचा भाव शेराला सहा रुपये झाला आहे.''

तो गप्प बसला.

''कम्मन !'' सतीशने आपल्या खोलीतून हाक मारली.

''मोठ्या मामाला विचार जेवण पाठवून देऊ का म्हणून.''

''घेऊन ये.'' तो म्हणाला.

कम्मन एका ताटात पराठे आणि वांगी-बटाट्याची भाजी घेऊन आला. त्याने ताट बाजेवर ठेवले. बाजेवर बसून जेवायची त्याची जुनी सवय आहे. खाणे, वाचणे, दाढी करणे सगळी कामं तो बाजेवर बसूनच करायचा.

आईने ग्लासात पाणी आणले आणि तिने तो खाली जमिनीवर ठेवला. त्याने जेवायला सुरवात केली.

''पिंकी आता चांगलं स्पष्ट बोलायला लागलाय ना ?'' आईने विचारले.

''अजून कुठे ! तुझ्यापुढे बोलत होता तसंच बोलतोय.''

''त्या सगळ्यांनाही आणायचं होतं. चार महिने झालं त्यांना पाहून.''

तो जेवत राहिला. ''कम्मनची परीक्षा झाली म्हणजे तू पण तिकडेच चल. एक दोन महिने राहून परत ये,'' तो म्हणाला.

''बघू, अजून अडीच महिने आहेत. पराठा घेणार आणखी ? सूनबाई !'' आईने सतीशच्या बायकोला हाक मारली.

''नको, नको, पुरे.'' तो म्हणाला.

जेवण झाल्यावर त्याने हात धुतले आणि अंथरुणावर पडून तो सिगरेट पिऊ लागला. आई उठून बहुतेक जेवायला गेली.

पडल्या पडल्या तो संतूबद्दल विचार करू लागला. त्याच्या आणि संतूच्या वयात आठ वर्षांचे अंतर होते. सतीश त्याच्याहून पाच वर्षांनी लहान होता. संतू झाला त्यानंतर

पुन्हा आईला मूल झाले नाही. संतू सहा महिन्याचा होता तेव्हा आईला टॉयफाइड झाला होता. त्याबरोबर संतूलाही झाला होता. सहा महिने राहिला. तीन वेळा उलटला होता. एकदोनदा तर असे वाटले की आई आता यातून वाचत नाही. डॉक्टर लाहिरींचा उपचार चालू होता. अनेकांनी वडिलांना डॉक्टर बदलण्यासंबंधी सूचना दिल्या पण त्यांनी त्यांचेच उपचार चालू ठेवले. शेवटी त्यांच्याच उपचारांचा लाभ झाला. दोघेही बरे झाले. आई आणि संतू. पण याचा परिणाम म्हणून संतूची तब्बेत कायमची खराब झाली. आधीपासूनच तो अशक्त होता. सातवीत शिकत होता तेव्हा पुन्हा त्याला एक भयंकर प्रकारचा टायफॉइड झाला. तीन महिने राहिला. बरा झाला तेव्हा डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार त्याची शाळा एक वर्ष बंद ठेवण्यात आली.

तीच चूक झाली. वर्षभर तो मन मानेल तसे भटकला. संगत काही चांगली नव्हती. त्याच सुमारास वडीलही रिटायर झाले. म्हातारेही होऊ लागले होते. आणि आर्थिक अडचणी तर होत्याच. ते काहीही ऐकायचे-पहायचे नाहीत. परिणाम असा झाला की संतूने पुन्हा दुसऱ्यांदा शाळेत जायला सुरवात केली तेव्हा शिकण्यात त्याचे मन लागले नाही. तो बहुधा शाळा बुडवायचा. फी घेऊन खर्चून टाकायचा.

सुरवातीला कळले नाही. चारसहा महिन्यांनी समजले. थोडी मारपीट झाली. पण काही फरक पडला नाही.

तेव्हापासूनच तो वाईट मार्गाला लागला. त्या वेळी तो एम्.ए.च्या वर्गात शिकत होता. वडिलांनी त्याला त्याच्याकडे लक्ष द्यायला सांगितले होते. पण त्याने दुर्लक्ष केले. नंतरही त्याने संतूकडे लक्ष दिले नाही. नाहीतर कुठेतरी नोकरीला लावले असते. त्याच्या कितीतरी मित्रांचे वडील चांगल्या जागेवर होते. अजूनही आहेत. त्याने सांगितले असते तर त्यांनी त्याला कुठे ना कुठे लहानमोठ्या नोकरीला लावून दिले असते. पण त्याने या बाबतीत विचारच केला नाही. परिणाम असा झाला की आधी पतंग, गोळ्या, गोट्या झाल्या. मग जुगार, बिडी, सिगारेट वगैरे. आणि आता ही अफू आणि जेल.

आई जेवून आली. पानाचा डबा उघडून तिने पान लावले. त्याला पण एक दिले.

''थकला असलास तर कम्मनकडून पाय दाबून घे,'' आई म्हणाली.

''नको. नको.''

आई थोडा वेळ गप्प बसली. मग म्हणाली, ''संतूचं काय होईल ? वर्षातून एकदा येणारा सण आहे. कसंही करून त्याला सोडवून आण.''

''बघू, उद्या काहीतरी करू.'' तो म्हणाला. आई गप्प बसली. मग स्वत:शीच म्हणाली, ''खूप नालायक निघाला. आजपर्यंत या घराण्यातलं कुणी तुरुंगात गेलेलं नव्हतं. घराची सगळी अब्रू धुळीला मिळवली.''

तो काहीच बोलला नाही.

''किती दिवसांची रजा घेऊन आला आहेस ?'' थोड्या वेळाने आईने विचारले.

''चार दिवसांची !'' तो म्हणाला.

''दिवा बंद करू ?'' आई अंथरुणावर पडली होती.

आईने कूस बदलली. तो मासिक वाचत राहिला. पण फार वेळ जागा राहू शकला नाही. त्याने दिवा बंद केला आणि डोळे मिटून पडला.

सकाळी उठून खुर्शीदच्या घरी जायचं असा विचार झोपायच्या आधी त्याने केला. खुर्शीद त्याचा वर्गमित्र होता. त्याच्या वडिलांनी अनेक वर्षे तुरुंगात नोकरी केलेली होती. खुर्शीद तुरुंगातल्या लोकांना ओळखत होता. त्याच्याबरोबर तुरुंगात जाऊन संतूला भेटावे असा त्याने विचार केला. मग बघू काय होते ते.

सवयीप्रमाणे सकाळी तो उशीराच उठला. पडल्या-पडल्याच त्याने कम्मनला हाक मारली.

कम्मन बाजेशेजारी येऊन उभा राहिला.

''पेपर आला ?'' त्याने विचारले.

कम्मन गेला. बहुतेक सतीशच्या खोलीत. परत येऊन म्हणाला, ''सध्या पेपर येत नाही.''

''बरं.'' तो गप्प बसला.

आई चहा घेऊन आली होती. उठून तो चहा पिऊ लागला.

''संतूला पाहायला जातोस ना ?'' आईने विचारले.

''हो,'' तो म्हणाला.

''मी पण येऊ ?''

''तू बरोबर येऊन काय करणार ?'' तो म्हणाला. क्षणभर गप्प बसला, मग म्हणाला, ''हे बघ, आज जामीन द्यायची काहीतरी व्यवस्था करतो.''

कप जमिनीवर ठेवून तो सिगारेट ओढू लागला.

''थोडे पैसे असतील तर दोनतीन रुपयांचा खवा तरी आणवून घे,'' आई म्हणाली.

''बरं.''

उठून त्याने कोटाच्या खिशातून दहा रुपयांची नोट काढून आईला दिली.

''तूच सांग सतीशला. माझं काही तो ऐकणार नाही.''

त्याने सतीशला हाक मारली. सतीश आला.

''धर, हे पैसे घे. खवा वगैरे काहीतरी घेऊन ये.''

''खवा आणलेला आहे,'' सतीश म्हणाला.

''आणलाय ?''

''हो. मी कालच घेऊन आलो.''

त्याने आईकडे संशयाने पाहिले.

''मला काय ठाऊक ? मला कोणी काही सांगते का ?'' आईने आपला खुलासा केला.

''याच्यात सांगण्या न सांगण्यासारखं काय आहे ?'' सतीश म्हणाला.

आई काहीतरी म्हणाली ते त्याला ऐकू आले नाही.

बाहेर येऊन लॅट्रिनला जाण्यासाठी तो डोणीतले पाणी घेऊ लागला. पैसे तसेच बाजेवर पडले होते.

हातपाय वगैरे धुवून तो खुर्शीदकडे जाण्याची तयारी करू लागला.

''सायकल आहे ?'' त्याने सतीशला विचारले.

''नाही.''

''काय झाली ?''

''संतू कुठेतरी घेऊन गेला होता. परत आला तेव्हा नव्हती.''

''परत आणली नाही ? काय केलं तिचं ?''

''कोण जाणे काय केले ! विकली असेल. नाहीतर कुणाकडे तरी गहाण ठेवली असेल.''

तो गप्प बसला. कपडे घालून पायीच घरातून बाहेर पडला. खुर्शीद जेलच्या एकदोघा अधिकाऱ्यांना ओळखत होता. त्याच्याबरोबरच तो जेलमध्ये गेला. जेलरने संतूला तिथेच आपल्या खोलीत बोलावून घेतले. संतू मुकाट्याने येऊन उभा राहिला. त्याने पाहिले. संतूचे कपडे खूप मळलेले होते. केस रुक्ष झालेले होते. चेहऱ्यावर दाढी वाढलेली होती.

''बस !'' जेलर त्याला म्हणाला, तेव्हा खोलीत पडलेल्या एका लाकडी खोक्यावर तो बसला. तोही त्याच खोक्यावर जाऊन बसला. खुर्शीदने संतूकडे पाहिले. मग सिगारेट पेटवीत जेलरशी बोलू लागला.

''काय झालं होतं ?'' त्याने संतूला विचारले.

''काही नाही.''

''काही नाही ? तुला उगीचंच पकडलंय का ?''

''मला नाही माहीत !''

''घरात अफू सापडली नव्हती ?''

''अफू ! छे: ! कधी सापडली ?''

''मग ? पोलिसांची तुझ्याशी काय दुश्मनी आहे ?''

''मला नाही माहीत.'' तो गप्प बसला.

संतूची ही सवयच आहे. तो असेच बोलत असतो.

तो गप्प बसला आणि पिशवीतूनच सामान काढून त्याला देऊ लागला. पाव, लोणी, दालमोठ वगैरे. सिगारेटची दोन पाकिटे पण. संतूने त्याच्यासमोर कधी ओढली

नव्हती पण त्याला माहीत होतं की संतू सिगारेट ओढतो.

खुर्शीदही उठून त्याच्याकडे आला. ''क्यों भई, कशाला असली कामं करतोस ? स्वत: परेशान अन् घरच्या लोकांनाही परेशान करतोस.''

संतूने त्याच्याकडे पाहिले. बोलला काहीच नाही. पण 'तुम्हाला काय करायचे आहे ?' असा भाव.

''सतीशच्या सायकलीचं काय केलंस ?'' त्याने विचारले.

''मिळेल परत.''

''कुठे आहे ?''

''एका मित्राच्या घरी आहे.''

थोड्या वेळाने तो खुर्शीदबरोबर परत आला. सगळी दुपार वकील आणि कोर्टकचेरी करण्यात गेली. चार वाजण्याच्या सुमारास कसाबसा जामीन मंजूर झाला. खर्च पण बराच झाला. त्याच्याजवळ फारसे पैसे नव्हते. खुर्शीदच्या ओळखीने एका सावकाराकडून त्याने शंभर रुपये व्याजाने घेतले. पंचवीस वकीलाला दिले. चारपाच रुपये दरखास्त वगैरे करण्यासाठी लागले. पाच पेशकाराला दिले. मग त्याने रिलीज ऑर्डर तयार केली. पाच वाजण्यापूर्वी ऑर्डर पोहोचायला हवी, नाहीतर सुटका होणार नाही. खुर्शीद त्याच्याबरोबर होता. त्याच्या ओळखीमुळेच पाच वाजून गेल्यानंतर जेलमध्ये पोहोचल्यावरही सुटका झाली.

खुर्शीद जेलमधूनच परत गेला. तो संतूबरोबर घरी आला. वाटेत तो संतूशी काही बोलला नाही. संतूच्या चेहऱ्याकडे पाहिल्यावर याला काही पश्चात्ताप झाला आहे असे मुळीच वाटत नव्हते.

सात वाजण्याच्या सुमारास तो घरी पोहोचला. जिना चढून वर येताच कम्मन मोठ्याने ओरडला, ''आई, संतूमामा आले.''

आई बहुतेक तिच्या खोलीत असावी. उठून बाहेर आली. कोणीच कुणाशी काही बोलले नाही. आई बाजेवर बसली. तोही तिथेच बसला. संतू दुसऱ्या बाजेवर बसला. सतीश त्याच्या खोलीत असावा. तो बाहेर आला नाही. त्याची बायको स्वयंपाकघरात काहीतरी करीत होती.

आई त्याच्या पाठीवरून हात फिरवू लागली. ''कम्मन, जा, मोठ्या मामाला काहीतरी खायला घेऊन ये. पोरानं सकाळपासून काही खाल्लं-प्यालं नाही,'' आई म्हणाली.

मग संतूला म्हणाली, ''पोरा, घराचा, घराण्याचा काही विचार कर. आज हा नसता तर तुला कुणी सोडवलं असतं ?''

संतू काही बोलला नाही.

''करंज्या आणू ?'' कम्मनने आईला विचारले.

''नको. थोडा चहाच घेऊन ये.'' तो म्हणाला.

''जा, मामीला म्हणावं, चहा कर,'' आई कम्मनला म्हणाली.

मग त्याला विचारले, ''दिवसभरात काही खाल्लं-प्यालंस की नाही काही ?'' तिचा हात अजूनही त्याच्या पाठीवर होता.

''हो,'' तो म्हणाला.

चहा पिऊन तो बाहेर पडला. त्याला वाटले, राजीव डेहराडूनहून बहुतेक आला असेल. राजीव त्याचा बालपणाचा मित्र होता. ऑइल अँड नॅचरल गॅस कमिशनमध्ये सायंटिफिक असिस्टंट होता. सध्या डेहराडूनला पोस्टिंग झालेले होते. दरवर्षी होळीला तो घरी यायचा. त्याच्या घरापासून लांब नाही.

त्याने राजीवला हाक मारली. राजीव बाहेर आला. बाहेर कुठेतरी निघाला असावा. त्याने खोली उघडली.

थोडे औपचारिक बोलणे झाले. अचानकच राजीवने विचारले, ''संतूच्याबद्दल... खरं आहे का ?''

''हो,'' तो म्हणाला.

''जामीन-बिर्मीन मिळाला नाही ?''

''मिळाला.''

मग राजीव गप्प राहिला. त्याने घड्याळाकडे पाहिले.

''कुठे निघाला आहेस का ?'' त्याने विचारले.

''हो, जरा वहिनीबरोबर सिनेमाला जायचा प्रोग्रॅम ठरलाय.''

त्याने पण घड्याळात पाहिले. नऊ वाजले होते.

''जा मग. तुला उशीर होतोय.'' तो उभा राहिला.

राजीव पण उठला.

''सकाळी येईन. घरी असशील ना ?''

''हो. हो.''

तो बाहेर रस्त्यावर आला. चौकात त्याने भोलाच्या दुकानातून सिगारेट घेतली.

''नमस्ते भइया ! कधी आला ?'' भोलाने विचारले.

इथे होता तेव्हा ऑफिसला जाताना रोज सायकल थांबवून भोलाच्या दुकानात तो पान खायचा.

''काल,'' तो म्हणाला आणि सिगारेट पेटवण्यासाठी पत्र्याच्या डब्यातला कागदाचा तुकडा उचलू लागला.

''माचिस घ्या, भइया,'' भोलाने त्याला काड्याची पेटी दिली. तो सिगारेट पेटवू लागला.

''संतू भैयाला जामीन मिळाला ?'' भोलाने विचारले.

''हो.'' त्याने माचिस दुकानाच्या कट्ट्यावर ठेवली आणि तो आपल्या घराकडे निघाला.

घरी येत असताना त्याला होळीच्या लाकडांचा ढीग दिसला. दोनचार पोरं बाटल्यात रंग भरून खेळत होती. एकाने त्याच्या अंगावर रंग उडवला. होळीच्या तीनचार दिवस आधीपासून रंग खेळला जायचा. होळीच्या दिवशीही होळी पेटण्यापूर्वी खूप रंग खेळला जायचा. पण आता सगळेच सण बदलून गेले आहेत. रीत म्हणून गोष्टी होत आहेत एवढेच.

''आज होळी पेटणार का ?'' घरी आल्यावर त्याने आईला विचारले.

''हो.''

''आमची पिचकारी बघायची, मामा ?'' कम्मन त्याला पिचकारी दाखवू लागला. पत्र्याची स्वस्त पिचकारी. ''प्लॅस्टिकची पण आहे.'' त्याने प्लॅस्टिकची बुटाच्या आकाराची पिचकारी त्याला दाखवली.

''अरे, ही तर छान आहे.'' ती हातात घेऊन तो पाहू लागला.

''बाटलीला फवारा लावलेला असतो तो घेऊ म्हणत होता.'' आई म्हणाली, ''पण तो फार महाग असतो म्हणे.''

''अडीच रुपयाला मिळतो,'' कम्मन म्हणाला.

''बरं, आपण उद्या आणून देऊ तुला,'' तो म्हणाला.

''जेवणार ?'' आईने विचारले.

''हो. घेऊन ये,'' तो म्हणाला आणि कपडे बदलू लागला.

जेवण करून तो बाहेर आला.

''होळी पेटवायला जाणार आहेस ?'' आईने विचारले.

''किती वाजता पेटवणार आहेत ?''

''चार वाजता पेटवणार आहेत म्हणे.''

''आपण नाही जात,'' तो म्हणाला, ''संतू कुठे आहे ?''

''बाहेरच्या खोलीत नाही का ?''

''दिवा तर लावलेला दिसत नाही.''

''मग कुठेतरी बाहेर गेला असेल. किती तरी समजावून सांगितलं पण त्याच्यावर काही परिणाम होत नाही. तुझ्याबरोबरच घेऊन जा त्याला. तिकडेच कुठे तरी नोकरीला लावून दे. सुधारेल एखादे वेळी.''

तो काहीच बोलला नाही. मुकाट्याने पडून राहिला.

दूरवर काही लोक होळीची गाणी म्हणत होते. ढोलकी-घुंगरांच्या साथीवर

चाललेल्या गाण्याचे अस्पष्ट स्वर बराच वेळ त्याच्या कानावर पडत राहिले.

सकाळी नऊच्या सुमारास तो झोपून उठला. आईने चहा आणून दिला. सिगारेट पेटवून तो चहा पिऊ लागला.

कम्मन खालून रंग खेळून आला. तो खालपासून डोक्यापर्यंत सगळा रंगाने भरून गेला होता. थरथर कापत होता. तरी पण बादलीत रंग तयार करीत होता. तोंडाला कोणीतरी काळं लावलं होतं.

धाकटा भाऊ गच्चीवर उभा राहून त्याची चेष्टा करीत होता. ''आईच्या अंगावर पण टाक ना थोडा रंग,'' तो म्हणत होता.

''टाकू का, आई ?'' पिचकारी भरीत कम्मन म्हणाला.

''अरे, ह्या म्हातारीवर कसला रंग टाकतोस !'' आई म्हणाली, ''जा, मोठ्या मामाच्या अंगावर टाक.''

कम्मनने वळून त्याच्या खोलीकडे पाहिले. तो चहा पिऊन कप खाली ठेवीत होता. तो काहीच बोलला नाही. कम्मन मुकाट्याने बादली घेऊन खाली निघून गेला.

धाकट्या भावाची बायको स्वयंपाकघरात कचोऱ्या तळत होती. दुसऱ्या चुलीवर मटन शिजत होते. वासावरूनच त्याला अंदाज आला होता. खोली स्वयंपाकघराच्या शेजारी असल्यामुळे धुराने भरून गेली होती. तो उठून धाकट्या भावाच्या खोलीत आला आणि बाल्कनीत उभा राहून खाली गल्लीत पाहू लागला.

कम्मन बादली घेऊन गल्लीच्या कोपऱ्यावर उभा होता. गल्लीतली काही पोरं एकमेकांवर रंग टाकीत होती. खाली पाइपाजवळ पुत्तन सोनार मोलकरणीची थट्टा-मस्करी करीत होता.

''तुझ्यावर नाही का गं कोणी रंग उडवला ?''

''तुम्ही उडवा नं !''

''सगळ्यांच्या समोर कसा उडवू ?''

त्याच वेळी गल्लीत रंग खेळणाऱ्या एका टोळीने प्रवेश केला. त्यातले काहीजण त्याच्या ओळखीचे होते. ते लोक इकडे येण्याआधीच तो बाल्कनीतून बाजूला झाला. खोलीत येऊन बिछान्यावर पडला आणि कम्मनचे एक पुस्तक घेऊन वाचू लागला.

इतिहासाचे पुस्तक होते. तो वाचू लागला : ''एके काळी भारत हा खूप समृद्ध देश होता. तो सुवर्णभूमी म्हणून ओळखला जात असे...''

रंग उडवणारे लोक खाली गल्लीत बराच गोंधळ घालत होते. ते लोकांना घरातून बाहेर बोलावीत होते. काही जणांनी बहुधा भांग घेतलेली असावी. ते मोठमोठ्याने हसत होते. त्याला वाटले की हे लोक कदाचित आपल्याला बोलावतील. पण ते पुढे निघून गेले.

त्याला हे सगळे कधीच आवडलेले नव्हते. समजायला लागले तेव्हापासून तो असला रंग कधी खेळला नाही. का कोण जाणे अशा तऱ्हेने रंग खेळणे म्हणजे काहीतरी विचित्र गावंढळपणा आहे असे त्याला वाटायचे.

''कोणी आलं नाही ?'' त्याने आईला विचारले. दरवर्षी काही लोक होळीला त्याच्याकडे यायचे—जीवनमामा, चौथेसाहेब, पानदरीब्याचे मावशीचे यजमान, बच्चूदादा वगैरे.

''अजून तरी कोणी आलेलं नाही.'' आई म्हणाली, ''काही खाणार असलास तर घेऊन येते.''

''नको,'' तो उत्तरला.

तेवढ्यात राजीवने त्याला हाक मारली. तो उठून बाल्कनीत आला.

''काय करतो आहेस ? चल बाहेर पड !'' राजीव म्हणाला,

त्याला माहीत होते, जावे लागणार म्हणून. त्याने कपडे बदलले. (होळीसाठी एक जुनी पँट आणि सदरा तो बरोबर घेऊन आला होता.) आणि तो खाली आला. खोली उघडली. राजीवने त्याला गुलाल वगैरे लावला. त्याने पण त्याच्याकडूनच गुलाल घेऊन त्याच्या कपाळावर लावला. धाकटा भाऊ एका ताटात पापड, करंज्या वगैरे घेऊन आला.

''चल, बाहेर पडणार आहेस ना ?'' राजीव पिंक थुंकून पापड तोंडात घालीत म्हणाला.

''पिऊन आला आहेस का कुठून ?'' तो म्हणाला, ''चल, जाऊ.''

''कुठे जायचे ?''

''इथून तर बाहेर पडू.''

तो उठून वर आला. आईला म्हणाला, ''आता जाऊन येतो थोड्या वेळात.''

''जातो आहेस तर मधल्या काकूकडे, बाबूकडे आणि रमेशकडे पण जाऊन ये.'' आई म्हणाली.

''बरं.'' तो खाली आला.

गल्लीच्या बाहेर पडत असतानाच कोपऱ्यावरच्या पोरांनी त्याला घेरले आणि ती त्याच्यावर रंग टाकू लागली. तो थांबला, ''पुरे, पुरे !'' घड्याळाला पाणी लागू नये म्हणून त्याने त्याच्यावर हातरुमाल बांधला.

''पिणार असलास तर चल घेऊ थोडीशी,'' राजीव म्हणाला.

''कुठे ?''

''माझ्या घरी. मी एक हाफ आणली होती. थोडीशी प्यालो. बाकी शिल्लक ठेवली आहे.''

तो निघाला. राजीवने कपाटातून बाटली काढली. वरून ग्लास आणि एका प्लेटमध्ये तळलेले मटन घेऊन आला.

थोडा वेळ तिथेच बसून ते दोघे थोडी थोडी प्याले. त्याने सकाळी दातही घासलेले नव्हते. तशाच पाण्याच्या चुळा भरल्या. त्याला थोडी थोडी नशा चढू लागली.

मग ते दोघे बाहेर पडले. आळीत उगीचच इकडेतिकडे भटकत राहिले. ओळखीच्या लोकांना आणि मित्रांना होळीनिमित्त भेटत फिरले.

''मला जरा लालबागला जायचे आहे. येतोस ?'' साधारणपणे एका तासाने राजीव म्हणाला.

''कशासाठी ?

''नात्यातली एक वैनी आहे. त्यांच्याकडे जायचंय. तिथं प्यायला मिळेल.''

''तू जाऊन ये,'' तो म्हणाला.

राजीव गेला आणि तो एकटाच राहिला. पानाच्या दुकानातून सिगारेट घेऊन ती पीत आता काय करावे असा विचार करीत तो क्षणभर उभा राहिला. आईने दोनचार ठिकाणी जायला सांगितलंय हे तेवढ्यात त्याला आठवले.

आधी तो मधल्या काकूकडे गेला. मधली काकू विधवा होती. बऱ्याच दिवसांपूर्वी टीबीमुळे काका मरण पावले होते. मुलंबाळं नव्हती. घर चांगले मोठे होते. त्यातच काकूची एक धाकटी बहीण पण राहत असे. ती पण विधवा होती. पण तिला एक मुलगी होती आणि तिचे लग्न झालेले होते. मुलगी आणि जावई पण त्याच घरात राहत असत.

त्याने घरात प्रवेश केला तेव्हा अंगणात खूपच गोंधळ माजलेला होता. धाकट्या काकूच्या मुलीशिवाय आणखीही एक दोन मुली आणि काही तरुण पोरं रंग खेळत होती. त्याच्याकडे कुणीही लक्ष दिले नाही.

तो क्षणभर तिथेच दारात उभा राहिला. मग पुढे ओसरीकडे चालत गेला. शेजारच्या खोलीत काकू एका खाटल्यावर बसली होती. तो काकूच्या पाया पडला आणि तिथेच बसला.

''कोण आहे ?'' काकूने आपल्या जाड भिंगाच्या चष्म्यातून त्याच्याकडे पाहिले.

''मी आहे— विपिन.'' काकूला सगळे स्पष्ट दिसते हे त्याला ठाऊक होते. ही तिची आपली एक सवय होती.

''विपिन ! बस, बाबा.''

तो आधीच बसला होता.

''होळीला येतोस म्हणून दिसतोस तरी. नाहीतर माझं कुणी आहे हे मला मेलीला कुठलं कळायला,'' काकू म्हणाली.

''माझी बदली झालीय नं !'' काकूच्या बोलण्यातल्या टोमण्याकडे त्याने लक्षच दिले नाही.

''कुठे ?''

''पाटण्याला.''

''कधी झाली ?''

''बरेच महिने झाले.'' पाटण्याला जायच्या आधी आपण काकूला भेटायला आलो होतो आणि बदलीविषयी तिला सांगितलेही होते हे त्याला चांगले आठवत होते.

काकू थोडा वेळ गप्प बसली. मग स्वत:च म्हणाली, ''मला तर या घराचा अगदी वीट आलाय. सकाळपासून या कारट्यांनी दंगा चालवला आहे. अगं छोटी, सकुन, सविता ! कुणालाही ऐकायला येत नाही.''

''काय आहे ?'' कुणीतरी म्हणाले.

''अगं, ताटलीत घेऊन ये काहीतरी— विपिन आलाय.''

''कोण विपिन ?'' धाकट्या काकूने स्वयंपाकघरातून विचारले.

''अगं, फत्तेचा मुलगा.''

''बरं, आले.''

अंगणात पोरींचे हसणे-खिदळणे अजूनही ऐकू येत होते.

''कोण लोक आहेत हे ?'' त्याने विचारले.

''धाकटीच्या पोरीच्या मैत्रिणी आहेत सगळ्या. मी तर अगदी त्रासून गेले आहे. अगं, आता पुरे करा म्हणते मी.'' ती थोडी हसली आणि मग म्हणाली, ''दीर आलाय होळी खेळायला. सगळ्या त्यातच मग्न झाल्यात.''

''बरं. पण आणखीही काहीजण दिसताहेत,'' तो म्हणाला.

''त्याचेच मित्रबित्र आहेत.''

तोवर धाकटी काकू खाण्यापिण्याची थोडी सामुग्री घेऊन आली.

''अगं, हे तर खूप झालं,'' तो म्हणाला.

''अरे बाबा, जास्त वाटलं तर थोडंसं काढून ठेव बाजूला. मला तर काही दिसत नाही,'' काकू म्हणाली.

तेवढ्यात धाकट्या काकूचा जावई रामप्रसाद तिथे आला. रीजनल ट्रान्सपोर्टमध्ये काम करीत होता. चांगली प्राप्ती व्हायची. त्याच्याबरोबर त्याचे एकदोन मित्रही होते.

''अरे बिपिनबाबू ! या; या. कधी आला पाटण्याहून ?'' त्याने त्याला आपल्या खोलीत बोलावून घेतले. त्याचे मित्र तिथेच बसलेले होते. रामप्रकाश लहानलहान ग्लासात दारू ओतू लागला. देशी दारू होती.

''मला देऊ नका हं,'' तो म्हणाला.

''का ? पीत नाही का ?''

''अशीच कधी तरी घेतली तर घेतली.''

''कधीतरी घेण्यासाठी तर आहे ही.'' त्याने त्याच्या ग्लासातही ओतली. मग तो नको म्हणाला नाही.

''संतूचं सगळं ठीक झालं ना ?'' रामप्रकाशने विचारले.

''अजून तरी नाही.''

''अरे, सगळं काही ठीक होऊन जाईल. त्यात काही विशेष नाही. मी बिशनसिंहांना सांगतो.''

''बिशनसिंह कोण ?''

''डी.वाय.एस.पी. सिटी. माझ्याकडे येत असतात. संतू नुकताच भेटला होता. एक-दोन दिवसांनी आठवण कर म्हणून त्याला सांगितले आहे.''

तो गप्प बसला. अंगणातला गोंधळ कमी झाला होता. तो आणखी थोडा वेळ बसला; मग उठून उभा राहिला.

''बरं, निघतो आता,'' तो म्हणाला.

''निघता ? बरं.'' रामप्रकाश त्याला बाहेरपर्यंत पोहोचवण्यासाठी आला.

अंगणातले रंग खेळणे थांबलेले होते आणि परस्परांच्या तोंडाला सोनेरी चम-चमणारी पावडर लावली जात होती.

''अरे, यांच्या अंगावर रंग टाका जरा !'' रामप्रकाश पोरींना म्हणाला.

''अहो मेव्हणेबुवा, तुम्ही तर खोलीतच जाऊन लपून बसलात !'' कोणीतरी एक पोरगी म्हणाली.

''लपलो नाही. तुमच्याशी रंग खेळायची तयारी करतो आहे.''

तो काकूकडे गेला. ''निघतो काकू !'' तो म्हणाला.

''बरं, बाबा. पान घेतलंस ?''

''हो,'' तो म्हणाला.

''संतू सुटला का ?''

''अजून नाही.''

''तुरुंगातच आहे ?''

''नाही. जामीन झाला आहे. बरं, नमस्कार काकू !''

तिथून तो बाबूदादाकडे आला. बाबूदादा त्याचा चुलतभाऊ. वयाने त्याच्याहून बरेच मोठे म्हणजे त्यांनी याला मांडीवर खेळवले होते. त्यांचे शिक्षण वगैरे सगळे त्याच्या घरी वडिलांच्या देखरेखीखाली झालेले होते. लग्नसुद्धा. पण लग्नानंतर चार-पाच वर्षांनी ते आपल्या कुटुंबासह वेगळे राहू लागले होते. काही दिवस दोन्ही घरातले येणेजाणे बंद होते. कार्यांच्या वेळी एका घरचे बोलावणे दुसऱ्या घरी होत असे; पण जात मात्र कोणीच नसे. शेवटी बऱ्याच दिवसांनंतर हळूहळू पुन्हा जाणे येणे सुरू झाले.

पूर्वी बाबूदादा फार रागीट स्वभावाचे होते. त्यांचे सगळे घर, बायको, मुलं— सगळेजण त्यांच्यापुढे थरथर कापत असत. पण आता ते खूप मऊ झाले आहेत.

''ये, ये !'' बाबूदादा त्याला म्हणाले आणि त्याला खुर्चीवर बसवून स्वत:

बैठकीवर बसले.

बराच वेळ त्याच्याशी इकडचे तिकडचे बोलत राहिले. पाटणा शहराबद्दल. आपल्या ऑफिसबद्दल. आपल्या आणि त्याच्या वडिलांच्या बाबांबद्दल. मधेच त्याला सिगारेटही दिली.

आजपर्यंत त्याने त्यांच्यासमोर कधी सिगारेट ओढली नव्हती. म्हणून तो ''नको'' म्हणाला.

''अरे ओढ ओढ. आता तू मोठा झाला आहेस. नोकरी करतोस. हे सगळं असं कुठवर चालणार ?'' ते म्हणाले.

त्याने सिगारेट पेटवली.

त्यांच्या खोलीत घरातल्या इतर कुणाला यायची परवानगी नव्हती. म्हणून घरातल्या मुलांनी त्याला दारातूनच नमस्कार केला होता आणि ती निघून गेली होती.

''दारू पिणार ?'' त्यांनी विचारले.

''नको— नको.''

''पितोस ना ?''

''नाही.'' आपल्या तोंडाचा वास तर येत नाही ना असे त्याला वाटले.

''पीत असलास तर देतो थोडीशी. पीत नसलास तर मग नको पिऊ,'' ते म्हणाले आणि त्यांनी आपल्या मुलीला हाक मारली. ''रेखा, काकाला घरात घेऊन जा. काहीतरी खायलाबियला दे.''

''मी निघतो.'' तो उठून उभा राहिला.

''या भावजी, तुम्ही तर अलीकडे दृष्टीसही पडत नाहीत,'' घरात शिरताच वहिनी म्हणाली.

''तुमची तब्बेत कशी आहे ?'' त्याने विचारले.

वहिनी बहुधा आजारी असायची. तिच्या हातापायाला सूज येत असे. छातीतही दुखायचे.

''आज उठली आहे थोडा वेळ. सणावारात उठलं नाही तर चालत नाही. पण बघ, थोडंसं काम केलं नाही तर पाय सुजले.'' ती लुगडे उचलून पाय दाखवू लागली.

तो खाटेवर बसला.

''बाळा !'' वहिनीने मुलाला हाक मारली. ''पोरा, जरा तांब्यात रंग करून घेऊन ये. भावजीबरोबर रंग तरी खेळू या. तशी माझी आंघोळ होऊन गेली आहे म्हणा.''

''नको—नको. राहू द्या. नुसताच गुलाल लावतो.''

खिशातून गुलाल काढून त्याने तो वहिनीच्या कपाळाला लावला.

वहिनीने हातात गुलाल घेऊन त्याच्या सगळ्या तोंडावर फासला. डोक्यात घातला. तो मुकाट्याने उभा राहिला.

तोवर रेखा एका ताटलीत करंज्या, पापड वगैरे घेऊन आली.

"काका, दारू प्यायले आहेत," ती म्हणाली.

"बरं", तो म्हणाला, "तुला कसं कळलं ?"

"बाबू विचारीत नव्हते ?"

"चल, पळ इथून !" वहिनी तिला रागावली.

"कितवीत आहे ही ?" त्याने विचारले.

"तिसरीत नाव घातलंय यंदा," वहिनी उत्तरली.

तो करंज्या खात राहिला.

"एक पुरी घ्या अजून, भावजी !"

"नको-नको वहिनी !"

"फक्त एकच. बास."

"नको. पुन्हा कधीतरी खाऊ. पोट खूप भरलंय."

"बरं, तेवढी करंजी तरी सगळी खाऊन टाका." वहिनी पान बनवू लागली.

"आमचं लग्न झालं तेव्हा तुम्ही तुमच्या दादांबरोबर रंग खेळायला आला होता." वहिनी म्हणाली, "चार वर्षांचे असाल. लहानशी पिचकारी आणली होती. तुम्हाला आठवत नसेल. मी तुमच्या अंगावर रंग टाकला होता, तर तुम्ही रडायला लागला होता— ईऽ ईऽ. गप्प केलं तरी गप्प बसला नाहीत. मग आमच्या बाबूजींनी तुम्हाला पाच रुपयांची नोट दिली तेव्हा गप्प झाला. करंजी दिली होती खायला तर तुम्ही ती खिशात ठेवून तिली होती. आठवत नसेल तुम्हाला."

तो हसू लागला. "कुठलं आठवायला !" तो म्हणाला.

दरवर्षी होळीला वहिनी त्याला ह्या गोष्टीची आठवण करून देते. आणि तोही आपण प्रथमच ही गोष्ट ऐकतो आहोत असे दाखवतो.

निघाला तेव्हा वहिनीने विचारले, "धाकटे भावजी आणि संतूभावजी नाही आले ?"

"भटकत असतील इकडे तिकडे."

"संतू भावजीला नोकरी मिळाली का कुठे ?"

"त्याला कुठली नोकरी मिळणार ? काल तर तो तुरुंगातून सुटून आला आहे."

"तुरुंगातून ?"

"हो, तुमच्या कानावर नाही आलं ? कुठून अफू बिफू घेऊन आला होता कुणास ठाऊक. म्हणूनच पोलिसांनी पकडून नेलं होतं."

"मग आता खटला चालणार ?"

"हो. चालणारच."

"अरे देवा ! संतू भावजींना झालंय तरी काय ?"

''डोकं बिघडलंय. दुसरं काय म्हणणार ?''

त्याला पोहोचवायला वहिनी उंबरठ्यापर्यंत आली. खोलीत दादा एकटेच बसले होते.

''ऐकलं का ?'' वहिनी म्हणाली, ''संतूभावजींना पकडलं होतं म्हणे, कालच तुरुंगातून सुटून आले आहेत.''

''काय झालं ?'' दादा उठून उभे राहिले.

त्याने थोडक्यात सगळी हकीकत सांगितली.

दादा म्हणू लागले, ''अलीकडच्या पोरांना काही समजतच नाही. आमचे पण चिरंजीव आहेत ना. एक दिवस तेही तुरुंगात जाणार.''

बाळ तिथेच उभा होता. त्याने त्यांच्याकडे पाहिले.

''बरं, निघतो दादा !'' तो म्हणाला. त्याला उशीर होत होता.

''काकू ठीक आहे ना ?''

''हो.''

''संध्याकाळपर्यंत येईन मी बहुतेक.''

''ठीक आहे. अच्छा, नमस्ते दादा ! नमस्ते वहिनी.'' तो तेथून बाहेर पडला.

पावणेदोन वाजले असावेत. रंग टाकणे जवळपास थांबले होते. रस्ते अजून ओलेच होते. घरांच्या भिंतींवर, दुकानांवर, पाट्यांवर सगळीकडे रंग खेळल्याची चिह्ने दिसत होती. एवढेच नव्हे; तर गाईच्या आणि कुत्र्यांच्या अंगावरही रंग टाकण्यात आला होता. काहीजण सिनेमाच्या पोस्टरबरोबरही रंग खेळले होते.

रमेशकडे जावे की नाही या विचारात तो पडला. त्याला वाटले, आई म्हणालीय तर दोन मिनिटात उरकून घ्यावे.

रमेश त्याच्या आत्येचा मुलगा होता. त्याच्याच वयाचा असेल. तीनचार वर्षांपूर्वी आत्याचे यजमान कुठेतरी तीर्थयात्रेला गेले होते. ते पुन्हा परत आलेच नाहीत. आत्या, रमेश, त्याची बायको आणि त्याचीं चार मुले. रमेशचे लग्न त्याच्या लग्नाआधी बरीच वर्षे झाले होते. त्याच्या बायकोचे वय तसे जास्त नाही; पण चार मुले झाल्यामुळे तिची प्रकृती धड राहिलेली नाही.

तो गेला तेव्हा रमेश घरात नव्हता. त्याची बायको कुंती रंगाने भरलेल्या कपड्यात उन्हात बसलेली होती.

''खूप वाट पहायला लावलीत तुम्ही.'' ती म्हणाली, ''तुमच्यामुळेच माझी आंघोळ अजून राहिली आहे. आई म्हणाल्यासुद्धा की न्हाऊन घे, तुम्ही काही आता येणार नाहीत म्हणून. पण मला खात्री होती की तुम्ही नक्की येणार.''

''हो. उशीर झाला,'' तो म्हणाला आणि खाली खाटेवर बसू लागला.

''आता बसू नका. इकडे या आधी,'' ती म्हणाली. दोन बादल्यात रंग आधीच तयार करून ठेवलेला होता. एकीत हिरवा, दुसरीत लाल.

तो उठून उभा राहिला. रंग ठेवलेला होता तिकडे गच्चीवर त्याचा हात धरून त्याला कुंतीने ओढत नेले आणि तांब्यात रंग घेऊन त्याच्या अंगावर टाकू लागली.

त्याने तिच्या हातातून तांब्या हिसकावून घेतला आणि तोही तिच्या अंगावर रंग टाकू लागला. कुंती मुकाट्याने छातीवर हात बांधून उभी राहिली. त्याने तिच्या केसात, ब्लाउजच्या आत, सगळीकडे रंग टाकला.

''बरं, आता तुम्हाला मुकाट्याने बसावे लागेल.''

''उभ्या उभ्याच टाक ना,'' तो म्हणाला.

''तुम्ही उंच आहात ना.''

''खाली वाकतो.''

तो खाली वाकला. कुंतीने तांब्यातून त्याच्या अंगावर खूप रंग उडवला. मग हातात रंग घेऊन त्याच्या तोंडाला लावू लागली.

''ठीक आहे, लावून घे,'' तो म्हणाला आणि आपल्या हातात पण रंग घेऊन तिच्या तोंडाला लावू लागला. ती चुकवू पाहत होती; पण त्याने तिला पकडले आणि तिच्या तोंडाला रंग लावला. तिचे तोंड चमकू लागले.

तो परत खाटेवर येऊन बसला. आणि उन्हात कपडे वाळवू लागला. कुंती नात्याने त्याची वहिनी होती; पण तो तिला काहीच म्हणायचा नाही. कदाचित ती वयाने त्याच्याहून बरीच लहान असावी. तो एम्.ए.ला होता. तेव्हा अनेकदा तिच्या घरी जायचा. तासंतास गप्पा मारीत बसायचा. कधीकधी तिला शिकवायचा पण. त्याच्याच सांगण्यावरून तिने हायस्कूलचा फॉर्म भरला होता. आणि बहुतेक त्याच्याच मदतीमुळे पास पण झाली होती तिसऱ्या श्रेणीत. पण नंतर हळूहळू जाणे-येणे कमी झाले.

कुंती आतून जेवणाचे ताट घेऊन आली. पुरी, भाजी वगैरे. ताट खाटेवर ठेवून तिने पोराला मांडीवर घेतले व त्याला दूध पाजू लागली.

''अगं, हे जेवणाचं ताट कशाला आणलंस ?'' तो म्हणाला.

''खावंच लागेल तुम्हाला.''

''नको बुवा. पोट खूप भरलंय. संध्याकाळी येऊन खाईन.''

''मला माहीत आहे तुम्ही काही संध्याकाळी येणार नाहीत.''

''येईन, नक्की येईन.''

''तुम्ही नेहमीच असं खोटं सांगता. बरं, एखादा घास तरी खा.''

त्याने थोडेसे खाल्ले. ''आत्या कुठे आहे ?'' त्याने विचारले.

''वरती गच्चीवर ऊन खात बसल्या आहेत.''

उठून तो आत्याला भेटायला गेला.

तीन वाजायच्या सुमारास तो घरी परत आला. पटकन आंघोळ वगैरे करून नवीन कपडे घालून इकडेतिकडे फिरत होता.

''कोणी आलं होतं ?'' त्याने आईला विचारले.

''हो. चौथेसाहेब आले होते.''

''जीवनमामा नाही आले.''

''नाही.''

''आणि पानदरीबाच्या मावशीचे यजमान ?''

''ते पण नाही आले. ते तर गतवर्षीही आले नव्हते.''

तो गप्प बसला.

''तू सगळीकडे जाऊन आलास ?'' आईने विचारले.

''हो.''

''मग आता आंघोळ करून घे. पाणी गरम आहे.''

तो आंघोळीला बसला. हातापायाचा रंग धुवू लागला. तेवढ्यात त्याच्या लक्षात आले की राजीवला बसवले होते ती बाहेरची खोली खूप घाण झालेली आहे.

''बाहेरची खोली कुणी स्वच्छ केली का ?'' त्याने विचारले.

''कोण स्वच्छ करणार ?'' आईने विचारले, ''केली तर मीच स्वच्छ करणार, तर मला आता दिसतही नाही.''

तो आंघोळीच्या मधूनच उठला आणि खोली स्वच्छ करू लागला. खोली स्वच्छ केल्यानंतर त्याने स्नान केले. टॉवेलने अंग पुसत होता. तेवढ्यात संतू आला. डोळे तारवटलेले होते. पावलं नीट पडत नव्हती. येऊन जमिनीवर बसला. मग तिथेच आडवा झाला. डोळे मिटून घेतले.

तो मुकाट्याने अंग पुसत राहिला. आई पण गप्पच होती.

थोड्या वेळाने संतू उठला आणि मोरीजवळ बसून ओकू लागला. ओकल्यानंतर पुन्हा येऊन पडला. आईने बादलीत पाणी आणून तिथे टाकले.

''जेवायला आणू ?'' आईने त्याला विचारले.

''नको. पोट भरलंय.'' तो म्हणाला. आपण सकाळपासून दात घासले नाहीत हे त्याला आठवले. टूथब्रश घेऊन तो दात घासू लागला.

''विपिन !'' जीवनमामा नेहमीच जिन्याच्या खाली उभे राहून हाक मारीत असत.

''या, मामा !'' तो म्हणाला.

''येऊ ?''

''हो. हो. या ना.'' तो जिन्यासमोर आला.

''चल आण बाबा, मटण-पुरी घेऊन ये खायला.'' जीवनमामा गच्चीवर आले. दरवर्षी होळीला ते मटण खायला यायचे. त्यांच्या घरचे सगळेजण शाकाहारी आहेत.

म्हणून त्यांच्या घरी हे शिजत नसे. तो गच्चीवरच खुर्ची-टेबल नीट मांडू लागला.

''याला काय झालंय ?'' जीवनमामांनी संतूला गच्चीवर डोळे मिटून पडलेले पाहून विचारले.

''कुठून तरी पिऊन बिऊन आला असेल.'' तो म्हणाला.

जीवनमामा गप्प बसले. ''तू कधी आलास ?'' त्यांनी विचारले.

''दोन-तीन दिवस झाले.''

''मुलांना नाही आणलंस ?''

''ती आपल्या आजोळी गेली आहेत.''

''ताई कुठे आहेत ?''

मामा खुर्चीवर बसले.

''आत असेल,'' तो म्हणाला आणि आईला हाक मारू लागला. ''आई, जीवनमामा आले आहेत गं.''

आई बाहेर गच्चीवर आली.

''नमस्कार ताई,'' मामा म्हणाले.

''नमस्कार,'' आई म्हणाली, ''बस ना.''

मामा आधीच बसलेले होते.

''आणखी काय हालचाल ?'' ते म्हणाले, ''तुला नीट दिसत नाही ?''

''कुठं नीट दिसतंय ! कोणीतरी बसलंय एवढं समजतं. तुझा चेहरा स्पष्टपणे दिसत नाही.''

''भाऊसाहेब गेल्यापासून तुझी तब्बेत बरीच बिघडलीय.''

''अंगात काहीच त्राण राहिलेलं नाही,'' आई म्हणाली.

''आई, मामांसाठी मटण-पुरी घेऊन ये,'' तो म्हणाला.

''तू मटण वाढ. मी पुरी घेऊन येते,'' आई उठत म्हणाली.

मटणासाठी तो प्लेट शोधू लागला. जीवनमामा खुर्चीवर बसल्या बसल्या संतूला निरखीत राहिले.

जीवनमामा त्याचे लांबच्या नात्याने मामा लागत होते. त्याच्या वडिलांच्या घनिष्ठ मित्रांपैकी एक होते. तसे त्यांचे वय वडिलांपेक्षा बरेच कमी होते. वडील होते तेव्हा ते रोज न चुकता संध्याकाळी यायचे. त्यांच्या गप्पांचा ओघ कधी संपत नसे. आधी स्वातंत्र्य मिळालेले नव्हते तेव्हा जीवनमामा कॉंग्रेसची खूप स्तुती करायचे. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर कॉंग्रेसला नावे ठेवू लागले. आता कम्युनिस्टांची स्तुती करतात.

वडील होते तेव्हा होळीला जीवनमामा आले की बाटली उघडली जायची. आता हे दोघेजण फार तर एकएक छटाकच पीत असतील; पण त्यानंतर त्यांच्या चर्चा एवढ्या जोरजोरात चालायच्या की आई म्हणायला लागायची, ''सगळे पिणारे मी पाहिले

आहेत; पण पिऊन झाल्यावर असं भांडत बसलेलं कुणी नाही पाहिलं.''

वडिलांच्या मृत्यूच्या वेळी जीवनमामा गावाकडे गेले होते. परत आले तेव्हा त्यांच्या घरी येऊन तासंतास रडले होते. त्यानंतर हळूहळू त्यांचे जाणे-येणे कमी झाले. आता फक्त होळी-दिवाळीलाच येतात.

आईने पुऱ्या आणल्या होत्या. तो प्लेटमध्ये मटण घालत होता तेव्हा मामा म्हणाले, ''हाडाचे तुकडे घाल रे, बाबा.''

त्याने निवडून तुकडे घातले आणि प्लेट टेबलावर आणून ठेवली. ''तू नाही खात ?'' मामांनी विचारले.

''माझे झाले खाऊन,'' तो म्हणाला.

मामा खाऊ लागले. ''मटण तर एकदम छान झालंय बाबा,'' ते म्हणाले. ते नेहमीच जेवणाची तारीफ करीत असत. वडील याबद्दल त्यांना चिडवायचेही याच्यावरून. ''अरे, जेवल्यानंतर लोक स्तुती करतात ते मी ऐकली आहे; पण तू तर एकीकडे खातो आहेस आणि दुसरीकडे स्तुतीही करतो आहेस.''

''त्यामुळे जेवण आणखी चांगलं लागतं,'' मामा म्हणायचे.

संतू उठून बसला होता. थोडा वेळ व्याकूळ झाल्यासारखा बसून राहिला. मग खाली निघून गेला.

जीवनमामांच्या चेहऱ्यावर काही रेषा उमटल्या. त्यांनी जेवण थांबवले.

''च् च्. सांगा,'' ते म्हणाले, ''ही कुठली पद्धत आहे ? आज भाऊसाहेब असते तर त्यांना किती वाईट वाटले असते. अशा माणसांना मुळीच सहानुभूती दाखवू नये.''

''आता काय सांगू तुम्हाला ? याला तर पकडले होते,'' तो म्हणाला.

''ऐकलंय मी सगळं. तू याला सोडवलंस ही चूक केली.''

''मी राहू दिलं असतं, पण आईचा विचार केला.''

''माया तुटत नाही हो.'' आई म्हणाली, ''नाही तर असला मुलगा असण्यापेक्षा नसलेला बरा.''

''नाही ताई.'' जीवनमामा म्हणाले, ''तुम्ही जितकी माया कराल न तेवढे हे आणखी बिघडतील.''

आई गप्प बसली. जीवनमामा पुन्हा जेवू लागले तेव्हा आई पानाचा डबा उघडून पान लावू लागली. पान खाऊन झाल्यावर मामा निघाले तेव्हा त्यांना सोडायला तो खालपर्यंत गेला. दारात उभा होता तेव्हा सतीश बाहेरून कुठून तरी येत असलेला दिसला.

''कुठे गेला होतास ?'' त्याने विचारले.

''असाच एका मित्राकडे गेलो होतो.''

ते जिना चढत होते.

''तू बसतोस थोडा वेळ दारात ?''

''नाही.'' धाकटा भाऊ म्हणाला. आईने पानं लावून ठेवली होती. तातली घेऊन तो मुकाट्याने खाली आला आणि समोरची खोली उघडून बसला.

गल्लीत होळी-भेट घेणारे लोक जात-येत होते. यंत्रासारखे ते त्याच्याही खोलीत यायचे, गळाभेट घ्यायचे, तातलीतले पान घेऊन खायचे, काहीतरी बोलायचे, ''कधी आला ?,'' ''मुक्काम किती ?'' वगैरे वगैरे आणि उठून निघून जायचे. काही लोक उभ्याउभ्याच एखादं मिनिट थांबायचे. काही एकदोन मिनिटं बसायचे. लोक बसले तर तोही बसायचा. ते निघाले की पुन्हा उठून उभा राहायचा. त्याला हे सगळं मुळीच आवडत नव्हतं. आईचा विचार करूनच तो इतका वेळ बसला होता.

आठ वाजता लोक यायचे कमी झाले तेव्हा दार बंद करून तो वर आला.

''आता येतो थोड्या वेळात,'' आईला सांगून तो बाहेर पडला. एकादोघा मित्रांकडे गेला. पण कोणी भेटले नाही. थोडा वेळ असाच इकडे तिकडे भटकत राहिला. दहाच्या सुमारास परतला. घरात शिरत असतानाच आई ताटात जेवण घेऊन खाली येत होती.

''हे जेवण घेऊन कुठे चाललीस ?'' त्याने विचारले.

''संतूसाठी घेऊन चाललेय. हवं तर खाईल नाही तर नाही. मला काय करायचंय. विचारते. याला तू तुरुंगातच राहू दिलं असतंस तर बरं झालं असतं,'' ती म्हणाली.

क्षणभर तो उंबऱ्यातच थांबला. आईने दार उघडले तेव्हा खाटेवर संतू पालथा पडलेला दिसला. अजूनही त्याच्या अंगावर रंगाचे कपडे होते.

तो जिना चढून वर आला. कम्मन बाजेवर झोपला होता. धाकट्या भावाची खोली बंद होती. कपडे बदलून तो बिछान्यावर आडवा झाला. थोड्या वेळाने आई वर आली.

''संतू जेवला ?'' त्याने विचारले.

''तो कसला जेवतो. पिऊन पडलाय,'' आई म्हणाली. मग थोड्या वेळाने पुन्हा म्हणाली, ''जेवेल नाही तर बसेल तसाच. आता मी जाणार नाही विचारायला. तुला वाढू ?''

''मी नाही जेवत. दिवसभर वेडंवाकडं खाऊन पोट बिघडलंय,'' तो म्हणाला.

''थोडंसं खा.''

''नको,'' तो म्हणाला.

''तू काहीच खाल्लं नाहीस. करंजी खा एखादी. आणू ?''

''नको, भूक नाही,'' तो म्हणाला.

आई गप्प बसली.

''सतीश कुठं गेलाय का ?'' जरा वेळाने त्याने विचारले.

''सिनेमाला गेलाय. सूनबाई पण गेलीय.''

''बरं,'' तो म्हणाला.

थोडा वेळ पडून राहिला. ''दिवा बंद करू ?'' त्याने विचारले.

''कर. मला कशाला हवा दिवा ? असला नसला सारखाच.''

''बाहेरचं दार बंद केलं ?''

''हो.'' त्याने उठून दिव्याचा स्विच ऑफ केला. खोलीत अंधार पसरला.

''मी उद्या परत जाईन,'' तो म्हणाला.

''बरं.'' आईने त्याच्या दिशेने कूस बदलली.

अंधारात त्याला तिचा चेहरा दिसू शकला नाही.

# तिसरा तळवा

राजी सेठ

इतका वेळ झाला तेव्हा त्याला वाटले की ती आता येणार नाही.

त्याने घड्याळ पाहिले. ठरलेल्या वेळेपेक्षा पाऊण तास जास्तच झाला होता. बहुधा असे होत नाही. ती दोघेही आपापल्या जबाबदारीवर वेळेवरच येत. जायचं काही कारण किंवा इच्छा नसली तरीही. बहुधा... हे काय फक्त सवयीमुळे घडत होतं का ?

तीही काही फार उत्साहाने ओसंडलेली असते असे नाही.

''आज येऊ शकशील का ?''

''येईन.'' काहीही विचार न करता किंवा आढेवेढे न घेता ती उत्तर देते. आता बहुधा उत्तरच इतकं साधं सरधोपट असतं की वाक्य फिरवून काही बोलायची सोयच नसते.

''तर मग...'' तो अधांतरीच असतो.

''ठिकाण सांग !''

''तूच का नाही सांगत...? तुला कुठे सोयीचे होईल ?'' तो थोडं वैतागून म्हणतो.

''मला सगळीकडेच... कुठेही सोयीचे होईल.''

तिचा आवाज इतका काही आवेगशून्य आहे की त्यातून थंडपणा जाणवावा. ती त्याला कुठेही, कधीही, कसल्याही अडचणींचे डोंगर पार करून भेटायला येईल असा या शब्दांचा अर्थ मुळीच करता येणार नाही.

''इकडे... जनपथाकडे येशील ?''

''येईन.''

''किंवा दुसरीकडे कुठे... तुला बरं वाटेल तिथं.''

''जनपथाकडे येईन... कुठे ?''

''एम्पोरियमसमोर भेट... काय, ठीक आहे ना ?''

''किती वाजता ?''

''पाच... साडेपाच वाजेपर्यंत ?''

''किती वाजता म्हणशील तेव्हा... वेळ नक्की सांग.''

''साडेपाच.''

''ठीक आहे.'' असे म्हणून ती फोन ठेवते. अलीकडे तो सारखा विचारायचा, ''ऑफिसात जवळपास असलेल्या लोकांच्यामुळे फोनवर मोकळेपणाने बोलायला तुला अडचण तर वाटत नाही ना ?''

''नाही... नोबडी केअर्स... नो प्रॉब्लेम.''

तिने एखादा प्रॉब्लेम सांगितला असता तर तिचा थंडपणा समजून घेण्याचे काहीतरी कारण सापडले असते... पण प्रॉब्लेम नाही हाच तर मोठा प्रॉब्लेम होता. कुठल्याही कारणाशिवाय त्यांच्यामध्ये हे जे अनामिक परिवर्तन होत होते त्याला कुठलेही नाव देता येत नव्हते.

एक तासाहून जास्त वेळ झाला. तो अस्वस्थपणे इकडून तिकडे फेऱ्या मारू लागला. जवळच्या पुस्तकांच्या दुकानात शिरला. पुस्तकांशी त्याची खूप जुनी भागीदारी आहे... ती सतत आपल्याला निमंत्रण देत आहेत असे वाटायचे... म्हणूनच तो त्यांना घाबरतो. हे आमंत्रण आपल्याला लपेटून घेईल इतकं प्रभावी होऊ नये... नन्दितेशिवाय तो आणखी कुठल्याही गोष्टीत गुंतू इच्छित नाही....

अधिकार... जबरदस्त अधिकार... घ्यावा किंवा द्यावा हे त्याला आवडते. नंदी भेटली तेव्हापासून तिच्याविषयी विचार करणं, तिच्यासाठी जगणं— हेच हवंय त्याला.

त्या दिवशी नंदीने कशी फिरकी घेतली होती... कळत न-कळत— ''बायकोबरोबर राहतोस तेव्हा तिचा विचार केला पाहिजे, तिच्यासाठी जगलं पाहिजे असं नाही वाटत ? माझी गरज काय म्हणून पडली ?... तुझ्या स्वतःच्या सिद्धान्तांच्याविरुद्ध झाली ना ही गोष्ट ?''

त्या काळात ती असल्या गोष्टी मोकळेपणाने बोलायची— पूर्ण अधिकारवाणीने... काहीही... कसेही ! तो नाराज होईल अशी भीती मनात नसायची. तसा तो तेव्हाही नाराज होत नव्हता आणि आताही होत नाही, तरीपण... कुणास ठाऊक का ?...

पुस्तकांची पाने उलटताना त्याच्या ध्यानात आले की आपण बाहेर उभे नाहीत. त्यामुळे ती परत तर नाही ना जाणार ? मनातला एक कोपरा जाणत होता की हे भय निर्मूल आहे, पण शंका नाहीशी झाली नाही. रॅकवर पुस्तक ठेवून तो बाहेर आला.

बाहेर हलकीशी झिमझिम सुरू झाली होती. ऑफिसातून तो निघाला तेव्हा तर आकाश निरभ्र होते.

पाऊस सुरू झाला तर तिला यायला त्रास होईल असे त्याला वाटले. ऑफिस सुटायच्या वेळेला एरव्हीच रिक्षा मिळायला वेळ लागतो—त्यात पाऊस पडू लागला तर मग आणखीनच त्रास.

आपण स्वत:च तिला घेऊन का नाही आलो ?... तिच्या सोयींचा विचार आपण अलीकडे का करीत नाही आहोत ?

रस्त्याच्या एका टोकाला उभे राहून तो इकडे तिकडे पाहू लागला. पण फार वेळ एके जागी उभे राहणे त्याला गैरसोयीचे वाटू लागले. जणू काही प्रत्येक जण तो वाट पाहतो आहे इकडे लक्ष देत होता. फुटपाथवर उभे राहून दहा पैसे देऊन त्याने इव्हिनिंग न्यूज विकत घेतले आणि त्याची पाने उलटत राहिला— ''श्री. चव्हाण यांनी राष्ट्रपतींना आपण मंत्रिमंडळ चालवण्यास असमर्थ आहोत असे सांगितले.''

'असमर्थ आहोत असे सांगणे ?' असे करता येणे हे किती बरे असते. किती स्वातंत्र्यदायक... पण असे होते का ?... का करतो माणूस असे ? —हातात तुकडे आहेत या भ्रमात खुश होतो. वस्तू मोडून गेली आहे या वस्तुस्थितीने त्रस्त होत नाही.

एक ऑटोरिक्षा येऊन थांबली. त्याने घाईघाईने पेपराची घडी केली. जणू काही तो काहीच करीत नव्हता, फक्त वाट पाहत होता.

रिक्षातून बाहेर आलेला पाय पँटवाल्याचा होता. निराश होऊन तो पुढे चालू लागला.

सांगून ती आली नव्हती असे आजवर कधीही झाले नव्हते. इच्छा वा उत्साह नसला तरीही आली होतीच. आपली अनिच्छा तिने याप्रकारे कधीच प्रकट केली नव्हती. फक्त आली होती... गप्प राहो किंवा बोलो. खुश असो किंवा नाराज... येत होती. कोणताही प्रतिकार न करता, हरकत न घेता.

अशा वेळी अचानक वाटू लागतं की आपण जणू काही हातात भिजलेले हातमोजे घातले आहेत.

त्याने खिशातून सिगरेट काढून पेटवली. एखाद्या रिकाम्या घरात धुकं भरून जावं तसा धूर आत भरला गेला. त्याने इकडे तिकडे पाहिले. जवळच एक फेरीवाला, बटाटेवडे, चाट विकत होता. दुसऱ्या बाजूला छोल्याभटुऱ्याचा परिचित वास येत होता.

भुकेला असूनही त्याचे लक्ष तिकडे गेले नव्हते. त्याला वाटलं होतं की बहुधा रेस्टॉरंटमध्ये बसून खावं लागेल.

भुकेबद्दल विचार करताच त्याची भूक प्रज्वलित झाली आणि तोंडाला पाणी सुटलं.

त्याला वाटले की एक प्लेट चाट मागवावी पण का कोण जाणे, चाट खायचा आणि तिच्या येण्याचा क्षण एकच असणार असे त्याला वाटले. आपण वाट पाहत असलेलो दिसणार नाही. हा उतावळेपणा किती वाईट दिसेल.

''तसं पाहिलं तर प्रत्येकाची भूक ही त्याची स्वत:ची गरज असते—अगदी स्वत:ची.'' नंदी त्याला नेहमी म्हणायची, ''आपली तहानभूक ही आपलीच असते. दुसऱ्याबरोबर वाटून घेणं हा बहुधा भ्रम असतो... कधी कधी बराच वेळ टिकून राहतो... कधीकधी लवकर नाहीसा होतो...''

“काय अनुभवी माणसासारखं बोलते आहेस ?” तो कडवटपणे म्हणायचा. “तू अनुभवी असलेलं मला नाही आवडत.”

“मला पण नाही आवडत... तरी पण तुझ्या अनुभवी असण्याबद्दल मी काहीही म्हणत नाही... तुला पाहते, तुझे अनुभव नाही पाहत.” तिच्या डोळ्यात छेडण्याची भावना नसते, फार खोल औदासिन्य भरलेले असते.

तो विषय बदलतो. मळल्यासारखा तो शरमतो.

नंदी आहे म्हणूनच तो या गोष्टी फार ताणत नाही. मनात काहीही असो. कधी तिच्या घराबद्दल बोलावं तर म्हणेल—“त्या नरकात तर राहायचं आहेच. त्याच्या आठवणीने ही घटका कशाला काळवंडून टाकतोस ?”

सुरवाती सुरवातीला तिच्या घराबद्दल बोलणं निघालं की ती त्याच्या खांद्यावर डोकं टेकून रडायची. त्या वेळी ते कुठल्यातरी बागेत बाकावर बसलेले असायचे. तो तिला बाहुपाशात घेऊन तिचे चुंबन घ्यायचा. तेव्हा ती म्हणायची, “तुझ्या जवळ आले म्हणजे जगू लागते, माझ्या मनाची क्लायमेटच बदलून जाते... असं नाही का होऊ शकणार... की मी नेहमीच... तुझ्या जवळ राहावं ?”

“असं कसं होईल ?” कोण जाणे कसे त्याच्या तोंडातून निघून गेले, आपण असं काही म्हणावं अशी त्याची मुळीच इच्छा नसताना. आणखी काही नाही तरी असं आपण करू शकू म्हणून तो तिला दिलासा देऊ शकला असता... अशा दिलाशात जीव नसतो, हे त्याला सांगावं नाही लागलं. त्याच्या हाताच्या पकडीतूनच ही गोष्ट स्पष्ट झाली होती.

“होय... नाही होऊ शकत.” दीर्घ निश्वास सोडीत ती त्याच्या पकडीतून स्वतःच बाजूला झाली होती, “तुझं स्वतःचे एक घर आहे. मी ते विसरायला नको आहे.”

ती आपल्याला जास्त महत्त्व देते आहे का घराला, हे त्या क्षणी त्याला मुळीच समजू शकले नाही. स्त्रीला सगळं काही मिळाल्यानंतरही कदाचित एक घर हवं असतं.

यानंतरच ती स्वतः बरीच सावरली गेली होती... फारसा आग्रहीपणा नसायचा. कधी घराबद्दल बोलणं निघालंच तर म्हणायची— “कशाला विचारतोयस पुन्हा पुन्हा... त्यात काय बदल होणार आहे... किंवा कुठंही, काहीही का म्हणून बदलेल ?... बदलण्यासाठी हिंमत हवी असते आणि ती मी तुझ्यात नाही निर्माण करू शकत.” पुढे तिला आणखीही काही म्हणायचं असतं; पण ती थांबते.

त्याच्या अचानक लक्षात आले की आपल्याच नादात फिरत फिरत आपण बरेच पुढे आलो आहेत. ...जनपथ संपतो त्या चौकापर्यंत.

ढगांनी आभाळ चांगलंच वेढून घेतलं आणि झिमझिम पावसाच्याऐवजी आता मुसळधार पाणी पडू लागलं. पाहता पाहता रस्ते रिकामे झाले... लोक इकडेतिकडे फुटपाथवर दाटी करू लागले. अशा वेळी फुटपाथवरून दाटीवाटीनं जायचं... सगळ्यांच्या नजरेसमोरून जायचं... अशा घाईत जणू काही आपल्यालाच फार महत्त्वाचं काम आहे आणि बाकीचे मात्र सगळे व्यवहार थांबवून पाऊस थांबण्याची वाट पाहू शकतात.

अलीकडे काही दिवसांपासून तिचे कशातही लक्ष दिसत नाही. मागच्या वेळी सिनेमाला गेलो होतो तर मधूनच उठून जायचं म्हणून घाई करायला लागली.

''चल, बाहेर जाऊ. इथं बसून निष्कारण आपण मूर्खासारखा दुसऱ्यांचा तमाशा काय पाहत राहिलो आहोत ?'' ती त्याचा हात धरून उभी राहिली होती आणि अंधार कापीत बाहेर पडली होती.

बाहेर येऊन 'कॅफे'मधल्या काउंटरवर एक ग्लास पाणी पिऊन जिना उतरता उतरता ती म्हणाली, ''आपली एकमेकांना असलेली गरज आता कमी झाली आहे असं नाही तुला वाटत ?... म्हणून तर जवळ असूनही आपण दुसऱ्यांचा तमाशा पाहत बसतो... आणि तसं नसेल तर मग एकमेकांसमोर बसून जगण्यासाठी बळ का नाही मिळवत आहोत ?'' ती खूप गंभीर आणि आपल्याच नादात होती.

काही क्षण तो दिग्मूढ झाला... एकदम रिकामा. दुसरा एखादा क्षण असता तर तो तिला खूप टाकून बोलला असता; पण अशा प्रकारची उग्र प्रतिक्रिया त्याच्या मनात निर्माण झाली नाही. काही विचार करून म्हणाला, ''नेहमी वेड्यावाकड्या गोष्टीच तुझ्या डोक्यात का येतात ?''

''तुला वेड्यावाकड्या वाटतात या गोष्टी ?... धोका आपल्यामधून निर्माण होतो आहे हे पण तुला ठाऊक नाही...''

यानंतर तिचं चित्त थाऱ्यावर नव्हतं. कधीकधी अचानक त्याला असे वाटू लागते की आपण नदीच्या डोक्याचे गणित विसरून गेलो आहोत... तिचे चित्त थाऱ्यावर नसणे किंवा असणे हे बिंदू आपल्याला गवसत नाहीत. समोर तरंगत असलेल्या लाकडाच्या तुकड्यासारखा दूर होत जाण्याचा अनुभव देते आहे ती... का नाही आपण पुढे झेपावून साधिकार तिला थांबवत... तिला आवडेल... निश्चिंत होईल ती... मग तो असं का करू शकत नाही ?

तिच्या मुठीत तो कसलंच भविष्य ठेवीत नाही... म्हणून ?

केवळ क्षण स्वत: मूल्यवान असतो हे एखाद्या स्त्रीला समजावून सांगणं कदाचित फार कठीण असावं... वर्तमानाच्या किंवा भविष्याच्या आकाराशिवायही.... संपूर्णतेनं जगण्याची ही चमक मूल्यवान असते... घर आणि अधिकार यांच्या चौकटीतच ती मिळावी असा आग्रह का ?

पण स्त्री, प्रेम म्हणजे एक घर, एक समाज, एक सुरक्षितपणा, मुलांच्या हसण्या-खेळण्याने बहरलेले एक अंगण, असे समजते.

ह्या समीकरणाला तो काय करणार ?

पाऊस जोरात पडू लागला होता... आता विजाही चमकू लागल्या. अंधारून आलं. घरून निघताना त्याने रेनकोट घेतला नव्हता. आज सकाळी दिवस कसा स्वच्छ मोकळा वाटत होता.

तो ज्या ठिकाणी येऊन उभा राहिला ते घड्याळाचे दुकान होते. या रिकाम्या वेळात घड्याळाचा पट्टा का बदलून घेऊ नये असा विचार त्याच्या मनात आला.

त्याने आपल्या हातावर बांधलेल्या घड्याळाचा पट्टा थोडा ओढून पाहिला... आज नाही तर उद्या... लवकरच तो बदलायला हवा... नाहीतर नकळत घड्याळ पडून जायचं.

या विचाराने तो दुकानात शिरला. काउंटरवर आधीपासूनच दोनतीन माणसं उभी होती. एकजण कुठल्यातरी बाबीवर मालकाशी वादावादी करीत होता.

जे स्थगित होऊ शकते—उदाहरणार्थ या पट्ट्याचे एक आठवड्याचे आयुष्य—ते आता यावेळी करण्यात एक विशेष प्रकारचा अपव्यय आहे असे त्याला वाटले... त्याच वेळी असेही वाटले की दुबळ्या गोष्टी सांभाळायच्या म्हणजे किती सावधगिरी बाळगावी लागते... मग त्या गोष्टी असोत नाहीतर संबंध असोत... हे सांभाळणं कधीकधी सुखापेक्षा जबाबदारीचीच जाणीव देऊ लागतं.

त्याने हातातून घड्याळ काढून काउंटरवरच्या माणसाकडे सोपवले आणि म्हणाला, ''साहेब, जरा लवकर, घाई आहे...'' आणि दुकानाच्या प्रवेशद्वारात येऊन बाहेर पाहू लागला.

अशा प्रकारच्या अलिप्तपणातून आपल्यामधले क्षीण झालेले प्रत्येक सूत्र तोडून पुनर्जीवित करण्याची हिंमत मिळवू शकतो का आपण ?

असं का नाही होऊ शकत ? प्रत्येक क्षणाचा सामना आपल्या उत्कट वर्तमानकाळात का नाही होऊ शकत ?... घड्याळाचा पट्टा नवा होता तेव्हा नवा होता... आता जुना झाला तर जुना झाला... आणि जुन्या गोष्टींबद्दल तेवढेच प्रेम नाही राहत... ही गोष्ट कपड्यांबद्दल, वस्तूंबद्दल केली तर तेवढं वाईट नाही वाटत... माणसांच्या, संबंधांच्या बाबतीत म्हटले तर मात्र किती नकोशी आणि क्षुद्र वाटू लागते... माणसांना आणि संबंधांना जडतेच्या नियमांच्या हवाली करून आपण अधिक आनंदी का होतो ?

एक क्षणभर त्याच्या मनात आलं की आज नंदी आली म्हणजे तिला मोकळेपणाने सांगून टाकावं. अशा दुर्बळ, क्षीण झालेल्या गोष्टी सांभाळण्याचा ताण सहन करण्यापेक्षा चांगली आहे मु... मुक्ती... मुक्ती...

नाही, नाही...

नाही. अशी काही सुरवात त्याला करायची नाहीय. कारण अशा कारणासाठी केलेल्या सुरवातीमागचा तर्क त्याला कधीच समजावून सांगता येणार नाही.

"घ्या साहेब," दुकानदाराने त्याची समाधी भंग केली... तो वळला. पैसे दिले आणि तो बाहेर पडला.

बाहेर आल्याबरोबर नंदी भेटणार अशी यावेळी त्याला पूर्ण खात्री होती. दुकानाच्या पायऱ्या उतरत असतानाच त्याने अपेक्षेनं इकडेतिकडे पाहिलं... त्याचा धीर सुटला आणि त्या भावनेचे एक काहूर त्याच्या मनात निर्माण झाले.

"घरी परत का जाऊ नये ?" त्याने स्वत:लाच सुचवले. या सुचवल्यामुळे त्याला थोडासा आनंद वाटला. ती येईल आणि तिला त्रास होईल या विचाराने त्याला बरे वाटले... आपण आतापर्यंत परत गेलेलो असू या विचाराने ती कदाचित येणारही नाही.

आपण येथे असे उभे राहिलेलो आहोत हे त्याला अचानक मूर्खपणाचे वाटू लागले. खिशातून स्कूटरची किल्ली काढून तो ती हातात फिरवीत राहिला. पाऊस जरा कमी झाला म्हणजे जावे असा विचार त्याने केला.

परत फिरण्याच्या विचाराने त्याला समाधान निश्चितच वाटले; पण प्रतीक्षा वैतागाचे रूप धारण करू लागली. 'उद्या सकाळी सकाळीच तिचा फोन येईल... हे कारण होतं किंवा... ते कारण होतं... आपण स्पष्टच म्हणायचं... काय म्हणायचं... आपण काहीच म्हणू शकणार नाही... काही हरकत नाही.' असे म्हणून आपल्या औदार्याचा एक दोर आपण तिच्याकडे फेकू आणखी एक इंच आणि तिला आपल्या ताब्यात ठेवायचा प्रयत्न करू.

कब्जात ठेवायची गोष्ट कधी बोललो तर ती म्हणेल, "आता कसला कब्जा... आता एकमेकांचे होताना मनाची क्लायमेट बदलत नाही... एकमेकांबद्दल विचार करण्यापेक्षा आता आपण स्वत:बद्दलच जास्त विचार करतो आहोत."

"स्वत:बद्दलच विचार करतो आहोत, तर मग दुसऱ्याचा विचार करण्याचे नाटक करण्याची तरी गरज काय आहे ?" आज असेच काहीतरी एकदम म्हणायचे आपण नंदीला.

एक नवे स्फुरण आणि स्वातंत्र्य त्याने मनोमन अनुभवले.

त्याला वाटले तिने आता यावे... ह्या वेळी... बोलायचे धैर्य लाभलेल्या या क्षणी— तर बरे होईल... उद्यापर्यंत मध्यंतरी एक नपुंसक दिवस मध्ये निघून जाईल आणि हे ताणलेले इलॅस्टिक पुन्हा मूळपदावर येईल. मग काहीच सांगता येणार नाही.

पण तिचा काहीच पत्ता नव्हता. अचानक त्याला आठवले की पूर्वी जेव्हा कधी क्वचित ती आली नव्हती तेव्हा त्याचे एकच कारण होते— तिच्या विवाहाचा प्रसंग ! काही लोक तिला पहायला आले होते.

कदाचित आजही तसेच घडले असेल... नक्की हेच असणार... मी फोन केल्यानंतर तिच्या वडिलांचा फोन आला असणार... आणि ती मिठाई, खारे यांचे पुडे घेऊन घरी गेली असणार.

आतापर्यंत आपण या लहानशा गोष्टीचं अनुमान का नाही करू शकलो ?.. आता बहुधा ती येणार नाही. उद्या सरळ सपाट शब्दात सांगेल की समोरच्या लोकांना मी कसे स्पष्टपणे 'नाही' म्हणून सांगितले ते. चार भिंतींच्या घराची अशी उत्कट इच्छा आणि पुन्हा पुन्हा हे असले विवेकशून्य 'नाही...'

''का पुन्हा पुन्हा 'नाही' म्हणतेस... घर पण हवंय तुला आणि... स्वतःचं आयुष्य का खराब करून घेते आहेस...?''

''प्रश्न माझ्याच आयुष्याचा आहे ना... तू तर ज्या ठिकाणी उभा आहेस तिथेच असणार आहेस... मुद्दा माझ्या मुव्हमेंटचा आहे, मी तुझ्याबरोबर उभं राहावं किंवा निघून जावं... निर्णय मलाच घ्यायचा आहे. मग मला पाहिजे तेव्हा घेईन...''

आणि ती कधीच निर्णय घ्यायची नाही... तिने निर्णय घेतला तर त्याला समाधान वाटेल. नंदीला घर हवं होतं, आपण तिला ते निवडू दिलं.

ती असं करीत नाही. कदाचित तीही आपल्या औदार्याचं जाळं त्याच्यावर टाकत असावी त्याच्यामुळे, त्याच ठिकाणी ती त्याचबरोबर उभी आहे. आपली इच्छा असूनही दुसरे काही स्वीकार करायला तयार नाही.

आपण स्वतःच तिला 'नाही' म्हणून का म्हणत नाही...? का हालचाल करीत नाही ?... का निर्णय घेत नाही ?... त्याने असे केले तर आपल्या वडिलांनी सुचवलेल्या कोणत्याही स्थळाला ती मान्यता देईल.

निवडू दे तिला, भिंतींचं घर...

कोणत्याही दृष्टिकोणातून त्याने सुरुवात केली तरी हात आखडून घेण्याची सुरुवात त्यानेच केली आहे. या आरोपातून तो वाचू शकत नव्हता.

त्याने माघार घेतली आहे हे तिला जाणवून द्यायचे नव्हते. जाणवून त्यालाही द्यायचे नव्हते. खोट्या सौजन्यापोटी, भिडेपोटी आपापसात निर्माण झालेल्या ताणाच्या तोलात दोघेही बहुधा परस्परांना आहे त्या स्थितीत ठेवू पाहत होते.

थोड्या जास्तच वेगाने तो फुटपाथवर फिरू लागला. वाट पाहतो आहे हे तो विसरून गेला. दुकानांची दारे धडाधड बंद होऊ लागली तेव्हा तो भानावर आला.

त्या दोघांना बहुधा काहीच करता येणार नाही. गतकाळातील प्रगाढ, उबदार दिवसांच्या आठवणी समोर ठेवून त्याची चालू रंग उडालेल्या वर्तमानाशी तुलना करीत रडत राहतील... मोडून पडतील... गप्प बसतील.

हा थंड आलेला एक दिवस निघून जाईल... आपोआप... निर्णयाशिवाय... काही

केल्याशिवाय... निष्ठा नसल्याच्या आरोपाशिवाय दोघेही आपापल्या भूमीवर उभे राहतील... सुरक्षित. त्या दोघांच्या तळव्यात आपला तळवा असा गुंतवल्याबद्दल... काळाला शिव्या देतील.

अशा ओल्या पावसात काळाच्या छत्रीखाली त्याने क्षणभर स्वत:चा सुरक्षितपणा अनुभवला. पूर्णपणे निर्द्वंद्व.

पुस्तकांचं दुकान अजून बंद झालेलं नव्हतं. तो त्यात शिरला. एक पुस्तक विकत घेतले, दोन प्लेट चाट घेऊन खाल्ले. बास. आता त्याला घरी जायचे होते.

# पुढच्या मोहरमची तयारी

रमेश बक्षी

दार उघडलं की त्यांच्या घरी जाऊन पाचएक मिनिटं बसून यावं असा विचार करतो आहे. पण अजून संध्याकाळचे आठ-साडेआठ वाजताहेत तोच हे दारं बंद करून झोपी जातात म्हणजे आश्चर्यच आहे ! तसं नसावं, हे आपलं मला वाटतंय. झोपतात थोडेच. आत जेवणबिवण करीत असतील म्हणून बाहेरचा दरवाजा ओढून घेतला असेल. नाहीतर ह्या असल्या गोंधळात कुणाला तरी झोप येईल का ? पण त्या बिचाऱ्यांचा ह्या वाजवण्याबिजवण्याशी आणि मिरवणुकीशी काय संबंध ? दुःखात बुडालेल्यांचं एक वेगळंच जग असतं. त्यांच्या कानात सनई वाजवली तरी त्यांना ऐकू जाणार नाही. उशीवर डोकं ठेवून पडलो होतो. उठून बसलो. अंगणात झोपलो होतो ना. वारा मंद वाहतो आहे आणि माझं विचार करणं हे अंगाई ऐकण्यासारखं आहे. विचार करायला सुरवात करायचा अवकाश, झोप आलीच म्हणून समजा.

ह्या वेळी काहीकाही जण करबल्याहून परत येत आहेत. मुलांची तर मजाच आहे. त्या दोन पोरांनी पिपाण्या विकत आणल्या आहेत आणि वाजवताहेत सारखी. तो ढेरपोट्या पोरगा आपल्या चड्डीच्या खिशातून रेवड्या काढून खातोय् एकसारखा. ही पोरगी किती गोड आहे. वय असेल फार तर सातएक वर्षांचं. पण कपडे वीस वर्षांच्या पोरीसारखे. कळीदार सुरवार, गुडघ्याच्या खाली येणारा कुडता आणि जरीकाम केलेली ओढणी. डोक्यावर जर चमचमतेय. तिची आवड पण मोठी विलक्षण आहे. कामटीवर नाचणारं माकड विकत घेतलंय आणि रस्त्यानं चालता चालता माकड नाचवतेय. मध्येच ठेच लागते आहे आणि बरोबरीच्या लोकांच्या मागे राहून जाते आहे. ह्या मुलांना पाहून त्यांना फार दुःख झाले असते. बरं आहे त्यांचं दार बंद आहे ते. पण जरा वेळाने दार उघडतील तेव्हा जाऊन येईन त्यांच्या घरी. गेलोही नसतो पण आज सकाळी त्यांचे चेहरे पाहिले तेव्हापासून मनाची जणू आसवं झाली आहेत.

ह्या बुशशर्टवाल्या माणसाचं तरी पहा कसं आहे. दरवर्षी त्याच्या चेहऱ्यावर एखादीतरी नवी सुरकुती येतेच. त्याचं लग्न झालं तेव्हापासून ओळखतो मी. ही खोली भाड्याने घेऊन मला तीन नाहीतर साडेतीन वर्षं झाली असतील. मी या खोलीला कुलूप

घातलं तेव्हाच याचं लग्न झालं. कंपनीचा एजंट आहे ना मी, त्यामुळे कधी आठवड्याने कधी पंधरवड्याने तर कधी महिन्या-तीन महिन्यांनी येथे येतो. या खोलीचं भाडं सात रुपये आहे म्हणून आपल्या नावावर ठेवलीय अडकवून. डोकं टेकायला जागा तर झाली. नाही तर ह्या शहरातल्या धर्मशाळा आणि हॉटेलेही भरलेलीच असतात. हे घर म्हणजे एक चाळ आहे. वीसएक भाडेकरू राहात असावेत. पण सगळेजण मला ओळखतात. कारण जेव्हा कधी मी येतो तेव्हा सर्वांना कंपनीचे कॅलेंडर देऊन जातो. समोर चाचा राहतात. दर वर्षी तेच सरकारी ताबूत बनवतात. एके काळी चाळीस खणी ताबूत बनत असे. शहरातले शेकडो खांदे तो उचलत असत आणि त्याचा दोर अर्ध्या फर्लांगापर्यंत असायचा. लोकांची मनंही लहान होत गेली आणि ताबुताचे खणही लहान होत गेले. पूर्वी इमामबाड्यात वर्षभर धूमधाम चालत असे. पण आता मेंदीच्या रात्रीपासून एक पंधरवडाभर आधी कागद कापायला सुरवात होते आणि तीन मोठ्या व चार लहान खणांचा ताबूत हां हां म्हणता तयार होतो. चाचाला मी जे कॅलेंडर देतो त्याचे चित्र कापून ते दर वर्षी ताबुतावर लावतात.

दार वाजते. मी उठतो. बूट घालतो. पण दरवाजा उघडत नाही. मी बूट घालूनच बिछान्यावर अर्धवट झोपतो. ह्या बुशर्टवाल्या माणसाला त्याचे लग्न झाले त्या पहिल्या वर्षी मी कॅलेंडर दिले होते तेव्हा तो फार खुश झाला होता. कॅलेंडरवर एका लहान मुलाचे चित्र होते आणि त्याच्या बायकोला दिवस गेले होते. एके दिवशी त्याची बायको मला दिसली होती. भरलेले शरीर, तकतकीत गोरा रंग आणि आई होण्याच्या आधीचे गांभीर्य तिच्या चेहऱ्यावर पसरलेले होते. पशुपक्ष्यांच्या माद्या आई व्हायच्या आधी खूप उत्साही आणि चपळ दिसतात. कारण त्यांना गुहेची, घरट्याची व्यवस्था करायची असते. पण त्याच दशेत असणाऱ्या बायका मात्र का कोण जाणे आळशी दिसतात. बुशशर्टवाल्या माणसाच्या भरल्या देहाच्या बायकोच्या चेहऱ्यावरच नव्हे, तर सगळ्या शरीरावरच असला आळशीपणा पसरलेला होता... आणि तिच्या चेहऱ्यावर मला नेहमीच हा भाव दिसायचा. मला वाटायचं की वर्षातून हिला एक मूल होत असेल तर निदान तीन महिने तरी तिची अवस्था चांगली असायला हरकत नाही; पण त्या तीन महिन्यात ती स्वतःच्या नाही तर मुलाच्या आजारपणात इतकी बुडलेली असायची की कधी दृष्टीलाच पडायची नाही... पण यावेळी ती तशी दिसली नाही... पण मूलही दोन-अडीच महिन्यांचेच झाले असावे.

दार पुन्हा वाजले. मी तिकडे डोकावून पाहिले. आत कंदील पेटलेला होता आणि वाऱ्याच्या झोतामुळे कडी पुन्हापुन्हा वाजत असावी म्हणून दार उघडल्याचा भ्रम होत होता. असेलही... आज नाही तर उद्या जाईन. कारण उद्याही मला थांबायचे आहे.असेच दोन वर्षापूर्वी मी येथे चार दिवस थांबलो होतो. तेव्हा बुशशर्टवाल्या माणसाच्या घरातून बारशाची गाणी ऐकू आली होती आणि त्याने एक पेढा आणून

देऊन माझं तोंड गोड केलं होतं. पुन्हा परत गेलो तेव्हा कळलं की ते मूल गेलं. बुशशर्टवाल्यानं कोणत्या रोगाचं नाव सांगितलं होतं कोणास ठाऊक. डॉक्टरांनी आईचं दूध तोडायला सांगितलं आणि डब्याचं दूध पोराला पचलं नाही. ते वाळतच गेलं. त्याचं शरीर वाळून काट्यासारखं झालं. औषधपाणी करायला मागंपुढं पाहिलं नाही म्हणून सांगत होता. बायकोच्या बांगड्यादेखील गहाणापोटी ठेवल्या पण मूल वाचलं नाही. मी दीड महिन्याने परत आलो तेव्हा त्याच्या भरल्या देहाच्या बायकोला पुन्हा दिवस गेले होते. चेहऱ्यावर आळस सांडलेला होता आणि साडीच्या निऱ्या तिच्या अंगावर चहाच्या किटलीसारखी आकृती बनवत होत्या. मग माझ्या तीन-चार खेपा झाल्यानंतर तो बुशर्टवाला एका पोरीचा बाप झाला. त्याने पोरीचं नावच ठेवले नाही. मी त्याची सहा महिन्यांची पोर पाहिली. बाळसेदार शरीर, सुंदर मुखाकृती. त्याच वेळी मी तिच्या आईलाही पाहिले. ती पुन्हा त्याच अवस्थेत होती. भरलेलं शरीर, दिवस गेलेले, चेहऱ्यावर आळसाच्या रेषा आणि निऱ्यांची वर्तुळाकृती.

पंधरवड्यानंतर मी आलो आणि त्याला कॅलेंडर देण्यासाठी गेलो तेव्हा विचारले, ''तुमची बेबी कुठे आहे ?''

तो काहीच बोलला नाही. मी पुन्हा विचारले तेव्हा 'मेली' असं म्हणून तो आत गेला. सांगायला बरं वाटत नाही. मला फार वाईट वाटले.

चाचांना विचारले तर ते म्हणाले, ''त्याच्या बायकोच्या दुधात काहीतरी दोष आहे. त्याची पोरगी चांगली ठीक होती. पण एकदमच वाळली आणि गेली.'' चाचा म्हणाले, ''या वेळी इमाम हुसेनला नवस केलाय. चारएक रुपयांचा ताबूत तयार करून त्याच्याकडून रेवड्या वाटायला लावायच्या आहेत.''

आता तर दरवाजा उघडला. कोण आहे हे ? बुशशर्टवालाच दिसतो आहे. पण हा तर मोठ्या आनंदात दिसतोय... दोन-अडीच महिन्यांपूर्वी याच्या घरात तिसरं मूल जन्माला आलं तेव्हा असाच आनंदी दिसत होता. त्या पोराच्या जन्माचा आनंद तर त्याच्या चेहऱ्यावर दिसत होता; पण तो मला म्हणाला होता, ''या वेळी आम्ही काही साजरं करणार नाही आहोत; कारण मुलाला दृष्ट लागायला नको.''

मी सहानुभूतीने त्याच्या खांद्यावर हात ठेवले होते आणि नवीन छापलेल्या कॅलेंडरचे आणखी एक डिझाइन त्याला द्यावे असे मला वाटले होते. फक्त याच वेळी त्याच्या बायकोला दिवस गेलेले नव्हते असे माझ्या ध्यानात आले. बायकोच्या तब्येतीची काळजी घे असा प्रामाणिक सल्ला त्याला द्यावा असे मला का वाटले कुणास ठाऊक. माझंच उदाहरण मी त्याला सांगणार होतो. तीन पोरांचा बाप झाल्याबरोबर मी डॉक्टरांचा सल्ला ऐकला होता. पण मी काहीच बोललो नाही; कारण दारात त्याची बायको उभी असलेली दिसत होती आणि तिच्या निऱ्या पायाच्या अंगठ्यापासून वर सरळ रेषेत गेलेल्या दिसत होत्या. तो मला म्हणाला, ''माझ्या बायकोशिवाय मला आयुष्यात दुसरं कुणी नाही.''

मी चेष्टेत म्हणालो होतो, ''आणि दरवर्षी येणाऱ्या पोरांच्याबद्दल का नाही बोलत ?'' ह्या प्रश्नामुळे तो गरजेपेक्षाही जास्त गंभीर झाला होता. त्याच्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्या वाखाच्या भिजवलेल्या दोरीसारख्या दु:खानं घट्ट झाल्या होत्या. तो म्हणाला, ''दरवर्षी येणाऱ्या मुलांना मी कसं काय अडवू ? नाही अडवू शकत. कारण त्या जाणाऱ्या मुलांचं दु:खही मला विसरायचं असतं.'' मी यावर काहीच बोललो नाही.

पहा, ह्या माणसाच्या घरी मी जाणार होतो तर ह्या सद्‌गृहस्थाने पुन्हा दार बंद करून घेतले. वाटलं तर माझ्या आणि त्याच्या खोलीला जोडणाऱ्या नेहमी बंद असलेल्या दरवाजाच्या फटीतून तो काय करतो आहे हे मी पाहू शकतो ! पण असं करणं म्हणजे एखाद्याच्या दु:खाची चेष्टा करणं होईल. मी कंपनीचा एजंट असलो म्हणून काय झालं ? एखाद्याच्या दु:खाकडे संशयास्पद दृष्टीने पाहून त्याच्या तीव्रतेविषयी मी अविश्वास नाही प्रकट करणार. मी पुन्हा बिछान्यावर येऊन अर्धवटपणे पडतो. या वेळी येथे बरेच राहाणे झाले. कोणत्याही परिस्थितीत परवा परत जायला हवे. हेड ऑफिसात सगळा अकाउंट द्यायचा आहे आणि ऑर्डरीही सप्लाय करायच्या आहेत. हे दिवस छान मजेत गेले. मेंदीच्या रात्री तर असं वाटलं की आपणही गायला लागावं. इमामबाड्यात खूप रोषणाई केलेली होती. ताबुताचे खण चमचम चमचम करीत होते. गुग्गुळाचा धूप सगळीकडे पसरला होता. या वेळी रेवड्या पण खूप खाल्ल्या आणि चाचाबरोबर रात्रभर जागरणं पण केली. काल ढग भरून आले होते. बुशशर्टवाल्या गृहस्थाचं पोर गेलं महिनाभर रँव रँव करीत होतं. मागच्या पोरासारखंच हे पण वाळून गेलं होतं आणि कत्तलीच्या रात्री ते पण गेलं. एखाद्या सिनेमात एकापाठोपाठ एक मृत्यू दाखवले जातात तेव्हा अशा अस्वाभाविक गोष्टी लिहिणाऱ्याला मी शिव्या देत असे; पण प्रत्यक्ष जीवनातच असं घडताना पाहतो आहे तर आता कुठल्या कथाकाराला शिव्या देऊ ? या क्षणी मला सगळं जग मान खाली घालून ओझं वाहणाऱ्या गाढवासारखं वाटायला लागतं. मी गावात गेलो होतो. परत आलो तेव्हा बुशशर्टवाल्या गृहस्थांचे तिसरे मूलही गेल्याचे कळले. दिवसा वाटलं, की त्याच्या घरी जावं.

आता मला फुरसत आहे, त्याच्या घरी जाऊ शकतो; पण त्याने तर दरवाजा बंद केला आहे. दोघं बिचारी डोक्याला डोकं लावून रडत बसली असतील. काल रात्री त्याच्या भरल्या शरीराच्या बायकोचं रडणं मी ऐकलं होतं. तिकडे इमामबाड्यात 'शामे गरीबाँ' (उदास सायंकाळ) या विषयावर भाषण चालली होती. मर्सिये (विलापिका) म्हटले जात होते. लोक नौहख्वानी (मोहरममधील मृतकांसाठी विलाप) मध्ये उदास होऊन गेले होते. मोहरमच्या शोकार्त गाण्यात बुडून गेले होते. आणि इकडे हे दोघेजण आपल्या फुलासारख्या मुलाच्या आठवणीने दु:खी झाले होते. ती दोघे फार संत्रस्त असतील. मला त्यांच्याकडे जायला पाहिजे. मी उठतो. इमामबाड्याच्या उजेडात बसून चाचा बांबू तासत बसलेले दिसतात.

मी विचारतो, ''मोहरम तर पार पडला ना चाचा, आता इतक्या रात्री बांबू कसले ताशीत बसला आहात ?''

मला बसायला सांगत ते म्हणाले, ''पुढच्या मोहरमसाठी बांबू तासतो आहे. पूर्वी सरकारी ताबूत बसायचे तेव्हा आम्ही असेच करीत असू. करबल्याहून परत आलो की पुढच्या मोहरमच्या तयारीला लागायचो. आता फक्त एक बांबू तासून ठेवतो...'' मी त्यांचे बोलणे ऐकत राहतो पण झोप डोळ्यावर येत आहे म्हणून उठतो.

बिछान्यावर पडता पडता वाटते की आता सकाळीच पाचएक मिनिटे जाऊन येऊ. तेवढ्यात बुशशर्टवाल्या गृहस्थांच्या घरातून विचित्र आवाज ऐकू येऊ लागतात. मुलाच्या आठवणीने बिचाऱ्या आईला वेड लागू नये म्हणजे झाले ! मी उठून आत जातो. त्याच्या आणि माझ्या खोलीला जोडणाऱ्या दरवाजाच्या फटीतून पाहतो. जे काही दिसते ते पाहून त्या फटीपासून बाजूला होतो. त्याची बायको बोलत असलेले ऐकू येते, ''पहा, कोणीतरी आहे, दार वाजतंय.'' बुशशर्टवाला गृहस्थ काही उत्तर देत नाही. त्या फटीतून पुन्हा पाहावे असे मला वाटते; पण मी माझ्या मनाला आवर घालतो; कारण मी विवाहित गृहस्थ आहे. असल्या गोष्टींची मला आता जिज्ञासा राहिलेली नाही.

पत्नी पुन्हा म्हणते— ''पाहा कोणीतरी आहे, दार वाजतंय.''

बुशशर्टवाल्या गृहस्थाचा उद्विग्न आवाज ऐकू येतो, ''कोणी नाहीय. ते तर इमामबाड्याचे चाचा आहेत. पुढच्या मोहरमसाठी बांबू ताशीत बसले आहेत.''

# पाचवा पराठा

गिरिराज किशोर

बिट्टी मोठी आणि बिट्टू धाकटा. बिट्टी शाळेत जात जात आता तिसऱ्या इयत्तेत जाऊन पोहोचली आहे. कष्टाळू आहे, समजुतदार आहे. पण कधी कधी भानगड होते. बिट्टूला शाळेत घालायचे प्रयत्न दोन वर्षांपासून चालू आहेत. मागच्या वर्षीही जमले नाही. बाबांजवळ पैसेही नाहीत आणि बिट्टूला शाळेत प्रवेश मिळवून देईल, अशा कुणा माणसाची ओळखही नाही. आळीतल्या पंधरा-वीस घरमालकांनी बाबांना दरमहा पाच- पाच रुपयांवर रात्री पहारा देण्यासाठी ठेवले आहे. ते त्यांनाच जाऊन सांगतात. सगळेजण बघू म्हणतात. पण काहीच होत नाही. आधी बाबांची नोकरी एका गिरणीत होती. दोन वर्षे झाली सुटल्याला. आधी काही दिवस घरी बसवले होते. सर्वच कामगारांना बसवण्यात आले होते. बऱ्याच कामगारांना पुन्हा कामावर घेण्यात आले. बाबा अजून बाहेरच होते. बाबा कधीकधी फार कष्टी होतात. अरे, काम नाही म्हणून बसवलं तर समजू शकतो. असे वाटते की काम करणेच संकट झाले आहे. त्यांच्यासारखे जे बसले ते आजवर उठू शकले नाहीत.

आई आसपासच्या घरी कामाला जाते. सगळे मिळून तीस-चाळीस रुपये मिळतात आईला. ती आपल्या नशिबाचं रडगाणं गात असते. अडीच-तीन तास सकाळी काम करायचे, तेवढंच संध्याकाळी. मिळायचे तीस रुपडे ! माणसाच्या शरीराचे आणि कष्टाचे व्याजसुद्धा मिळत नाही. शरीरच मुळात मुद्दल नाहीतर व्याज कुठून मिळणार ?

बिटिया शाळेत जाते. तिला महिन्यातले तीस दिवस उपाशीपोटीच जावे लागते. एखादे वेळी बाबा ड्युटीवरून लवकर परत आले आणि चहा तयार झाला तर तिच्या पोटात चहा जायचा, नाही तर तोही नाही. तिच्या दुःखाचे हेच सगळ्यात मोठे कारण होते. तिला वाटायचं, दिवसभरात मिळालं नाही मिळालं तरी चालेल; पण शाळेत जाताना पोट भरलेलं असावं. शाळेत पोटात सारखं काव काव होत राहतं. लक्ष लागत नाही. गुरुजी बोलत असतात आणि तिचे लक्ष पोटातल्या कावकावकडे लागलेले असते. बाकीची मुले खाऊन येतातच, शिवाय पैसेही घेऊन येतात. मधल्या सुट्टीत ती खेळत बसते आणि मुले चटकमटक घेऊन खात असतात ते पाहत राहते. आधी तिला एक मित्र

होता. तो जे खायचा तेच तिलाही खायला द्यायचा. त्याच्या ह्या भावनेमुळे तिची आत्मीयता दाढली होती. एके दिवशी त्याने पैसे आणले नव्हते. मित्र तिला म्हणाला, ''आज तू खायला घाल.'' बिट्टी कुठून खायला घालणार ? नाहीच घालू शकली. मित्राने तिला टोमणा मारला, ''कधीतरी तू पण खायला घाल, का नुसताच खाबूपणा करशील ?'' तिला खूप रडू आलं. त्या मित्राने बिट्टीला पुन्हा बोलावलेही, पण ती गेली नाही. बसण्याची जागा पण बदलली. बोलचालही बंद झाल्यासारखी झाली. ही गोष्ट तिने घरी सांगितली नाही. पण आतल्या आत तिला खुपत राहिली.

त्या घटनेनंतर बिट्टी काही दिवस तरी गप्प बसली. एके दिवशी ती आईवर उखडली, ''सगळी मुलं घरून खाऊन येतात. तू आम्हाला खायलाही काही देत नाहीस आणि बरोबरही काही देत नाहीस. आम्ही काय करावं ? शाळेत भूक लागते. भुकेल्या पोटी अभ्यास होत नाही.'' बाबांबद्दल ती कधी काही बोलत नसे. त्या दिवशी बाबांचाही राग आला. ''बाबा गिरणीत कामाला का जात नाहीत ? गिरणीत कामाला जात होते तेव्हा खायला मिळत होते. सध्या घरीच बसून असतात. कानपुरात कितीतरी गिरण्या आहेत. सगळेजण कामाला जातात.'' आईला तिच्या या तोंड सोडून बोलण्याचा राग आला. तिने बिट्टीला खूप मारले. बिट्टी रडत रडत म्हणत होती, ''आई, माफ कर. पुन्हा नाही म्हणणार. उपासपोटी मरेन पण खायला मागणार नाही. कुणाला काही म्हणणार नाही. आई, चूक झाली माझी.'' आईने मारायची हौस फिटेपर्यंत तिला मारले.

मारहाण केल्यानंतर आईचे मन फारच कष्टी झाले. मुलीचा काय दोष होता ? पोर आहे तर भूक लागणारच. माणूस बाहेरच्या आगीचा ताप सहन करूही शकतो; पण आतली आग सहन होत नाही. बिट्टीचेही मन उतरले. आईने माया केली; पण ती नाही तर नाहीच बोलली. भाऊ तिच्या भोवती भोवती करीत राहिला; पण तिने त्याच्याकडे पाहिलेही नाही. गुदगुल्या करून तिचे लक्ष वेधून घेऊ लागला; पण बिट्टीने त्याला दूर ढकलून दिले. मुकाट्याने आपले शाळेचे काम करीत राहिली आणि सुमसुम होऊन बसली.

बिट्टी थोरली होती आणि आईच्या हातचा भरपूर मार तिने खाल्लेला होता. त्यामुळे आईचे मन तिच्यात अडकून पडले होते. आईला त्याच दिवशी एका घरचा दहा रुपये पगार मिळाला होता. रुपये मिळताच तिला बिट्टीची आठवण झाली. तिला पराठे खूप आवडायचे. थोडा वेळ तिच्या मनात ऊहापोह चालू राहिला. पराठे करायचे म्हणजे बऱ्याच दिवसांची भाकर, पराठेच खाऊन टाकतील; पण पोरीचा चेहरा पुन्हापुन्हा तिच्या डोळ्यांपुढे येत राहिला. तिचा हसरा चेहरा दिसावा यासाठी ती खूप उतावीळ झालेली होती. एखादी गोष्ट बिट्टीला लागली म्हणजे फारच लागते. लवकर जात नाही तिच्या मनातून. बिट्टीला हसतमुख पाहण्याचा तिच्या दृष्टीने एकच मार्ग होता. तिने गुपचूप पराठे करायचे ठरवले. पराठ्यांमुळेच तिच्या मुखावरचे हास्य परत येईल. एक वाटीभर

सुटा डालडा विकत घेतला. त्यात दीड रुपया गेला. तिचे हृदय थोडेसे कळवळले. तिला बटाट्याची कोरडी भाजी आवडायची.पण तिने पातळ भाजी करायचे ठरवले. चार बटाटे विकत घेतले. मोठेमोठे होते. त्यात जवळजवळ आठ आणे गेले. पीठ विकत घेतले. दहा रुपयातले फक्त दोन रुपये शिल्लक उरले. सगळे पीठ पराठ्यात घालवायचे नाही, थोडेसे शिल्लक ठेवायचे असे तिने ठरवले.

एवढ्याशा गोष्टीसाठी आपण महिन्याभराचा पगार जवळपास उडवून टाकला ही गोष्ट खरेदी वगैरे झाल्यानंतर तिला बोचू लागली. पण आपल्या या विचारांची दारे तिने जोरात बंद करून टाकली आणि ती पुन्हा उघडू नयेत म्हणून त्यांना पाठ टेकून उभी राहिली. तरीसुद्धा कोणीतरी तिच्या कानात कुजबुजत होतंच. एका वेळच्या खाण्यासाठी आठ रुपये ! तुझं डोकं तर बिघडलं नाही ना. ही कुजबूज ऐकू येऊ नये म्हणून तिने कानात कापसाचे बोळे घालायचे ठरवले. मग दुसरीच गोष्ट तिला सतावू लागली. गरिबांनी मुलांचं कोडकौतुक करू नये. ते पाप आहे. आपण आपला आणि त्यांचा दोघांचाही अपराध करतो. या गोष्टीकडेही तिने तोंड फिरवले आणि झपाट्याने निघाली. जाताजाता नवऱ्याच्या परिस्थितीबद्दल विचार करू लागली. किती धावपळ केली. किती पैसे खायला घातले. घरातल्या कितीतरी वस्तू गहाण ठेवाव्या लागल्या. असल्या कडकीत आपण भाकर खातो आणि भाकर आपल्याला खाते. पराठ्यांचं तोंड तर आणखीच मोठं असतं.

घरी जाऊन तिने मुकाट्याने पीठ मळले. भाजी केली. नावापुरतंच तूप घातलं. थोडे छान दिसतील. पराठे भाजत असतानाही अगदी थोडा तुपाचा हात लावला. आधी बिट्टीला हाक मारली. मग बिट्टूला बोलावले. बिट्टू आधी आला. बिट्टी थोडा भाव खात आली. एखादे वेळी आलीसुद्धा नसती; पण पराठे भाजताना जो वास सुटलेला होता त्याने तिला ओढून आणले. पराठे होत आहेत हे पाहून तिची नाराजी दूर झाली आणि तिची जागा स्मिताने घेतली. विहिरीत गळ टाकून पोहरा जसा बाहेर काढतात तसा पोरीच्या हसण्याने आईचा आनंदही बाहेर काढला. आईने पराठे भाजायचे थांबवले आणि तिला छातीशी धरले. मग काही न बोलताच पदराने डोळे पुसू लागली. बिट्टू हसतच राहिला. बिट्टीला चिडवत होता, ''ए बिट्टीताई, रोज आईकडून मार खात जा, मग आई तुला जवळ घेईल आणि आम्हाला पराठे खायला मिळतील.''

आईने हसत त्याला दटावले, ''गप बस. फार बोलायला लागलास.''

बिट्टी थोरली होती आणि शिवाय आईच्या हातचा तिने मारही खाल्ला होता म्हणून आईने पहिला पराठा बिट्टीलाच वाढला. हे पाहून बिट्टू चिडला. आणि बसल्या बसल्या रागाने पाय आपटू लागला. मोठमोठ्याने रडायलाही त्याने सुरवात केली. ''आम्हाला रोज मारते तर काहीसुद्धा करीत नाहीस अन आज ताईला एवढंसं मारलं तर लगेच तिच्यासाठी मात्र पराठे करतेस. सगळेजण ताईलाच विचारतात. आम्हाला कोणीच

विचारीत नाही. आम्ही म्हणजे कुणी नाही. आम्ही आधी आलो तरी पण पराठा आधी ताईलाच का दिला ?''

आई त्याला समजावत होती, ''तू तर माझा राजा बेटा आहेस. ताई काय आज आहे, उद्या जाईल तिच्या घरी. तू तर माझ्याजवळच राहणार. जाणाऱ्याला आधी नीट खायला-प्यायला घालून पाठवून द्यायचं असतं. ताई गेली म्हणजे आपण मायलेक रोज पराठे करून खाऊ.'' पण बिट्टू हट्टाला पेटला होता. घास घेण्यासाठी बिट्टीचा हात सारखा पराठ्याकडे जात होता आणि थांबत होता. तिचा चेहरा काळवंडू लागला होता आणि ती खजील होऊ लागली होती. शेवटी तिने आपला पराठा उचलून त्याच्या पानात टाकला आणि जोरात म्हणाली, ''घे खा, गिळ.''

बिट्टू लगेच रडायचा थांबला आणि पराठ्यावर तुटून पडला. खाता खाता तो बिट्टीकडे पाहत होता. त्याच्या डोळ्यात पाणी आलेलं होतं तरी पण तो हसत होता. पराठा करता करता आई तिला समजावत होती— ''याच्या वागण्याचं वाईट वाटून घेऊ नको. हा तर मुळातच बिघडलेला आहे. दिवसभर पोळासारखा भटकत असतो. ज्या दिवशी हा शाळेला जाईल त्या दिवशी सुटेन मी. बहिणीच्या तोंडात पाण्याचा घोट गेलेला देखील पाहवणार नाही असला जळूबाई आहे.'' बिट्टू खाण्यात आणि तोंडे वेडीवाकडी करून तिला चिडवण्यात दंग होता. आईच्या बोलण्याचा त्याच्यावर काडीमात्र परिणाम होत नव्हता. आईने दुसरा पराठा बिट्टीला वाढला. बिट्टीने डोळे पुसून खायला सुरवात केली.

बिट्टीने खायला सुरवात करायचा अवकाश बिट्टू लगेच म्हणाला, ''बिट्टी ताईला तू पराठे दे नाहीतर देऊ नकोस. मला पोटभर पराठे खायचे आहेत.''

आईचा चेहरा थोडा उतरला. आग पेटलेली होती. पराठे भाजताना खूप धूर निघत होता. आई आधी त्याच्याकडे पाहत राहिली. मग म्हणाली, ''जास्त पराठे खाल्ले म्हणजे पोट बिघडतं. जुलाब होतात. ज्यांना पराठे खायची सवय असते त्यांची गोष्ट वेगळी. पराठे आणि तेही गव्हाचे... पचवायला पोट कसं पोलादी हवं. फक्त दोन-दोन मिळतील. बाबांना पण खायचे आहेत ना !'' बिट्टीने आईकडे पाहिले आणि मान खाली घालून खाऊ लागली. बिट्टीने आपल्याकडे पाहिले आहे हे आईनेही पाहिले.

बिट्टीचा पहिला पराठा संपलेला होता. एक पराठा तव्यावर भाजून तयार होता. बिट्टूचा पराठाही संपत आला होता. एकदोन घास बाकी होते. आईने चटकन तयार झालेला पराठा बिट्टीच्या पानात टाकला. बिट्टी एकदम खुश झाली. थंड आहे का गरम आहे याची पर्वा न करता तिने झटकन तुकडा मोडला. बटाट्याच्या रश्श्यात भिजवला आणि खायला सुरवात केली. बिट्टूने ओरडाआरडा केला. ''पुन्हा बिट्टीताईला दिला. आमचा पण खाऊन झालाय.''

आईने त्याला झिडकारीत म्हटले—''कच्चाच देऊ का मग ? भाजून व्हायला नको

का ?'' पण तो बडबडत राहिला— ''आम्ही कुणालाच आवडत नाही तर मग आम्हाला देव का नाही बोलावून घेत ?''

आई मोठ्याने ओरडली, ''पुन्हा असं म्हटलास तर जिभेला चटका देईन या तापलेल्या चिमट्याने. देवाने बोलवावं म्हणून तर हाडाची काडं करून वाढवतेय ना तुला ?'' पराठा भाजून झाला होता तो त्याच्या पानात वाढला. आईच्या रागावण्याकडे लक्ष न देता बिट्टू पराठा खाऊ लागला.

आईची नजर पुन्हा पुन्हा पोरीकडे जात होती. अर्धा पराठा तर तिने भराभर खाल्ला होता. आता ती लहान लहान घास खात होती. तिच्या खाण्याच्या पद्धतीवरून ती पराठा पुरवून पुरवून बराच वेळ खाणार हे कळत होते. भाजी पण ती जास्त घेत नव्हती. भाजीच्या रस्स्यातच तुकडा बुडवून खात होती. बटाट्याच्या फोडीबरोबर पराठ्याचा तुकडा मधूनच खात होती. बिट्टू भरभर खात होता. आणखी एक पराठा खायचा त्याचा विचार दिसत होता. आई पुढचा पराठा ताईला वाढेल आणि मग आपल्याला काही मिळणार नाही अशी धास्ती त्याला वाटत होती. तेवढ्यात आईने एक पराठा भाजून ठेवला होता. दुसरा तव्यावर होता आणि तिसरा पोळपाटावर. पराठा संपवता संपवता बिट्टीने आईकडे पाहिले. आईने डोळे झाकले. बिट्टूने आपला पराठा संपवला आणि तो तिसऱ्या पराठ्यासाठी हट्ट करू लागला. आईच्या मनात गोंधळ उडाला होता. तरी पण ती त्याला समजावून पाहू लागली— ''पुरे, आता आणखी नाही.''

बिट्टू लहान होता आणि त्याला समजही कमी होती. त्यामुळे तो हट्टी पण होता. काहीही झाले तरी पराठा आपल्याला मिळायलाच पाहिजे अशी त्याची मागणी होती. आईचे लक्ष पुन: पुन्हा संपत चाललेल्या पिठा-तुपाकडे जात होते. पराठे-बिराठे करायचे म्हटले म्हणजे हीच तर अडचण असते. पोट भरले तरी इच्छा तृप्त होत नाही. आजच सगळं पीठ संपवलं तर उद्याची काय सोय होणार ? पुन्हा उधारी. ती म्हणाली, ''अरे पोरा, जिभेनं खाल्लं म्हणून पोटात का मावणार आहे ? जरा आपल्या पोटाचाही विचार कर.'' आईचे बोलणे बिट्टूला ऐकूही येत नव्हतं. शेवटी आईने पिठाचा एक लहानसा उंडा घेतला आणि त्याचा एक लहानसा पराठा करून त्याला घातला— ''माझा सानुला पोरगा त्याला सानुला पराठा.''

बिट्टीचे खाऊन झाले होते तरी पण ती बसली होती. वाटीत भाजी पण उरलेली होती. ती काहीच म्हणत नव्हती. आई सारखी चोरून तिच्याकडे पाहत होती. चार पराठे भाजून झाले होते. पाचवा लाटत होती. बिट्टूने तो पराठाही मटकावून टाकला होता. तो आईला आणखी एक पराठा मागू पाहत होता. आईने या वेळी मात्र कठोरपणे दटावले, ''जातोस का देऊ आता.''

मारण्यासाठी लाटणे उचलले तेव्हा तो तेथून धूम पळाला. बिट्टी हसली. आईला पण हसू आले. हळूच म्हणाली, ''मोठा बदमाश झालाय.'' मग हळूहळू सुस्त झाली

आणि दुखऱ्या स्वरात म्हणाली, ''आईबाप म्हणवून घेण्यात काय मोठेपण ? पोराबाळांना पोटभर भाकर पण देता येत नाही. वांझ असते तर निदान नाहीत झाली आपल्याला मुलं म्हणून समाधान तरी करून घेतलं असतं. अरे देवा, मुलं द्यायची तर त्यांना पराठ्यासारखी साधी गोष्ट देता येऊ नये अशी तरी पाळी आणू नको.'' आणि ती पदराने अश्रू पुसू लागली.

बिट्टी मुकाट्याने बसून आईकडे पाहत होती आणि तिचे बोलणेही ऐकत होती. पाचवा पराठा भाजून झाला होता. तो पण आईने डब्यात ठेवला तेव्हा बिट्टी हळूच म्हणाली, ''पीठ तर शिल्लक आहे. आणखी एक कर ना.''

आई थोडा वेळ तशीच पोळपाट लाटण्यावर हात ठेवून गप्प बसली. तवा नुसताच तापत होता. तूप लावलेले असल्यामुळे धुराचा लोट येत होता आणि आईच्या चेहऱ्यापार जात होता. बिट्टी आपण होऊनच म्हणाली, ''आता नाही खाणार, सकाळसाठी ठेवून देईन.''

''पोरांना न्याहरीला देऊन मग शाळेला धाडावे एवढे मोठे आपण नाही आहोत. दोन वेळेला पोटाला मिळालं तरी बास झालं. पुन्हा पुन्हा खाणारे लोक दुसऱ्यांच्या वाटचं खात असतात. आपलं आहे त्यात समाधान मानलं पाहिजे.''

पोरीचा चेहेरा उतरला. भाजीचं उरलेलं पाणी पिऊन टाकून ती उठू लागली. तिचे गुडघे तिला उठू देत नाहीत असे तिच्या उठण्याच्या पद्धतीवरून वाटत होते. आईने तिला उठताना पाहिले. उठून चालू लागली तेव्हा आईने हाक मारली, ''हे बघ,'' ती परत आली. आईने पाचवा पराठा उचलून तिला दिला. ''घे... बिट्टूला सांगू नकोस. वाटलं होतं, तुझ्या बाबांना पोटभर खायला घालावं... तसं त्यांना तरी आता कुठे जास्त जातेय. पाच कुठले खातात, चार खाल्ले तरी खूप झाले म्हणायचे.''

बिट्टी धावत धावत गेली आणि कागद घेऊन आली. त्यात तो पराठा बांधला. सगळेजण झोपायचे त्या खोलीत हलक्या पावलांनी गेली आणि पराठा लपवण्यासाठी जागा शोधू लागली. जमिनीवर बिछाने पसरलेले होते. बिछाने कसले, गोधड्याच होत्या. तिने सावधपणे सगळीकडे पाहिले. बिट्टू आसपास कुठे दिसत नव्हता. ती ज्या बाजूला झोपत असे त्या बाजूलाच तिने कागदात बांधलेला पराठा लपवून ठेवला. थोडा वेळ ती त्याच्यावर बसली. बसल्या बसल्याच पराठा अजून गरम आहे हे तिला कळले. उद्या सकाळी शाळेला जाताना खाऊन जायचे. गरम नाही राहिला तरी निदान मऊ तरी असेल. पराठा खाऊन जायचं म्हणजे किती गम्मत. कुणी म्हणालं की 'ये खा थोडंसं' तर आपण म्हणायचं की 'मी घरूनच खाऊन आले आहे.' मग थांबून स्वत:शीच पुटपुटली— 'अर्धा त्याच्यासाठी घेऊन जाईन. कधीतरी खायला घाल म्हणून चिडवत होता नाही का. पण अर्धाच काय घेऊन जायचा ! मग सबंधच घेऊन जावा.' तिने पुन्हा गोधडी उचलून पाहिले. कागदात गुंडाळलेला पराठा जसाच्या तसा होता. तिला आपले

मन आवरले नाही. तिने तो बाहेर काढला. कागद बाजूला करून पाहिले. मऊ झाला होता. एकदम काय वाटले कुणास ठाऊक, एका बाजूचा तुकडा मोडून तिने तो चटकन खाऊन टाकला. नुसतासुद्धा चविष्ट लागतोय. लोक उगीचच पराठा भाजीबरोबर खात असतात. उरलेला पराठा तिने लगेच कागदात गुंडाळला आणि पुन्हा ठेवून दिला. थोडा वेळ ती तशीच तोंड न हलवता मुकाट्याने बसून राहिली. मग हळूहळू तोंड हलवू लागली. बराच वेळ ती तशीच तोंड हलवीत राहिली.

बिट्टू आईकडे गेला होता. त्याला पुन्हा भूक लागली होती. आई त्याला रागावत होती. बाबा यायचे होते. बाबा संध्याकाळी लिमलेटच्या गोळ्या वगैरे वस्तू घेऊन रस्त्याच्या बाजूला पोते अंथरून विकत बसायचे. आठ-दहा आणे मिळाले तर मिळाले, नाही तर डबा आणि पोते घेऊन आठ वाजेपर्यंत घरी परत यायचे. बाबांच्या यायच्या वेळेला बिट्टी बाहेर येऊन उभी राहत असे. ते येताना दिसले की पुढे जाऊन त्यांच्या हातातले सामान घेत असे. त्या दिवशी बाबा थोडे लवकर आले. त्यामुळे ती बाहेर येऊन सामान घेऊ शकली नाही. बाबांनी आल्याबरोबर विचारले, ''आज बिट्टी कुठे गेली आहे का ?''

''नाही बाई !'' आई म्हणाली.

बाबा स्वत:च म्हणाले, ''मीच लवकर आलेलो दिसतोय.''

आई काहीच बोलली नाही, पण हसली.

बाबा हातपाय धुवू लागले. बिट्टीने चटकन पाट मांडला. ताट-वाटी, तांब्याभांडे ठेवले. मनात विचार करीत होती की बाबांनाही पराठे खूप आवडतात. पराठे पाहून बाबांना खूप आनंद होईल. गिरणीत काम करीत होते तेव्हा तीन-चार दिवसांनी नेहमी पराठे करवून घ्यायचे. लोणच्याबरोबर पराठे खायला त्यांना फार आवडायचे. पूर्वी आई लोणचंही घालायची. आता कधी तरी काम करते त्या घरी दोन-चार फोडी मागून आणते.

बाबा जेवायला बसले. आईने भाजी आणि पराठे वाढले तेव्हा तिच्या डोळ्यात आनंद दाटून आला होता. पण बाबा आपल्याकडे विझलेल्या डोळ्यांनी पाहत आहेत हे बघून तिचा सगळा आनंद दुपारनंतरच्या उन्हासारखा आटत गेला. बाबा हळूच म्हणाले, ''बिट्टीची आई, आज पराठे बनवलेस...!'' वाक्य अर्धवट सोडून ते जेवू लागले. खाता खाता म्हणाले, ''तूप बरंच लागलं असेल... हा पराठा लेकाचा फारच तूप पितो. पाण्यावर भाजता आला असता तर सगळ्यांना खायला मिळाला असता.'' थोड्या वेळाने बाबांनी विचारले, ''मुलांनी खाल्ला की नाही ?'' आईने मान हलवली.

जेवण संपत आलं तेव्हा आईने सांगायला सुरवात केली— ''आज बिट्टीला मारलं. तिची काही चूक नव्हती. मुलांना भूक लागली असली आणि खायला काही मिळालं नाही तर चिडणारच की ती. बोलली. काही तरी. बोलली कसली म्हणा, बोलवलं गेलं

म्हणायचं. मी मारलं तिला. खूप रडली बिचारी. रम्मीबाबूच्या सुनेने महिन्याचे दहा रुपये दिले होते. खूप नको म्हटलं मनात पण राहवलं नाही वाटलं, तुम्हाला पण आवडतात, बिट्टी आणि बिट्टू पण खूप आवडीने खातात. केली हिम्मत आणि जमवले कसे तरी.''

बाबा मुकाट्याने खात राहिले. त्यांनी चौथा पराठा पण घेतला. जेवण झाल्यावर उठले आणि हळूच म्हणाले, ''पाहू हे आजचे पराठे किती दिवस पुरताहेत ते.'' आणि मंदपणे हसले.

''तू नाही खाल्लेस ?'' हात धुवून बाबांनी विचारले.

''सकाळपासून पोट नाजूक झालंय म्हणून भात टाकलाय.''

बाबांनी आईकडे पाहिले आणि ते बाहेर गेले. बिट्टू झोपला होता. बिट्टी टकमक सगळं काही पाहत होती.

दुसऱ्या दिवशी बाबा पहाऱ्यावरून सकाळी जरा उशिरा परत आले होते. पहाऱ्याची वेळ तर खरी पाच-साडेपाच वाजेपर्यंतच होती. सध्या पाचलाच उजाडते. ज्या घरांचा पहारा देत, त्यापैकी कोणीतरी दूध आणून द्यायला सांगत असे. कोरी चहापत्ती आणायला पाठवायचा. या निमित्ताने बाबांनाही घोट, दोन घोट चहा मिळायचा. कधीकधी शिळंपाकं खायलाही द्यायचे. बाबा तिथे खात नसत. घरी घेऊन यायचे. घरकामं करण्यासाठी आईला सकाळी सहालाच बाहेर पडावे लागत असे. बिट्टी स्वत:च आपली तयारी करून शाळेला जायची. बिट्टू झोपलेला असायचा, नाही तर उठून बहिणीशी भांडत बसायचा— भूक लागलीय. बाबा वेळेवर आले तर चहाबिहा मिळायचा. नाही तर बिट्टी सात वाजेपर्यंत बिट्टूला घरात ठेवून शाळेला जायची. शाळेत जायला तिला आवडायचे. तिथे तिला मोकळेपणा वाटायचा.

बिट्टी सकाळी लवकर उठली. उठल्याबरोबर प्रथम तिने बिछाना बाजूला सारून पराठा पाहिला. कागदात गुंडाळलेला होता. तिने उघडून बिघडून पाहिला नाही. आहे ठेवलेला हे पाहून ती निश्चिंत झाली. परसाकडे गेली. परसाकडे जाण्यासाठी तिला थोडे लांब जावे लागत असे. सार्वजनिक संडासात सकाळी खूप गर्दी असायची म्हणून ती घाटावर जायची. बिट्टू तिथेच घरापाशी गटारीजवळ बसायचा. बिट्टी आता थोडी मोठी झाली होती. परत येऊन तिने लगबगीने आंघोळ केली. वह्यापुस्तके गोळा केली. आज आपल्याला खायला मिळो वा न मिळो, त्याला सबंध पराठा खायला लावायचाच या आपल्या निर्णयावर ती खुश होती. त्या दिवशी त्याने असे का म्हणावे मग ? तिने बिट्टूकडे पाहिले. डोळे मिटून तो झोपला होता. अगदी हळूच तिने बिछाना बाजूला सरकवला. पराठा नाहीसा झालेला होता. फक्त कागद पडलेला होता. तिला वाटले, कदाचित पराठा खाली सरकला असेल. म्हणून तिने सगळा बिछाना उलटापालटा करून पाहिला. पराठा खरोखरच नाहीसा झालेला होता. कुठे गेला असेल ? कोणी घेतला

असेल ? तिची दृष्टी बिट्टूकडे गेली. तो अर्धवट उघड्या डोळ्यांनी तिच्याकडे पाहत होता. ती पाहते आहे हे बघताच त्याने जोरात डोळे मिटून घेतले आणि गाढ झोपी गेला.

कोणी तरी आपल्याला विजेचा शॉक दिला आहे असे बिट्टीला वाटले. तिने विचारले, ''माझा पराठा तू खाल्लास ?''

त्याने झोपण्याचे नाटक चालू ठेवले.

ती त्याच्या जवळ गेली आणि जोरजोरात हलवू लागली. जणू काही आपण झोपेतच आहोत अशा नजरेने त्याने बिट्टीकडे पाहिले आणि त्याने डोळे मिटून घेतले.

बिट्टी पुन्हापुन्हा ओरडत होती, ''बोलत का नाहीस ?... तू माझा पराठा खाल्लास ?... बोल... बोल... बोल...!'' तिने त्याचे केस ओढले गेल्याबरोबर त्याने डोळे उघडले. तो अगदी रडवेला झाला होता.

''सांग, पराठा कुठे गेला ?''

ती वेड्यासारखी किंचाळू लागली, ''बोल... बोल... तू माझा पराठा का खाल्लास ?''

तो हळूच म्हणाला, ''भूक लागली होती ग ताई.''

बिट्टीला आणखीनच राग आला. ती त्याच्या उरावर बसली. आणि त्याचा गळा धरून त्याला तडातड मारू लागली. बिट्टू रडता रडता खोकू लागला. पण ती थांबली नाही.

बाबा येत होते. त्यांच्या काठीचा आवाज लांबूनच ऐकू यायचा. तिने त्याला सोडले आणि ती उठली. उठून बिट्टूकडे पाहिले. बिट्टूची जीभ थोडी बाहेर आलेली होती.

तिने नीट पाहिले. आणि ती त्याची जीभ आत घालायचा प्रयत्न करू लागली.

# सहारा

रामनारायण शुक्ल

लहानपणच्या गोष्टी पण विचित्र असतात. आपण किती लहानसहान गोष्टींवर खुश होत असू याचा विचार केला म्हणजे आज नवल वाटते. अचानक काहीतरी वाचलं किंवा समजलं म्हणजे केवढं मोठं सुख आपल्याला मिळत असे.

मिडल स्कूलच्या परीक्षेत मला स्कॉलरशिप मिळाली होती. हिंदी, भूगोल आणि गणित या विषयांत डिस्टिंक्शन मिळालेलं होतं.

भूगोल खरोखरच माझा आवडता विषय होता. माझ्याजवळ भूगोलाची दोन पुस्तके होती आणि दोन्हीतले अक्षरन् अक्षर मला पाठ होते.

आणि त्या दिवशी गुरुजींनी भूगोलाच्या तासाला म्हटले होते— ''सहारा हे फार मोठे वाळवंट आहे. लांबवर दिसणाऱ्या वाळूशिवाय तिथं दुसरं काहीही नाही. त्यात प्रवास करणे हे फारच कठीण काम. लोक तहानेनं तडफडून मरून जातात. वाळूची वादळं सुटली म्हणजे त्यातून कोणीही जिवंत राहू शकत नाही.''

आणि मी ऐकतच राहिलो होतो. संध्याकाळी घरी आल्यावर मी सहाराविषयी विस्ताराने वाचले. वाचून रोमांचित झालो होतो. आपला जन्म सहारात झाला नाही, हिंदुस्थानात झाला या विचाराने मला अपूर्व आनंद झाला होता.

—गंगायमुनेचं खोरं खूपच सुपीक आहे. वाचून मला आनंद झाला होता. जन्मल्यापासून आजपर्यंतचे माझे दिवस याच भागात गेले होते.

—बंगाल खूप हिरवागार प्रदेश आहे. कलकत्ता हिंदुस्थानातले सर्वात मोठे शहर आहे. माझे वडील आणि कुटुंबातले बरेच लोक कलकत्त्यातच राहत होते. आणि हिरव्यागार बंगालात वसलेल्या कलकत्त्यात मी पाहिजे तेव्हा जाऊन राहू शकतो या विचाराने मी खूप आनंदित होत होतो.

सहारा नव्हे, गंगा-यमुनेचं खोरं आणि बंगाल. हा विचारच मला एखाद्या सुखद स्वप्नाच्या काठाला नेऊन सोडायचा.

नंतर भूगोलाची ती पुस्तके कुठे गेली कोण जाणे आणि मी एकदमच मोठा झालो. आज विचार करतो तेव्हा भूगोलाच्या लहानशा पुस्तकातली दोन पाने वाचून खूप

मोठ्या आनंदाने भरून जाणाऱ्या त्या गतकाळाची ईर्ष्या वाटते.

दुपारी थोडा वेळ डुलकी लागली होती. उठलो तेव्हा सगळं शरीर घामाने चिंब झालेलं होतं. थोडी तहान पण लागली होती. वाटलं की प्राणला हाक मारावी. बहुतेक शेजारच्या खोलीत वाचत बसला असेल. नंतर आठवलं की तो आता एस्प्लनेडमधे असेल. हातात बॅग घेऊन चौरंगीवरच्या एखाद्या लहानशा दुकानापुढे उभा असेल.

उन्हाळ्यात हा पत्रा पण किती तापतो नाही. गच्चीवरच्या या दोन खोल्यात उन्हाळा, हिवाळा, पावसाळा काहीही असो, कसली सोय म्हणून नाही. उन्हाळ्यात पत्रा तापतो. हिवाळ्यात खूप थंडी असते आणि पावसाळ्यात जागा अधिकच लहान होऊन जाते.

सकाळी सगळे जण किती काळजीत पडले होते. थर्मामीटरचा पारा 104वर जाऊन थांबला होता. मी त्यांना म्हणालोदेखील की हा थर्मामीटर मी चौरंगीवर एका फेरीवाल्यांकडून बारा आण्याला विकत घेतला होता आणि त्याच्यावर विश्वास ठेवायचं कारण नाही; पण त्यांचा विश्वास थर्मामीटरवर होता, माझ्यावर नव्हता. मी हे उगीच गंमत म्हणून सांगतो आहे असं कदाचित त्यांना वाटत असावं.

सुभाषकडे पाहिल्यावर वाटत होतं की आता हा रडणार. प्रकाशजी अचानक कामात व्यग्र होऊन गेले होते.

सगळे लोक गप्प होते. मलाच काहीतरी बोलायला हवे होते. ''तुम्ही जा, प्रकाशजी !'' मी चेहऱ्यावर मंद स्मित आणीत म्हणालो, ''माझं तर नुकसान होतच आहे; पण तुमचं कशाला करून घेता ? साधा ताप आहे. गरज पडलीच तर मी प्राणला नाही तर सुभाषला थांबवून घेईन.''

प्रकाशजी माझ्याकडे असं काही पाहतात की जणू काही जाण्याच्या आज्ञेची ते वाटच पाहत असावेत. सुभाष प्रकाशजींचा धाकटा भाऊ आणि प्राण माझा. प्रकाशजी जवळपास माझ्याच वयाचे आहेत. तरी पण नकळत सगळ्यांनीच मला पालक म्हणून मानले आहे.

तीन वाजायचा सुमार आहे. तहान हळूहळू वाढू लागली आहे. उठायचे तर थोडा अशक्तपणा जाणवतो आहे.

प्राण न्यू मार्केट, चौरंगी आणि लिंडसे स्ट्रीटवरच्या लहानलहान दुकानांतून फिरत असावा. सुभाष शेवटचा पीरियड संपायची वाट पाहत वर्गात बसलेला असावा.

आता नाहीच उठणार. सुभाष येईल तेव्हा त्यालाच पाणी मागेन.

सुभाष जायला तयार नव्हता. मीच त्याला रागावून बळेबळेच जायला भाग पाडले होते.

गेल्या तीन दिवसांपासून प्रकाशजींच्या चेहऱ्याकडे पाहवत नव्हते. त्यांच्यासारख्या निरोगी माणसाच्या चेहऱ्यावर काळजीचे भाव पाहून खरंच आश्चर्य वाटत होतं.

सगळ्या परीक्षा जवळपास संपलेल्या होत्या आणि कोचिंग इन्स्टिट्यूट आता बंदच होणार होती. गेल्या वर्षीही बंद झाली होती. पण त्या वेळी त्यांचे काही मित्र गावाकडे निघून गेले होते आणि त्यांच्या बऱ्याच चांगल्या ट्यूशन्स त्यांना मिळाल्या होत्या. या वर्षी असे काही झाले नाही.

चांगलंसं काम मिळालं नाही तर आपल्याला काय त्रास होईल या गोष्टीकडे प्रकाशजी संकेत करतात. मी मुकाट्याने ऐकून घेतो.

तुम्ही कधी एम्प्लॉयमेंट एक्स्चेंजमधे नाव नोंदवलंय का ? मला वाटतं या असल्या पार्ट टाइम कामापेक्षा पूर्ण वेळेची नोकरी तुम्हाला सूट होईल,'' मी म्हणतो.

''दीड वर्षांपूर्वी नाव नोंदवले होते. आजपर्यंत एकही कॉल आलेला नाही.''

''वर्तमानपत्रातला वाँटेड कॉलमही पाहता येईल.''

''बी.ए.ची परीक्षा झाल्यानंतर काही दिवस सतत मी हेच करीत होतो. कधीच काही झाले नाही. थोडेसे पैसे असते तर बिझिनेस तरी केला असता.''

मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहतो. थोड्याशा पैशांनी बिझिनेस केला जाऊ शकतो. थोड्याशा जमिनीवर शेती केली जाऊ शकते. ज्यांच्या जवळ या दोन्हीपैकी काही नाही त्यांना नोकरी करणे भाग आहे. आणि नोकरी मिळणे न मिळणे हे नेहमीच एका अदृश्य शक्तीच्या हाती असते. वाळवंटात पाणी शोधण्याचे जे मार्मिक वर्णन गुरुजींनी केले होते ते आठवते आहे.

''मी सगळ्यांच्यावर विश्वास ठेवतो. तसे नसते तर मोहनलालला कशाला दीडशे स्ट्रॅप्स क्रेडिटवर दिले असते ?'' मी म्हणतो.

आदित्य हळूच हसतो. ''प्रश्न विश्वासाचा किंवा अविश्वासाचा नाही. प्रश्न आहे तुमचे पैसे परत मिळण्याचा. आणि आता ते पैसे तुम्हाला मिळणे कठीणच आहे. कुणालाही उधार देण्याआधी मला अवश्य विचारा असे मी एकदा मी तुम्हाला म्हणालो होतो.''

''मग मी काय करू ? अशीच होता होता हळूहळू आठशे-नऊशे रुपयांची उधारी झाली आहे.''

आदित्य पुन्हा हसतो. ''काय करणार ! बिझिनेस बंद करा. तुमची बाजारात नऊशे रुपयांची उधारी आहे आणि तुम्ही दीड हजाराचे देणे आहात. बंद केला धंदा तरी तुम्हाला सहाशे रुपयांचा फायदा होईल.''

माझे डोके फिरू लागते. इतक्या वर्षांनंतरही अशा गोष्टी ऐकायची सवय झालेली नाही. आदित्याचे हसणे वाढतच जाते.

''तुला ठाऊक आहे, मी असं कधीच करणार नाही. तू मला दहा वर्षांपासून ओळखतो आहेस आणि तरीही अशा गोष्टी बोलतोस !''

''दहाच काय, शंभर वर्षांपासून ओळखत असतो तरी हीच गोष्ट बोललो असतो.

पवित्र आणि निरोगी जीवन घालवावे असे कुणाला वाटत नाही ! पण त्यासाठी काही आधार तरी हवा का नको ?''

मी काहीच बोलत नाही. मला प्रकाशजींची आठवण येते.

''कित्येक वर्षांपूर्वी मी म्हणालो होतो की दुकान विकू नका. इतरांप्रमाणे दुकानात स्मगल्ड गुड्स भरा. आपोआप चालू लागेल. तुम्ही माझे म्हणणे ऐकले नाहीत. आणि मग याच चौरंगीत मी तुम्हाला बॅगेत स्मगल्ड गुड्स घेऊन फिरताना पाहिले आहे. दुकानांना सप्लाय करताना पाहिले आहे.''

मी काहीच बोलत नाही.

''व्यवस्थेनं आपल्याला जखडून टाकलंय. आपल्या मनाला न पटणाऱ्या गोष्टी करायला आपल्याला भाग पडते.''

मी उभा राहतो. मला ठाऊक आहे. त्याचे सगळे म्हणणे चुकीचे असले तरी आज बरोबर वाटते आहे.

प्राणला जेव्हा राग येतो, तेव्हा माझ्या चारही बाजूंना भीती पसरल्यासारखे वाटते. एक विचित्र प्रकारची भीती. त्याला होणाऱ्या प्रत्येक त्रासाबद्दल मी स्वतःला अपराधी मानू लागतो.

''मी हे काम करणार नाही. सगळा दिवस हातात बॅग घेऊन फिरण्यामुळेही काही होत नाही. तुम्ही कुणाला तरी माझ्याबद्दल सांगून माझ्या नोकरीची सोय का करून देत नाही ?''

तीन वर्षांपूर्वी तो सेकंड डिव्हिजनमध्ये इंटर पास झाला होता. पुढे शिकू शकला नाही त्याचे आजही वाईट वाटते. बी.ए. झाला असता तर कदाचित नोकरी मिळणे सोपे झाले असते.

''तू काही दिवस गावाकडे जा. तिथे मनही रमेल आणि आरोग्यही सुधारेल. दरम्यान दुसरं काय करता येईल ते मी पण बघतो.''

तो काही बोलत नाही. त्याच्या पिवळ्या पडलेल्या चेहऱ्यावरचा भाव कधी बदलत नाही. रागात असला म्हणजे मात्र तो अगदी हलकेच थरथरतो.

प्राणबद्दल विचार करण्यात मी शेकडो रात्री घालवल्या आहेत. तो आमचा सगळ्यात धाकटा भाऊ. माझं आयुष्य असंच निघून चाललंय. त्याचंही असंच होणार का ? या विचाराने मी दचकतो.

प्राण गावाकडे जात नाही. गावाकडे जाण्यासंबंधी मी त्याच्याशी बोललो की तो बेचैन होऊन जातो.

अशाच एके दिवशी तो मला म्हणालासुद्धा, ''तुम्हाला काय वाटतं ? गावाकडे गेलं म्हणजे कुणाला बरं वाटेल ? तिकडे खून, मारामाऱ्या, उपासमार, फौजदारी यांच्याशिवाय दुसरं काही असलं तर मला माहीत नाही. पुस्तकातून आपण ज्या

गावांबद्दल वाचतो ती गावं हिंदुस्थानात कुठेच नसतात.''

मी काही बोलत नाही. वाटतं, उद्या आदित्यला सांगावे. त्याचे मामा कुठल्या तरी ऑइल मिलमध्ये प्रोप्रायटर आहेत. कदाचित जमून जाईल.

अलीकडे प्रकाशजी बरेच आनंदात दिसताहेत. कुठल्यातरी प्रायव्हेट हायस्कुलात काम मिळणार अशी निश्चित आशा आहे. सेक्रेटरीबरोबर बोलणे झाले आहे आणि तुम्हाला घेऊ असे पक्के आश्वासन त्यांनी दिले आहे.

सध्या ते रोज रात्री उशीरापर्यंत बऱ्याच गप्पा मारतात. सुभाषला इंग्लिश ऑनर्सला घालायचे म्हणतात. चांगल्या प्रकारे एम्.ए. झाला तर कुठे तरी लेक्चरर होईल असे म्हणतात.

लाइट मूडमध्ये असलो म्हणजे आम्ही बहुधा एकमेकांच्या लग्नाविषयी चर्चा करतो. प्रकाशजींच्या वडिलांचे गावाकडून नेहमीच पत्र येत असते की तुझ्यासाठी एक चांगली मुलगी पाहून ठेवली आहे. असल्या पत्रांची उत्तरे ते देत नाहीत. एरव्हींही ते घरी फारशी पत्रं पाठवत नाहीत.

आठ-दहा दिवसांत त्यांची अपॉइंटमेंट होणार आहे. सगळ्या गोष्टी ठरलेल्या आहेत. काम सुरू झाल्यानंतर कोणती ट्यूशन ठेवायची आणि कोणती सोडायची यासंबंधीच ते बहुधा बोलत असतात. प्राणला मी थर्ड इयरला ॲडमिशन घेऊन द्यावी असेही कधीकधी मला सांगतात. दुसरं काही नाही तर ग्रॅज्युएट झाल्यावर निदान एखाद्या हायस्कुलात तरी काम मिळेल.

त्यांच्या चेहऱ्यावर पसरलेला आनंद पाहिला म्हणजे वाटतं की जणू काही वाळवंटात प्रवास करीत असताना त्यांना कुठेतरी पाणी दिसलेलं आहे.

नाही, ते पाणी नव्हते. ती रेती होती आणि ती पाण्यासारखी दिसत होती.

त्या रात्री त्यांच्या चेहऱ्याकडे पाहवत नव्हते. थोड्या वेळापूर्वीच त्यांनी आम्हा सगळ्यांना सांगितले होते की शाळेत त्यांना ज्या जागेवर घेण्यात येणार होते ती भरली गेली. सेक्रेटरी राजस्थानचे आहेत. त्यांना तिकडचा कोणी तरी माणूस भेटला आणि प्रकाशजींना दिलेल्या वचनाची आठवण न ठेवता त्यांनी त्याला नेमून टाकले.

चार माणसांचा हा काफिला असाच भटकत राहणार का ?

जीवनात काही ध्येय असेल तर सगळं काही करता येतं. कोणीतरी मला म्हणाले होते. आणि मला वाटतंय की असल्या परिस्थितीत ध्येयाबियाच्या गोष्टींचा विचार कसा काय करता येईल ?

गावाकडून मला खूप कमी पत्रं येतात. कधी एखादी फार महत्त्वाची गोष्ट असली तर वडिलांचे पत्र येते; पण प्राणला नेहमीच पत्रं येत असतात. लग्नाबिग्नाच्या गोष्टींपासून ते दुष्काळाच्या, पुराच्या बातम्यापर्यंतची सगळी. गावाकडून आलेले पत्र वाचून आनंदित व्हावे असे आजपर्यंत तरी घडलेले मी पाहिले नाही.

काळ निघून चालला आहे. आम्हा चौघांची कोणती नियती आहे ? कसल्याही प्रकारचा उल्हास आमच्या आयुष्यात चुकूनही आला नाही.

"सध्या रेल्वेत कारकुनी मिळणं फार सोपं आहे."

त्या रात्री येतायेताच प्रकाशजी म्हणाले, "तुम्ही प्राणसाठी प्रयत्न करा. नुकतीच तीनचार दिवसांपूर्वी माझ्या गावाकडच्या एका पोराची अपॉइंटमेंट झाली. हावड्याला एक माणूस आहे. त्याला पाचशे रुपये द्यावे लागतात. बाकीची सगळी कामं, पेपरमध्ये मार्क वाढवण्यासून ते इंटरव्ह्यू व्यवस्थित करून घेण्यापर्यंतची तो माणूस करून देतो. सगळे मिळून सुरवातीला एकशेतीस मिळतील. चार महिन्यांचा पगार त्याला दिला तर बिघडले कुठे ?"

आदित्य म्हणतो, "ते ठीक आहे असे वाटते. वाळवंटात भटकणाऱ्या लोकांजवळ नैतिकता नसते."

"पाचशे रुपये देण्याचा प्रश्न नाही; पण प्रकाशजी, जरा विचार करून पहा किती वाईट वाटणारी गोष्ट आहे."

"मन तयार होत नाही. बरं नाही वाटत. आता कदाचित कलकत्त्यात असल्या गोष्टीला स्थान राहिलेले नाही. असल्या विचारांना लोक विचार म्हणत नाहीत. हलकी भावुकता म्हणायला सुरवात केली आहे लोकांनी." प्रकाशजींच्या चेहऱ्यावर कुठलाच भाव नाही. वाटतं, काही क्षणांपूर्वी मेलेल्या एखाद्या माणसाचा हा चेहरा असावा.

निरोगी, सुंदर व पवित्र जीवन जगण्याची आकांक्षा ! हे एक प्रश्नचिह्न आहे का ?

गुरुजी म्हणाले होते— "तहान असह्य होते तेव्हा लोक उंटांना मारून त्यांच्या पोटातल्या पिशव्यातले पाणी पिऊन आपली तहान भागवतात."

आणि आदित्य त्या दिवशी हसत म्हणाला, "तुम्ही असे विनाकारण का भटकता आहात ? त्यापेक्षा आमच्याकडे काम केलेलं बरं नाही का ? ठरावीक उत्पन्न मिळेल आणि प्राणचे शिक्षणही व्यवस्थित चालू राहील. तुम्ही दुकान विकले तेव्हाही मी तुम्हाला काम द्यावं म्हणत होतो; पण त्या वेळी तुम्ही तयार नव्हता. माझा बिझिनेस स्मगल्ड गुड्‌सवर चालतो. आता मला ठाऊक आहे की तुम्ही काम कराल म्हणून. तीन वर्षं इकडे तिकडे बेकार भटकण्याचा अनुभवही काही कमी नाही."

मला आश्चर्य वाटते. आदित्याचा आपल्या गोष्टींवर केवढा दृढ विश्वास आहे.

आणि त्या दिवशी मला वाटलं होतं की खरंच, आमच्या आस्था आता खूप दबल्या आहेत. थकलेल्या आस्थांना पण आस्था थकतात. या विचाराने कसंतरी विचित्रच वाटू लागलं होतं. शरीरावर पडणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा प्रभाव बहुधा शरीराशी संबंधित असणाऱ्या सर्वच गोष्टींवर पडत असावा.

आता मी आदित्याच्या दुकानात मॅनेजर आहे. वाळवंटात प्रवास करीत असताना जणू काही गढूळ पाणी मिळावं तसा.

आदित्य आपल्या विचारावर दृढ आहे हे पाहून कधी कधी आश्चर्य वाटते. खोटं सुद्धा कधीकधी इतकं दृढ होतं की ते सत्यासारखंच वाटायला लागतं.

आदित्य आजही पूर्वीच्या दिवसांबद्दल चर्चा करतो. तो माझ्या दुकानी यायचा त्या दिवसांबद्दलची. माझा मित्र होता. जर मी त्याचं म्हणणं ऐकलं असतं तर एखाद्या दुकानाचा मालक झालो असतो, असं बहुधा त्याला म्हणायचं असावं.

प्रकाशजीकडे पाहिले म्हणजे कधीकधी मला वाटते की आपण एकटे नाही आहोत. माझ्यासारखे पुष्कळ लोक आहेत. त्यांचीही एक ताकद असते. ती ताकद विखुरलेली असते.

आणि त्या दिवशी प्राणच्या आजारी चेहऱ्याकडे पाहत असताना एकाएकी आदित्यची आठवण झाली. आदित्य आणि प्राण या दोन शब्दांच्या अर्थाकडे माझे लक्ष गेले आणि चेहऱ्यावर एक उदास हास्य पसरले. वाळवंटात सूर्यच चमकू शकतो. जीवन तर नक्कीच होरपळून जाणार.

सहाराचे नाव ऐकले त्याला जवळजवळ पंधरा वर्षे होऊन गेली. प्रथम सहारात माझा जन्म झाला नाही म्हणून मला केवढा आनंद झाला होता.

आज बालपणीच्या मूर्खपणाचे हसू येते आहे. किती चुकीच्या गोष्टीने आनंदित होऊन गेलो होतो.

# शेकोटी

ओमप्रकाश मेहरा

शेकोटीच्या भोवती बाप आणि मुलगे तिघेजण बसले होते. शुक्ल पंधरवडा होता. चंद्र आकाशात वर आलेला होता. लांबवर शेतं पसरलेली होती. त्यात कुठे मोहरी फुललेली होती; तर कुठे गहू आणि हरबरा डोलत होता. पिकाची राखण करण्यासाठी शेतकरी मचाणावर रात्र काढू लागले होते. रात्र अजून फारशी झालेली नव्हती; पण सगळा गाव जसा काही झोपी गेला होता. कसलीही हालचाल नाही. कसलाही आवाज नाही. लांबपर्यंत शेतांमधून शेकोट्या पेटलेल्या होत्या. त्यांच्या भोवताली शेतांचे राखणदार बसलेले होते. हवेची मंद झुळूक आली म्हणजे पीक सळसळत होते. मधेच एखाद्या मचाणावरून 'हो हो हू हू' असा आवाज यायचा आणि शांततेचा भंग करायचा.

चिलमीत तंबाखू भरीत हरखू म्हणाला—"काय कमालीचा गारठा पडलाय. काय हुनार हाय ते देवाला ठाव."

ही गोष्ट त्याने जणू काही स्वत:लाच सांगितली असावी. त्याचे दोन्ही लेक गप्प बसून होते. शेकोटीच्या भडकलेल्या आगीच्या प्रकाशात तिघांचे चेहरे तापलेल्या तांब्यासारखे दिसत होते. मधेच एखादे लाकूड तडकायचं आणि क्षणभर ज्वाळा मोठी व्हायची. त्या क्षणभराच्या उजेडात हरखूचे चिंतेने व्याकूळ झालेले, खड्ड्यात खोल गेलेले डोळे आणि त्याच्या चेहऱ्यावरच्या त्रासलेल्या सुरकुत्या स्पष्ट दिसायच्या. क्षणभर त्याचे लेक मोहन आणि रामजस यांच्या चेहऱ्यावरचाही धूसरपणा नाहीसा व्हायचा. त्यांच्या चेहऱ्यावर विचित्र विझलेपणा, विचित्र थकावट दिसायची. जणू काही अभाव आणि गरिबीच्या अंधाराने त्यांच्या चेहऱ्यावरची चमक गिळून टाकली होती.

"हो ! हो ! हो ! हो !"

दूरवरच्या कुठल्यातरी मचाणावरून आवाज आला. शांतता भंग पावली. थंड वाऱ्याची एक झुळूक आली आणि मोहरीच्या रोपांमध्ये एक विचित्र प्रकारची कुजबूज सुरू झाली. शेकोटीतले निखारे फुलले.

"बप्पा हो ...!" धाकटा लेक रामजस अचानक थरथरत्या आवाजात म्हणाला.

चिलमीचा एक खूप खोल दम मारल्यामुळे हरखूच्या डोळ्यात पाणी आले होते;

क्षणभर तो मोठमोठ्याने खोकत राहिला, मग दम सांभाळीत म्हणाला, ''काय रं ?''

रामजस काही म्हणाला नाही, तो आगीच्या आणखी जवळ सरकला. हरखूने एकदा डोळे भरून त्याच्याकडे पाहिले. त्याच्या आठवणीत जमनाच्या चेहऱ्याची आकृती तरळली. त्याला वाटलं, रामजस अगदी तिच्यावर गेला आहे.

त्याचं मन गतकाळात गेलं. पहिली पत्नी मथुरा गेली तेव्हा मोहन फार तर सहा वर्षांचा असावा. गावकऱ्यांनी त्याला समजावलं होतं की दुसरं लग्न कर म्हणजे तुला पण त्रास होणार नाही. आधी त्याला वाटलं की हे काही बरोबर नाही. याच विचारात एक वर्ष असंच निघून गेलं. घर आणि शेत या दोन्ही ठिकाणच्या जबाबदाऱ्या सांभाळणं त्याच्यासारख्या एकट्या जिवाला जिकिरीचं होऊ लागलं. वेळेवर खायला मिळायचं नाही की झोपायला मिळायचं नाही. मग शेतात जीव तोडून मेहनत करायची ताकद येणार कुठून ? त्या वर्षी शेताचा एक तुकडा पडीकच राहिला तेव्हा त्याला निर्णय घ्यावाच लागला. त्याने दुसरे लग्न केले.

जमुना आली आणि तिने हरखूचं उजाड आयुष्य सावरले. हरखूचा नाहीसा झालेला उत्साह पुन्हा एकदा भराला आला. त्याच्या ओठांवर पुन्हा हास्य दिसू लागले. जमुना होती तोपर्यंत मग त्याला कसलाच त्रास झाला नाही. आता मोहनवरून कधीकधी घरातल्या शांततेला तडा जायचा म्हणा; पण असे कुठल्या घरी होत नाही ?

शेतांच्या बांधावरच्या आंब्याच्या झाडावर एक पक्षी ओरडला. दक्षिणेकडून आवाज आला— ''टिट्टवी टिट्टवी.'' टिटवीच्या करुण आवाजाने नीरवता भंग पावली.

हरखूने रामजसकडे पाहिले. चार वर्षांचा असतानाच जमुना त्याला सोडून परलोकवासी झाली होती. त्याला तो प्लेग आठवला. जमुनाने सहन केलेल्या यातना आठवल्या. त्याच्या डोळ्यांचे कोपरे ओले झाले.

रामजस आता आठ-नऊ वर्षांचा झाला आहे. आईच्या प्रेमापासून वंचित, दुर्दैवी. कारुण्यपूर्ण दृष्टीने हरखू त्याच्याकडे पाहू लागला.

रामजसने एकदा आपल्या वडिलांकडे पाहिले आणि रडवेल्या आवाजात म्हणाला, ''लई थंड वाजतीया बप्पा !''

हरखूने खांद्यावरचे धोतर काढून त्याला पांघरले. त्याच्या डोक्यावरून हात फिरवीत त्याला आपल्या जवळ ओढून घेतले.

थोरल्या लेकानं— मोहननं— एकदा डोकं उचलून वर पाहिलं. त्याची नजर आपल्या बापाकडे आणि त्यांच्या कुशीच्या उबेत सुरक्षित चादर पांघरून बसलेल्या रामजसकडे गेली. त्याच्या डोळ्यांची बुबुळं लहान झाली आणि त्यात एक पोलादी थंड कठोरपणा येऊन थांबला. त्याला बहुतेक असं वाटत असावं— हो, हा रामजसच आपला सर्वात मोठा शत्रू आहे. याच्यामुळेच तो नव्या आईला आवडेनासा झाला आणि यानेच आपल्या वडिलांचे प्रेमही बळकावले आहे. मोहन आता लहान राहिलेला नाही. पंधरा

वर्षांचा झाला आहे की चांगला. अंगाभोवती एक फाटकी घोंगडी गुंडाळून बसला आहे.

शेकोटीच्या ज्वाळा भडकल्या की त्याचा डोळे मिटलेला चेहरा दिसतो. त्या चेहऱ्यावर आत उसळलेल्या रागाची पडछाया दिसू लागते. बंड त्याच्या मनात डोकं वर काढीत आहे. आईच्या वात्सल्याची आणि प्रेमाची भूक असलेल्या मनाचे बंड. त्याची आई गेली तेव्हापासून त्याला प्रेम मिळालेले नाही. त्याच्या आईच्या मृत्यूनंतर वर्षभरातच नवी आई आली होती. तिने कधीच त्याला आपले म्हटले नाही.

त्या वेळी तो खूप लहान होता. त्याच्या मनाचे पापुद्रे कोमल होते. त्या पापुद्र्यांना गोड, वात्सल्याचा स्पर्श झाला नाही. त्यामुळे प्रहार सहन करीत करीत ते पापुद्रे मोडून गेले. त्याच्या लहानशा मनाने लहानपणीच बरेच काही शिकून घेतले होते. हळूहळू तो कठोर होत गेला. कदाचित तो उपेक्षिताचे जिणे असेच जगतही राहिला असता; पण दिवसेंदिवस नव्या आईचा कठोरपणा वाढतच गेला. रामजसचा जन्म झाल्यावर तर त्याच्या अस्तित्वाची कुणी दखलही घेईनासे झाले. वडिलांची नजर पण आपल्या बाबतीत बदलली आहे असे त्याच्या अनुभवाला आले. लहान वयातच त्याच्यावर कितीतरी कामांचा बोजा टाकण्यात आला. तो काम करीत राहायचा आणि रामजसवर प्रेमाचा वर्षाव होत असलेला पाहत राहायचा. रामजसबद्दलचा हा पक्षपात पाहून पाहून हळूहळू त्याच्या मनात ईर्ष्येची भावना घर करू लागली. रामजस त्याला शत्रूसारखा वाटू लागला. त्याच्यामुळेच आपल्यावर कोणी प्रेम करीत नाही—एवढेच नव्हे तर वडिलांनी पण आपली उपेक्षा केली, असे त्याला वाटू लागले.

शेकोटीतली लाकडे पेटून पेटून मोडू लागली आणि गुडघ्यावर हनुवटी टेकवून बसलेला मोहन आपल्या आयुष्याच्या कहाणीची पाने उलटत राहिला. आईची धूसर आठवण त्याच्या स्मृतीत ठिणगीसारखी पेटत-विझत राहिली. त्याला अंधुकसं आठवतंय. आईच्या मांडीवर बसून तो कितीतरी गोष्टी ऐकायचा आणि ती त्याला थोपटायची तेव्हा ते थोपटणे त्याला निद्रेच्या राजकुमारीच्या देशाला घेऊन जायचे. गावचा बाजार भरायचा तेव्हा आपल्या वडिलांचे बोट धरून तो सगळ्या बाजारात इकडेतिकडे फिरायचा. कधी खेळण्यांच्या दुकानापाशी थबकायचा तर कधी मिठाईच्या दुकानापाशी रडायचा. परत यायचा तेव्हा त्याचे सानुले हात कितीतरी वस्तूंनी भरलेले असायचे. सणावारी त्याला नवीन कपडे नेहमीच मिळायचे. आईच्या मृत्यूनंतर मात्र त्याची ही वात्सल्याची दुनिया हिरावली गेली. मग रिकाम्या घराच्या ओसरीत तो एकटाच फिरायचा आणि रडत बसायचा.

वर्ष होते न होते तोच आली त्याची नवी आई. मोहनने तिच्याकडे आश्चर्याने पाहिले. ती त्याला आपल्या आईसारखी वाटली नव्हती. वयाने तर कितीतरी लहान होती. त्याच्या वडिलांनी त्याला जेव्हा सांगितले की 'ती त्याची आई आहे,' तेव्हा त्याचे डोळे पाण्याने डबडबले होते. त्याच दिवशी लहानग्या मोहनच्या मनात एक

आवाज उमटला— 'आता तुझे सुखाचे दिवस संपलेच म्हणायचे.' आणि खरोखरच तसे झाले. नव्या आईने त्याच्यावर कधीच माया केली नाही. उलट त्याच्या शिरावरचं कामाचं ओझं वाढतच गेलं. त्याची सगळी नाजूक स्वप्नं जणू धुळीला मिळाली... त्याचे बालसुलभ चांचल्य नाहीसे झाले आणि त्याची जागा अकाल प्रौढपणाने घेतली. त्याच्या चेहऱ्यावर हास्य क्वचितच दिसू लागले. तो नेहमी उदास आणि गंभीर दिसू लागला. त्याच्या डोळ्यात एक दडपलेला हाहाकार दाटलेला असायचा. तो सगळं ऐकून घ्यायचा... बोलायचा मुळीच नाही. पण एकांतात असला म्हणजे रडून घ्यायचा.

नव्या आईच्या मायेचा वर्षाव रामजसवर व्हायचा ! त्याच्यात त्याचा काहीच वाटा नसायचा. आईबापाची सगळी ममता रामजसला मिळत होती. सगळी खेळणी, कपडे, मिठाया, त्याच्यासाठी होते आणि याच्या नशिबी त्या सगळ्या गोष्टींकडे अभिलाषेने पाहणे एवढेच होते. गाईम्हशींचे चारापाणी करणे, धारा काढणे, कडबा कापणे आणि शेतावर जाणे हेच त्याच्या वाट्याला आले होते. लहान वयातच तो एक जबाबदार माणूस झाला होता. त्याच्या आयुष्यातल्या सगळ्या निरागस गोष्टी हिरावून घेण्यात आल्या होत्या. रामजस हसतोय, खेळतोय हे तो पाहत रहायचा.

''मोहन्या !''

त्याच्या विचारांची साखळी तुटली. दचकून त्याने वडिलांकडे पाहिले. थंडी वाढलेली होती. चादर गुंडाळलेली असूनही रामजसला आता जास्तच हुडहुडी भरली होती.

''काय बप्पा ?''

''तुजी घोंगडी देऊन टाक.''

मोहनने आपल्या अंगाभोवती गुंडाळलेल्या घोंगडीकडे एकदा पाहिले. वडिलांच्याबद्दल त्याच्या मनात एक प्रकारचा घृणेचा भाव निर्माण झाला. त्यांच्या मनात रामजसविषयी एवढा पक्षपात काय म्हणून असावा ? मी काय मातीने घडवलेला आहे ? मला काय थंडी वाजत नाही ? रामजस म्हणजे जणू काही सर्वस्व आणि मी म्हणजे काय कुणीच नाही ? नाही. नाही देणार मी घोंगडी.

त्याने वडिलांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा कठोरपणा पसरला. डोळ्यात एक निश्चयाची भावना चमकू लागली. रामजस नजरेत याचनेचा भाव आणीत त्याच्या जवळ खेटून बसण्याचा प्रयत्न करू लागला. घोंगडी आणखी काळजीपूर्वक आपल्या अंगाभोवती गुंडाळून घेत रामजसकडे तिरस्काराने पाहत त्याने आपले तोंड फिरवले.

''दादा, मला घोंगडी दे ना पांघरायला,'' थरथरत्या आवाजात रामजस म्हणाला.

मोहनने न ऐकल्यासारखे केले. मुकाट्याने बसून राहिला. जणू काही दगडच. त्राग्याने आणि कष्टाने रामजसच्या डोळ्यांत आसवे जमा झाली. त्याने गुडघ्यात डोके

घातले. आग धगधगत जळत होती. थोडा वेळ वातावरण नि:स्तब्ध झाले. चंद्र आणखी वर आला होता. हवा आणखी थंड झाली होती. शांततेचा भंग करणारी कुठली गोष्ट असेल तर ती म्हणजे हवेने होणारी शेतांची सळसळ एवढीच होती. गुडघ्यात तोंड घालूनच रामजस स्फुंदू लागला.

''काय झालं रं ?'' चमकून हरखूने विचारले.

''थंडी वाजतेय बप्पा.'' त्याचे हुंदके देणे वाढले होते. हरखूने जळजळीत नजरेने मोहनकडे पाहिले.

''मोहन्या, ऐकू येत न्हाई व्हय ? घाल त्येला ती घोंगडी !''

मोहनने काहीच उत्तर दिले नाही. हरखूच्या बोलण्याची त्याच्यावर कसलीच प्रतिक्रिया झालेली नव्हती. दगडाच्या मूर्तीसारखा न हलता, न बोलता तो बसून राहिला. हरखूला ही अवहेलना सहन झाली नाही. चिलमीतली आग शेकोटीत उलटून टाकीत तो उठून उभा राहिला.

मोहनच्या पुढे उभे राहून तो म्हणाला, ''आज तुज्यावर शनी स्वार झाला हाय का म्हनावं ? मारमारून उताणा पाडीन ! गुमान घोंगडी काडून देतो का न्हाई ?''

मोहनने पुन्हा अवज्ञा केली.

हरखू रागाने पेटला. त्याचा क्रोध लाथाबुक्क्यांच्या रूपाने मोहनवर बरसू लागला—''घे ! अजून घे ! ईतभर जीव न्हाइ आन् आकड दावतोय !'' तो मारत राहिला आणि ओरडत राहिला.

मोहन बसल्या बसल्याच जमिनीवर आडवा झाला. पण घोंगडी त्याने घट्ट धरून ठेवली. 'आपण गुडघे टेकायचे नाहीत. घोंगडी द्यायची नाही... नाही द्यायची.' त्याच्यावर बुक्क्यांचा वर्षाव झाला पण त्याच्या तोंडातून एक हुंदकादेखील बाहेर पडला नाही. रामजस घाबरून वडिलांच्याकडे पाहू लागला होता.

तो ओरडला... ''बप्पा !''

हरखू धापा टाकू लागला होता. धुळीत गाठोड्यासारखा मोहन पडलेला होता. त्याला आणखी एक लाथ घालीत तो काहीतरी पुटपुटत रामजसकडे वळला. त्याला दटावीत म्हणाला, ''काय किरकिर लावली हायेस उगी ? मायला गिळून बसला, आता काय मला गिळायचं हाय का ?''

रामजस घाबरला. हरखू बडबडत मचाणाकडे निघून गेला.

मोहन बराच वेळ तसाच पडून राहिला. मग हळूहळू उठला आणि त्याने आगीवर हात पसरले. त्याचा चेहरा धुळीने माखलेला होता. घोंगड्यात माती भरली गेली होती. इतका मार खाऊनसुद्धा त्याच्या डोळ्यात अश्रूचा एक थेंबदेखील आला नव्हता. त्याचा चेहरा पोलादासारखा कठोर होता. डोळ्यात कसल्याही प्रकारचा कोमलपणा नव्हता... निखाऱ्यासारखे लालभडक झालेले होते त्याचे डोळे. त्याने रामजसकडे पाहिले. तो

थकून जमिनीवरच झोपला होता. त्याचे डोळे मिटलेले होते. पण त्यातून खळखळा वाहून गेलेल्या आसवांचे ओलेपण अजूनही शिल्लक होते. राहून राहून तो हुंदके देत होता. क्षणभर मोहनच्या मनातल्या सूडभावनेला बरे वाटले. रामजसच्या वेदना पाहून त्याला जणू काही आनंद झाला; पण मग आपण रामजसकडे फार वेळ पाहू शकणार नाही असे त्याला वाटले. मंद आगीच्या उजेडात थरथरत असलेला रामजसचा निरागस चेहरा आणि पापण्यात भरून राहिलेली आसवं !

पुन्हा एकदा त्याच्याकडे पाहून आपली सूडभावना तृप्त करून घ्यावी असे त्याला वाटले; पण त्याच्या मनात काही वेगळीच भावना उगवली. रामजसचं दु:ख पाहून त्याला आनंदित व्हायचं होतं; पण आपण कधी आनंदित होऊ शकणार नाही असे त्याला वाटले. उलट का कोण जाणे त्याच्या मनाला एक प्रकारची तीव्र टोचणी लागली. त्याला आठवलं की आईच्या मृत्यूनंतर काही दिवसांनी तो पण वडिलांच्याबरोबर शेतात यायचा. शेकोटीशेजारी असाच झोपला म्हणजे अनेकदा स्वप्नात आई दिसायची. तो दचकून जागे व्हायचा आणि कितीदातरी रडायचासुद्धा.

रामजसला पण आईची आठवण येत असेल अशीच. आणि आई नाही म्हणून त्यालाही वाईट वाटत असेल. हीच एक गोष्ट पुन्हा पुन्हा मोहनच्या डोक्यात फिरू लागली. आपण रामजसचा तिरस्कार करू शकणार नाही, असे त्याला वाटले. इच्छा असली तरीसुद्धा नाही. रामजस लहान आहे आणि त्याला आई नाही. त्याला मायेची गरज आहे. कारण मायाममता नसली तर माणूस काहीच्याबाही होऊन जातो हे मोहनला ठाऊक आहे.

मोहनच्या चेहऱ्यावरचा कठोर ताण आपोआप मोकळा झाला. नसा मऊ पडल्या आणि त्याच्या डोळ्यांत एक निरागस उजळपणा पसरू लागला.

झटक्यासरशी तो उठून उभा राहिला. घोंगडी काढून त्याने ती हळूच रामजसच्या अंगावर पांघरली. थोडा वेळ मायेने त्याच्या चेहऱ्याकडे पाहत राहिला. मग शेकोटीजवळ येऊन बसला आणि मुकाट्याने शेकू लागला.

# खंडित

गोविंद मिश्र

दिवसा उजळ उन्हात ती वस्ती थोडी चमकताना दिसायची. ढग आलेले असले म्हणजे गवताळ मैदानात आसपास पसरलेल्या घरांकडे पाहिले की कापसाचे ढीग असल्याचा भास होत होता. रात्री बाहेरचा उजेड फार कमी ठिकाणी असतो, त्यामुळे पसरलेल्या जंगलात तो हरवून जातो. बंद घरातले लहानलहान दिवे पांढरेपणा आणि पिवळेपणा यांच्यामधला कुठला तरी सपाट, मेल्यासारखा झुबका तेवढा वरती फेकत होते.

उंचावरून पाहिले म्हणजे सगळे एखाद्या कबरस्थानासारखे दिसत होते. घरं नव्हती ती, झाडांच्या आजूबाजूला पसरलेल्या जणू लहानमोठ्या कबरी होत्या.

त्या वस्तीचे सगळे दळणवळण त्या गावाशी निगडित होते ते वरच्या अंगाला होते. खेचरावर लादलेल्या सफरचंदाच्या पेट्या खालून वर यायच्या आणि तेथून पुढे बसने प्रवास करायच्या. रस्ता वरून खाली एकदम उताराचा होता. एवढा की एखादा माणूस गडगडतच वरून खाली यावा. मैदानाला जेथून सुरवात होते तेथून कापसाचे ते शिळे ढीग विखरून जायला लागायचे. एखाद्या सामान्य गावात असतात तशी घरं आजूबाजूला तोंड वर काढू लागायची. बहुतेक घरं तर आजूबाजूला जंगलाच्या हिरवळीत लपलेली होती. माझ्या समोर जे होतं ते सरळ वर पाहत होतं आणि वाटेत बऱ्याच आधीपासूनच त्याची रूपरेषा दिसू लागलेली होती—अगदी ठळकपणे.

त्या वस्तीतले ते सगळ्यात मोठे घर होते आणि एके काळी त्या घरातले लोकही सर्वांपेक्षा जास्त योग्यतेचे लोक होते.

आवारात प्रवेश करताच कुत्र्यांचे आवाज येऊ लागले. बहुतेक त्यांनी परका वास ओळखला असावा. नंतर एका दांडग्या कुत्र्याला आवरत-रागावत एक गोरी गोरी मुलगी आली. तरुण, बरीचशी सुंदर आणि संपूर्ण शहरी पोशाखात. ओळख वगैरे नसूनही ती मला आत घेऊन गेली. आपल्या परंपरेला अनुसरून अजूनही या विरळ वस्तीत घरी आलेल्या परक्या माणसाला पाहुणा म्हणून समजले जाते हे पाहून बरे वाटले.

पोरगी मला व्हरांड्यात घेऊन गेली. समोर त्या बसल्या होत्या आरामखुर्चीत. कपडे शहरीच होते, पण मुलीइतके स्वच्छ, नेटके नव्हते. वय सत्तरीच्या पुढे असावे,

पण चष्मा नव्हता. रंग सुरकुत्यात बुडून गेला होता. चेहरा गोल, बांधा मध्यम, शरीर थोडंसं ढिलंढालंच... खुर्चीवर एखाद्या गाठोड्यासारखं पडलेलं होतं. मंद झुळुकीने झाडाची व्हावी तेवढीच हालचाल... एकूण काय की त्या एखाद्या सफरचंदाच्या जुन्या रोपासारख्याच होत्या. सुरवातीपासूनच या प्रदेशात त्या आपल्या शौर्यासाठी प्रसिद्ध होत्या. जंगलात एकटे राहणे, आपल्या स्वतःच्या हिंमतीवर व्यापार चालवणे, आणि शिकलेल्या असल्यामुळे शेतकऱ्यांवर होणाऱ्या अन्यायाचा जोरदार प्रतिकार करणे या गोष्टींमुळे त्यांचे मोठे नाव झालेले होते. त्याचबरोबर त्यांचा पाहुणचारही प्रसिद्ध होता. दोन डोंगरी गावांना जोडणाऱ्या पायवाटेवरची ती पहिली वस्ती होती आणि जो कोणी येथून जाई त्याला विश्रांती घेण्याची सोय तर येथे होतीच; पण त्याशिवाय त्याला न्याहरी, चहापाणी द्यायलाही त्या कधी विसरत नसत.

मला पाहून त्या हसल्या आणि त्यांनी नोकराला खुर्ची आणायला सांगितले. तो मोकळा व्हरांडा होता. त्याच्यापुढे एवढ्याच उंचीवर पठारासारखं एक अंगण होतं आणि खाली पसरलेलं होतं लांबरुंद ऑर्चर्ड. समोर पर्वत होता. तो उतरूनच मी येथे आलो होतो. खडकात आणि झाडांच्या गर्दीत वाट हरवून गेली होती.

बसल्यानंतर परिचय झाला. मी या रस्त्याने जातो आहे एवढा माझा परिचय त्यांना पुरेसा होता.

''हल्ली लोक पायी फारसं चालत नाहीत... एखादा प्रदेश नीट जाणून घ्यायचा असला तर पायी चालणं आवश्यक आहे. जे या वाटेने जात नाहीत ते हे पर्वत वरवर पाहूनच परत जातात...'' त्या म्हणाल्या.

''तुमचं ऑर्चर्ड फार प्रसिद्ध आहे. 'वाटेने जाताना पाहून घ्या' म्हणून मला सांगण्यात आले होते...''

मी माझ्या येण्याचे स्पष्टीकरण दिले.

त्या पुन्हा हसल्या. त्यांच्या जमान्यात त्या खूप सुंदर असल्या पाहिजेत. मग अनेक प्रकारच्या रेषा त्यांच्या चेहऱ्यावर दिसू-मिटू लागल्या. वय झालेलं असूनही चेहरा इतका निर्मळ आणि पारदर्शक होता की त्यावर लिहिलेलं सगळं स्वच्छ वाचता येत होतं. शहरांपासून लांब राहणारे चेहरे बहुधा असेच असावेत. त्या ऑर्चर्डशी संबंधित अशा किती तरी आठवणी त्या वेळी त्यांच्या चेहऱ्यावर इकडून तिकडे धावत होत्या. मधेच त्यांचा चेहरा किंचित लालही झाला. असं वाटत होतं की त्यांना त्यांच्या ऑर्चर्डच्या ख्यातीचा सार्थ अभिमान असावा... तेवढ्यात एका कोपऱ्यातून किंचित काळवंडलेपणाही चेहऱ्यावर उगवला आणि पुढे पुढे पसरत जाऊ लागला. मग त्यात त्या आणि त्यांचे रूप... सगळंच बुडून गेलं.

दरम्यान ती उजळ मुलगी चहा घेऊन आली होती आणि तिने इंग्रजीत यॅसफॅस करायलाही सुरवात केली होती... आपण शिकलेले आहोत हे दाखवण्यासाठी केल्या

जाणाऱ्या नेहमीच्या युक्त्या. आपण जंगलातल्या ह्या भागात नसून एखाद्या ड्रॉइंगरूममध्ये आहोत आणि 'हाऊ मच शुगर फॉर यू' सारख्या फराट्यात आयुष्य पूर्ववत चालू आहे असे वाटायला लागले. एक फरक मात्र निश्चितच होता. तो म्हणजे एक प्रकारचा गरम गरम उबदारपणा आमच्या भोवताली जाणवत होता—सुंदर मुलींच्या उपस्थितीत बहुधा जाणवतो तसा.

थोडा वेळ मी मायलेकीची तुलना करू लागलो. काही तरी होतं की ज्यामुळे वय झालेलं असूनही आईचा गहिरा प्रभाव जाणवत होता, तर याउलट लेकीचा उजळपणा काही काळ चमकून विझून जात होता.

तीस वर्षापासून त्या येथेच राहत आहेत... त्यांनी सांगायला सुरवात केली... लग्नानंतर थोड्याच दिवसांनी त्यांनी आणि त्यांच्या पतीने ऑर्चर्ड करायचे ठरवले आणि तेव्हापासूनचा सगळा काळ एका परिपूर्ण जीवनाची सामुग्री गोळा करण्यात इथेच घालवला. आता इथे सगळे काही आहे— अंडी देण्यासाठी कोंबड्या, धान्य उत्पन्न करण्यासाठी शेत, दुधासाठी गाय; कुत्री, खेचरं सगळं काही... पण ज्याने हे सर्व जमवले तोच नाहीय. एका वर्षापूर्वी त्यांच्या पतीचे निधन झाले होते. या वातावरणातून जणू त्या उन्मळून पडल्या होत्या. समोर बसलेली होती ती त्यांची एकुलती एक मुलगी आणि तिने आईवडिलांनी नको म्हटलेले असतानाही स्वत:च्या मर्जीप्रमाणे मोठ्या शहरात जाऊन लग्न केले होते. लग्न झाल्यानंतरही दोघांनी येथे येऊन राहावे आणि ऑर्चर्डची देखभाल करावी असे आईबापांनी म्हटले होते; पण नव्या पिढीला जंगल रुचत नाही. जंगल माणसाला आत डोकावून पाहायला भाग पाडतं आणि हल्लीच्या लोकांना हे मुळीच सहन होत नाही. पतीच्या मृत्यूनंतर त्या लेकीकडे—जावयाकडे—दिल्लीला गेल्या होत्या... पण तिथे त्यांचे मन रमले नाही. म्हणून पुन्हा परत आल्या... त्यांची मुलगी त्यांच्याजवळच राहते आहे.

गोरी मुलगी मधून मधून अस्वस्थ होत होती. रस्त्यावरून जाणाऱ्या कुणाही माणसाशी असे मोकळेपणाने बोलण्याची आईची सवय खरं तर तिला वैताग आणत असावी... किंवा आता ती पुढे आणखी काय बोलेल याचाही वैताग असावा...त्यामुळे ती शंकितच असायची. कपबशांचा आवाज करून, 'वन मोअर फॉर यू' यासारख्या वाक्यांचा प्रयोग करून... किंवा आणखी इतर काही प्रकारांनी ती बोलण्यात व्यत्यय आणून ते संपवायची किंवा त्याची दिशा नाही तर निदान गती तरी बदलायचा प्रयत्न करायची... पण त्या आपल्या बोलतच राहिल्या होत्या. त्यांना वाटत होतं, जोपर्यंत आपण आधी आपलं सगळं सांगून टाकत नाही तोपर्यंत कुणाशी कसं काय बोलत बसता येणार ? आम्ही चहा पीत राहिलो. त्या पुन्हा फळांच्या व्यापाराच्या आतल्या गोष्टी सांगू लागल्या. प्रत्येकाला आपली स्वत:ची खेचरं ठेवावी लागतात. मधला माणूस कसा पैसे हडप करतो. एकदा तर ऑर्चर्ड इन्स्पेक्टर आला अन् त्यांना धमकी देऊ लागला होता...

त्यांनी त्याला दम भरून पळवून लावले— 'असं समजू नकोस की मी बाईमाणूस आहे, मी तुम्हाला कच्चं खाऊन टाकीन. माझ्याजवळ 'गन' आहे आणि तिचा कसा उपयोग करायचा हे मला ठाऊक आहे. तुम्ही ज्यांचे कारभारी आहात त्या लोकांनाही मी ओळखून आहे. त्या दिवशी जो दम भरला त्यानंतर पुन्हा त्या इन्स्पेक्टरने ह्या प्रदेशात असेपर्यंत तोंड म्हणून दाखवले नाही.

''तुम्हाला इथं एकटे राहायची भीती नाही वाटत ?'' मी त्या गोऱ्या मुलीला विचारले.

''कशाची भीती ? माझा जॉन आहे ना. मला एक मिनिटसुद्धा सोडत नाही. माझ्या बाबतीत तो फार पझेसिव्ह आहे. हेच पाहा ना, आता तुमच्याबरोबर बोलते आहे ना तर त्याला राग आलेला आहे. 'ही फील्स जेलस...' दुसरं कुणी माझ्याजवळ आलेलं त्याला सहन नाही होत. रात्री माझ्याजवळच झोपतो... कधीकधी मी खूप बोअर होऊन जाते. मग त्याच्यावर उपाय म्हणजे दिवसा अजिबात झोपायचं नाही आणि प्रत्येक क्षणी स्वतःला बिझी ठेवायचं. त्यासाठी येथे खूपच वाव आहे—कितीतरी कामं आहेत, करायला सुरवात केली तर कधीच न संपणारी. कोंबड्यांची आणि गायींची देखभाल करणे येथपासून ते रोपांच्या आरोग्याची काळजी घेण्यापर्यंत.''

आई म्हणजे जणू काही जंगलाचाच एक भाग होता... तिथल्या झाडापर्वता-सारखी. आणि कन्या होती आधुनिक सुखसोयींनी युक्त जंगलातल्या रेस्ट हाउससारखी. आई इथेच होती आणि मुलगी महानगराचा वेग इथे शोधत होती.

''तुमचे पती ?'' —मी विचारले.

जावयाबद्दलचे बोलणे निघताच त्यांनी तोंड दुसरीकडे फिरवले आणि त्याचा उल्लेखसुद्धा करणे आपल्याला पसंत नाही हे स्पष्ट केले. प्रकरण भानगडीचे दिसते असे मला वाटले... 'दिल्लीत राहतात' एवढे मुलीने सांगितल्यावर त्या दिशेने बोलणे न वाढवता मी आपोआपच गप्प बसलो. ...आणि बोलण्यासाठी दुसरा विषय हुडकू लागलो. मुलगी समोर होती तोपर्यंत त्या जवळजवळ काहीच बोलल्या नाहीत. असे वाटले की त्यांना झोप लागली आहे. आणि त्या जाग्या असल्या तरी इथे त्यांचे फक्त शरीर आहे. त्या स्वतः दुसरीकडेच कुठेतरी आहेत. वारंवार पंख्याने पायावर बसणाऱ्या माशा निवारीत होत्या— गाय-बैल शेपटीने निवारतात तसे.

चहाची भांडी उचलून मुलगी आत गेली, तेव्हा त्या परत आल्या.

''मला हिचा नवरा मुळीच आवडत नाही. या पोरीने तर आपल्या आयुष्याचे वाटोळे केले. वयानेही हिच्यापेक्षा खूप जास्त आहे. मी आणि हिच्या डॅडीने खूप विरोध केला होता, पण हिने ऐकले नाही.''

''ठीक आहे, पण दोघं खुश तर आहेत.''

''कुणास ठाऊक. तिलाच विचारा.''

त्या किंचित कडवटपणे म्हणाल्या. उत्तर मिळायचं तर सोडाच पण अशा प्रकारचा प्रश्नही ह्या मुलीला सहन होणार नाही हे मी जाणून होतो. कुणाशीही विशेष ओळख नसताना त्या जेवढ्या मनमोकळ्या होतात तेवढं मनमोकळं ही मुलगी एखाद्या जवळच्या माणसाशीही होणार नाही कदाचित.

''व्हॉट इज मोअर ?'' त्या पुढे म्हणाल्या, ''तो नीच आहे. माझी काळजी घ्यायला मुलीला इथे ठेवलंय असं तो म्हणतो; पण मला काय एवढं समजत नाही ?... सगळं आयुष्य लुच्च्या लोकांशी व्यवहार करण्यात गेलंय.''

हे म्हणत असताना त्यांनी आवाज आणखीनच हळू केला होता आणि माझ्याकडे जणू शब्द फेकत होत्या. सर्व सुरकुत्यांना भेदून त्यांचे डोळे बाहेर आले होते... आणि खोडकरपणाची असीम छटा त्यांच्या टकमक डोळ्यांत चमकत होती. स्वत:चं चातुर्यानं रक्षण करण्यात त्यांना गंमत वाटत असावी. जणू काही हा एखादा खेळ असावा आणि या खेळाचे सगळे डावपेच त्यांना चांगले माहीत असावेत.

बोलत असताना त्यांचे डोळे वारंवार मोठ्या त्वरेने घराच्या आतल्या बाजूकडे वळत होते आणि पुन्हा त्याच गतीने आपल्या बोलण्याचा पूर्ण प्रभाव पाडण्यासाठी माझ्या दिशेने वळत होते. त्यांच्यात आणि त्यांच्या लेकीत बोलचाल होत नसावी असे वाटत होते आणि कदाचित म्हणूनच सवयीने त्या वाटसरूंना आपले मन मोकळं करून सांगत असाव्यात. त्यांच्याशी घनिष्ठ होत असाव्यात. नाहीतर आपलं वैयक्तिक रहस्य दाखवण्याइतकं कोणी कधी मनमोकळं होऊ शकेल का ? तसं पाहिलं तर त्यात रहस्य म्हणण्यासारखी तरी काय आहे ? त्यांच्या दृष्टीने या सगळ्या अत्यंत स्पष्ट गोष्टी होत्या आणि मुलगी आपल्या पोटी जन्माला आलेली आहे या वस्तुस्थितीमुळेही त्यात कसलीही संदिग्धता त्या येऊ देत नव्हत्या. त्या गोऱ्या मुलीच्या अपरोक्ष जरी त्या बोलत असल्या, तरी हाही त्यांच्या खेळाचाच भाग असावा बहुधा. नाहीतर मुलगी समोरून नाही तरी घरातून आडून, चोरून त्यांचं बोलणं कधी ना कधीतरी ऐकल्याशिवाय राहणार नाही ह्याची जाणीव त्यांना असणारच.

''बरं, मला असं सांगा की काही माणसं फक्त तुमच्या मृत्यूची वाट पाहत आहेत हे कळलं तर तुम्हाला काय वाटेल...?'' त्या म्हणाल्या.

चेहरा संतापाने पेटलेला होता... सुरवातीला जो सफरचंदाच्या रोपासारखा वाटला होता. त्याच्या आतला माणूस जणू काही फडा काढून समोर उभा होता.

''नशीबवान आहात. तुमच्या मुलीची ऑर्चर्डची आवड तुमच्यापेक्षा कमी नाही.''

''हो, विचार तरी असाच होता...'' त्या उदास झाल्या... ''आमच्यानंतर आमच्या वंशाने या ऑर्चर्डची देखभाल करावी अशी माझ्या पतीची फार इच्छा होती... पिढ्यान्‌पिढ्या... जेव्हा मी हिच्या नवऱ्याला प्रथम पाहिलं तेव्हा...तेव्हापासूनच तो मला आवडला नव्हता.''

डोळे मिटून त्या खुर्चीत टेकून बसल्या आणि आपल्या पायावरच्या माशा हाकलू लागल्या. मुलगी येत होती. तिचे क्रमशः येणे जणू त्यांचं डोकं ठणकत होते. असे वाटत होते की त्यांना मुलीला आपल्याजवळच तर ठेवून घ्यायचंय... पण तिचे असणे त्यांना विचलित करण्यास पुरेसे होते.

बाहेर उजळलेल्या उन्हात सरसरत जाणाऱ्या वाऱ्याचा आवाज येत होता. मी तो आवाज शोधू लागलो; पण नजर जाईल तिकडे सगळे कसे निस्तब्ध उभे होते. पर्वतांमधून फिरणाऱ्या वाऱ्याचा तो आवाज असावा. जंगलात माणसांच्या बरोबर राहिल्यावर येतो तसाच बराचसा. माणूस सगळं काही होऊ शकतो, बरोबर राहू शकत नाही.

''मी ऑर्चर्ड पाहू शकतो का ?''... मी उठू लागलो.

''अवश्य,'' जागं होत त्या म्हणाल्या, ''पोरी, यांना दाखव जरा. बागेच्या मध्ये एक झरा आहे. त्याचं पाणी जरूर प्या. सुरवातीला आम्ही आलो होतो तेव्हा पाण्यासाठी फार लांब जावं लागायचं. एके दिवशी माझ्या पतीला त्या ठिकाणी ओलावा दिसला. मग त्यांनीच हा झरा खणून काढला. खणल्यानंतर पाणी स्वच्छ राहावं म्हणून आम्ही तो बांधून काढला. आता काय, चोवीस तास वॉटर सप्लाय होतो.''

मी उठलो. मुलगी माझ्याबरोबर व्हरांड्याबाहेर अंगणाच्या टोकापर्यंत आली. तेथून पुढे खाली पायऱ्या होत्या आणि लांबरुंद पसरलेले ऑर्चर्ड. लहानमोठ्या पायवाटा इकडेतिकडे फुटलेल्या.

''तो जो समोरचा डोंगर दिसतो आहे ना, तिथपर्यंत आमचे ऑर्चर्ड पसरलेले आहे.'' मुलगी काहीशा अभिमानाने म्हणाली...''इकडे बरेच प्राणी आहेत. एकदा तर एक चित्ता इथे वरपर्यंत चढून आला होता. माझ्या जॉनने भुंकून भुंकून त्याला पिटाळून लावले. त्या वेळी तो खूप लहान होता. माझी अन् त्याची मैत्री बालपणापासूनची आहे.''

तिचे बोलणे फिरून फिरून पुन्हा जॉनवरच येत होते. कुत्र्याशी जर ती एवढी आत्मीय होऊ शकते, तर आईच्या बाबतीतच काय अडचण आहे ? एवढ्याच स्वाभाविकपणे त्या दोघी एकमेकींशी का नाही वागत ? कुत्रा आणि ती जेवढ्या स्वाभाविकपणे चालताहेत, किंवा त्या आणि नोकरचाकर यांचे वागणे किंवा त्या आणि मी बोलत होतो तशा स्वाभाविकपणे... निसर्गाच्या सान्निध्यात आपल्या आयुष्याचा फार मोठा भाग घालवणारी व्यक्ती आपल्या मुलीशी दुरावा करण्याइतकी स्वार्थी होऊ शकेल ? आयुष्यभर ताठ मानेने जगणारी ही बाई पुढेही तसेच जगता यावे यासाठी जी काळजी घ्यायला पाहिजे ती घेत होती हे म्हणणे जास्त सयुक्तिक वाटते. त्या गोऱ्या मुलीने आणि तिच्या नवऱ्याने त्यांना ही फक्त म्हातारी आहे असे नक्की मानलेले असणार.

—"पुढे येणार नाही ?" मी मुलीला विचारले.

—"पुढे काय आहे ? सगळं असंच आहे. खरं तर दृश्य इथूनच छान दिसतं. आता तुमची इच्छा असेल; तर तुम्ही जाऊन या. मला तर दिवसातून अनेक वेळा जावे लागते."

मी खाली उतरलो. ती मुलगी थोडा वेळ त्या टोकावरून खाली जात असलेल्या माझ्याकडे पाहत राहिली. आपण ऑर्चर्डची मालकीण आहोत एवढे सांगण्यापुरतीच ऑर्चर्डची आवड तिला असावी असे मला वाटले. तिचा चेहरा ताणामुळे आक्रसलेला होता आणि मी आलो तेव्हा जसा सहज स्वाभाविक होता, तसा आता मुळीच नव्हता. मला निदान त्या झऱ्यापर्यंत तरी जायचेच होते... जणू काही तेथे उभा राहून मी इथले सगळे मागचे-पुढचे पाहू शकणार होतो.

परत फिरेपर्यंत उन्हं करडी होऊ लागली होती आणि वातावरणात कलत्या दुपारचा आळस भरून राहिला होता. त्या व्हरांड्यात बसलेल्या होत्या. मुलीचा मात्र काही ठावठिकाणा दिसत नव्हता. व्हरांडा चढून वर आल्यावर पडद्याच्या आतून येणारे तिचे आवाज ऐकू येऊ लागले. ती जॉनशी बोलत होती. चहा वगैरे करून दिला म्हणजे नवीन आलेल्या पाहुण्यांसंबंधीचे आपले कर्तव्य संपले असे तिला वाटत असावे. एवढेसुद्धा ती बहुतेक आपल्या आईच्या हट्टासाठी करीत असावी असे वाटले.

—"आला फिरून ?"... त्यांनी विचारले. "जरा विश्रांती घ्या. झऱ्याचं पाणी प्याला ?"

"हो, खूप चवदार आहे... सगळी थकावट दूर झाली."... मी समोरच्या आरामखुर्चीवर बसत म्हणालो.

त्यांचे डोळे चमकले... जणू काही इथे बसल्या बसल्या तो झरा त्यांना स्पष्टपणे दिसत होता. एका छोट्याशा टेकडीच्या तळाशी एक गुहा. आतून न जाणे कुठून उसळत धार येत होती. सतत पाण्याची मूठ तयार व्हायची, मोडून जायची आणि थोडी पुढे येऊन सिमेंटच्या हौदात कैद व्हायची. जाता जाता त्यांच्या नजरेने माझ्यावरही आपुलकीचा वर्षाव केला. पुन्हा एकदा झऱ्याचे पाणी आपण तोंडावर शिंपडून घेत आहोत असे मला झाले. तीच शीतलता... तीच गोडी.

"खरं तर सगळे ऑर्चर्डच खूप छान आहे." मी पुन्हा म्हणालो.

"तसं काय... सगळे ऑर्चर्ड साधारपणे एकसारखेच असतात... या सीझनमध्ये अस्वलापासून खूप बचाव करावा लागला. सफरचंदांचा सगळ्यात भयंकर शत्रू म्हणजे अस्वल... फळांचं तर वाट्टोळं होतंच, शिवाय फांद्या पण कडाकड मोडून टाकतात..."

त्या लांब कुठेतरी हरवून गेल्या होत्या. समोरच्या पर्वताच्या डाव्या भागातली देवदाराची उंच उंच झाडं एका क्रमाने तोडण्यात आलेली होती आणि त्या संपूर्ण पर्वताच्या हिरवाळीत मोठ्या मोठ्या बुंध्यांनी भरलेला तो भाग मोठा कुरूप दिसत होता.

''नाही, या बागेत एक वेगळंच आकर्षण आहे...'' मी म्हणालो, ''शक्य आहे... कदाचित हिच्यावर तुमच्या आयुष्याची छाप पडलेली आहे म्हणूनही असेल...''

''पण ही आता माझी नाही. मी ही बाग विकून टाकली आहे.''

त्या खुर्चीत मागे लवंडल्या आणि टप् टप् करीत पायांवर पंखा आपटू लागल्या.

खाली... ऑर्चर्डच्या वर उन्हाचा समुद्र पसरलेला होता. फक्त झाडांचे कोवळे शेंडे दिसत होते... डोळे मिचकावीत असलेले. उंचावर सगळीकडे सफरचंदांची रोपं मोडलेल्या शरीरांची ओझी वाहात उभी होती. उंचावर शून्यात पसरलेला ऑर्चर्डचा तो विस्तार त्या वेळी एखाद्या जखमी खेचरासारखा खाली पडलेला होता.निरागसपणे त्या घराकडे टक लावून पाहत असल्यासारखा.

ऑर्चर्ड आणि त्या; त्या आणि ऑर्चर्ड. खरं तर मला सुरुवातीपासून अगदी एकरूप वाटत होत्या की त्या साध्याशा बातमीने एका क्षणात जणू काही दोघींना खंडित करून टाकले होते. एक तुकडा माझ्यासमोर आणि दुसरा खाली खड्ड्यात पडलेला होता. मला धक्का बसला.

''तर मग तुम्ही... इथे ?''... मी गयागवया केल्यासारखा.

''विकताना ज्या अटी मी घातलेल्या होत्या. त्यात एक अट ही पण होती की मी जिवंत असेपर्यंत या घरात राहीन, त्याच्या बदल्यात आर्चर्डचा मालक माझ्याकडून ऑर्चर्डच्या व्यवस्थेचं काम करून घेऊ शकतो. हा माणूस चांगला आहे, ऐकलं त्यानं... अजूनही म्हणतो की मी इथे तुमचा फक्त पाहुणा म्हणून राहतो. माझ्या मुलीची आणि तिच्या नवऱ्याची इच्छा होती की ऑर्चर्ड विकून टाकावी. त्या पैशातून ते शहरात काहीतरी व्यवसाय करतील आणि मी त्यांची पाहुणी म्हणून राहावं...''

त्यांच्या चेहऱ्यावर कटू हास्याची ओढाताण होत होती. हिरव्यागार पर्वतावरच्या वर तोंड केलेल्या त्या बुंध्यांच्याकडे पाहत असताना मी उंचावर वाढणाऱ्या वृक्षांचा विचार करीत होतो. बर्फामुळे त्यांची मुळे खराब होऊन जातात. मग ती तोडावीच लागतात. माणसाच्या पायात विष भिनले म्हणजे जसा तो पाय तोडावा लागतो तसे.

''आर्चर्ड माझे नसले म्हणून काय झाले. माझे कुटुंब माझ्याबरोबर आहे. ही सगळी काम करीत असलेली माणसं तुम्ही पाहत आहात, तशीच मी पण... आणि माझी मुलगीही माझ्या जवळ आहे. माझ्या पतीची फार इच्छा होती की तिने आमच्याजवळ राहावे म्हणून.''

त्यांचा चेहरा अतिशय तरल झाला होता. आपल्या पद्धतीने खेळ खेळण्याचा उजळपणा त्या डोळ्यात राहून राहून चमकत होता. कुलीनपणाची निर्मळ छटा त्यात तरळत असलेली... सुडौल रोपांची रूपं झळकत असलेली...पण दुसऱ्याच क्षणी हे सगळं वाहून गेलं... मऊ खडकावर पसरलेला रुक्ष हलका धुळीचा थर वाऱ्याच्या झुळुकीने उडून जावा तसे. जिथे काही उगवत नाही, जिथे झाडसुद्धा नसते अशी

पहाडाची उंची त्यांच्या चेहऱ्याने पांघरली होती. असलाच तर तिथे एक प्रकारचा निर्जीव असा लाल रंग असतो... गवतकाट्यात विस्कटलेला. जेव्हा सर्व प्रदेशात बर्फाची चादर पसरलेली असते, तेव्हाही हे दोन डोळे असेच जळत काजव्याप्रमाणे चमकत राहतील.

बाहेर पडल्यावर मी पुन्हा एकदा त्या ऑर्चर्डकडे पाहिले. दूरवरून सपाट दिसणारी जागा किती उंचसखल असते... बाहेरून उजाड दिसणाऱ्या इमारतीत इकडे-तिकडे जाणाऱ्या कितीतरी रेघा असतात तसे... सगळा सावळागोंधळ असावा तसे... मुलगी, फार्म इन्स्पेक्टर, मुलीचा नवरा... जॉन, त्या... सतत वाहत असलेला झरा.

त्या अजूनही व्हरांड्यात तशाच बसलेल्या होत्या. अशाच एकाच मुद्रेत बसत असतील. सतत... दिवसेंदिवस... दर क्षणाला जागत-झोपत, जगत-मरत असलेल्या.

# घराण्यात प्रथमच

**रमाकान्त श्रीवास्तव**

आजोबा नेहमी सांगायचे...

गतकाळातल्या कितीतरी कहाण्या आणि विशेषत: त्यांच्या लग्नासंबंधीच्या गोष्टी ! आईच्या आणि आजोबांच्या तोंडून ऐकलेल्या रीतिरिवाजांचे पुन्हा खूप जुने आणि विस्तृत स्वरूप ऐकता ऐकता आम्हाला खूप नवल वाटायचे आणि बहुतेक वेळा हसून हसून आमची मुरकुंडी वळायची. आम्हाला खूप मजा वाटायची आणि आमच्या डोळ्यांपुढे एक वेगळंच जग उभं राहायचं. जिज्जी तर आजोबांना गोष्टीचं पुस्तकच म्हणायची.

खडबडीत रस्त्यावरून ओढे-नद्या पार करीत, जंगलातून बैलगाडीत बसून दिवसदिवस अन् रात्ररात्र प्रवास करीत जाणारी वरात आणि सात सात दिवस चालणाऱ्या लग्नासंबंधीच्या गोष्टी ऐकून आम्ही रोमांचित होत असू. ते सांगायचे की त्या वेळी टॉर्च नावाची वस्तूच नव्हती. आणि गावाकडच्या लोकांना कंदील ही सुद्धा एखादी नव्या फॅशनची गोष्ट वाटायची. कधी जंगलातल्या रस्त्यातून रात्री जावं लागलं तर मशाली पेटवायचे आणि एकमेकांना गोष्टी सांगत जायचे. गोष्टीवेल्हाळ गप्पिष्ट माणसांच्या हातापाया पडून त्यांना वरातीबरोबर नेले जात असे. गावाची शीव ओलांडली की सगळीकडे निर्मनुष्य शांतता असायची आणि चांदणी रात्र नसली तर रस्ता चुकायची भीती पण असायची. वरातीत येणारी माणसं लाठ्या घेऊन यायची, फेटे बांधायची, मिशावरून ताव देत बुंदेलखंडी ठसक्यात आपल्या वीरश्रीचे आणि धैर्याचे वर्णन करायची; पण मनातून चोर-दरोडेखोरांची भीती सगळ्यांनाच वाटायची. बैलांच्या गळ्यातल्या घंटांचे आवाज, मशालींचा उजेड, घनदाट अंधारातून ऐकू येणारे रातकिड्यांचे आवाज; दरोडेखोर, भुतं, हडळी यांची वाटणारी भीती या सर्व गोष्टींचे चित्रण आजोबा इतक्या जिवंतपणे करायचे की आमच्या पाठीच्या कण्यातून एक थंड शिरशिरी वर सरकत जायची आणि आम्ही हमखास खांदे उडवून डोळ्यांच्या कोपऱ्यातून मागे पाहायचो की आमच्या पाठीशी कुणी उभं तर नाही ना !

आपल्या गादीवर मोगल बादशहांच्या थाटात लोडाला टेकून आपल्या लग्नाच्या

गोष्टी सांगत असताना आजोबांचा चेहरा खूप लाघवी वाटायचा. त्यांचे हसणारे ओठ त्यांच्या मिशीखाली लपलेले असायचे आणि आम्हाला वाटायचं की त्यांच्या मिशाच हसताहेत म्हणून.

''ठाऊक आहे...? रुखवत करायचे ना... तर बायका रात्रभर बसून सोळा शेराचे पदार्थ बनवायच्या. ह्या एवढ्या मोठ्या मोठ्या नक्षीदार करंज्या... आणखी असलेच गमती-गमतीचे पदार्थ. आणि लाडू किती मोठे असायचे ठाऊक आहे ?... अर्ध्या अर्ध्या शेराचे लाडू.''

''बाप रे !'' आम्ही डोळे विस्फारून म्हणायचो ?

''आजोबा, मग ते खायचे कसे काय ?''

''आमचे एक मधले काका होते...''

आजोबा पुढे सांगायचे, ''ते नसले तर लग्न-समारंभात काहीच गंमत नसायची. वधूपक्षाला सतावून सोडायचे. इकडे पंगत बसायची वेळ झाली की तिकडे काका बेपत्ता. शोधताहेत सगळेजण. जेवायला बसले की म्हणायचे, 'फणसाचे लोणचे आणा. फणसाचे लोणचे पाहिजे.' फणसाचं लोणचं वाढलं तर 'सुरणाचं लोणचं' मागायचे. रात्री एक वाजताच उठून म्हणायचे की 'आता दूध पिऊ या.' गाईचे दूध आणलं त्या बिचाऱ्यांनी, तर म्हणायचे की 'आम्हाला म्हशीचं दूध प्यायचंय.' म्हशीचं आणलं तर म्हणायचे की 'गाईचे दूध प्यायचंय.' ''

''आजोबा, तुम्ही नवरा मुलगा झाला होता, तेव्हा तुम्ही पण नखरे केले असतील ना ?'' जिज्जी विचारायची. असल्या गोष्टी जिज्जीच विचारू शकत असे; कारण ती आजोबांची लाडकी होती. आम्ही कधी कधी तिला चिडवायचोदेखील— 'लाडकी बिट्टी' म्हणून. जिज्जीचा प्रश्न ऐकला की आजोबांच्या मिशा आणखीनच रुंद व्हायच्या आणि लोडाला टेकून ते जरा ऐटीत बसायचे.

''अगं, काही विचारू नकोस. मांडवाखाली पंगत बसते त्या वेळी नवऱ्यामुलाने आपल्याला हवा तो आहेर मिळाल्याशिवाय जेवायला सुरवातच करायची नसते— मी अडून बसलो की मला ग्रामोफोन हवा म्हणून. शेवटी ग्रामोफोनचे पैसे घेतले तेव्हा कुठे पहिला घास खाल्ला.''

आम्ही खो खो हसत टाळ्या वाजवू लागलो. तर जिज्जी लाडाने म्हणते कशी, ''काय आजोबा, अडून अडून काय मागितलं तर ग्रामोफोन !''

''अगं पोरी, त्या काळी ग्रामोफोन म्हणजे फार मोठी वस्तू समजली जात असे.''

''त्यानंतर सासुरवाडीत नवरामुलगा फार कडक आहे, अशी माझी ख्याती झाली'' म्हणून आजोबा सांगायचे. सासुरवाडीच्या बायका त्यानंतर आजोबांना 'वाकडे कुलूप' या नावाने ओळखू लागल्या.

दद्दांचा सांगायचा ढंग काही आगळाच होता... आजोबा जरा दूर असले म्हणजे

आईच्या समोर ते खूप काही ऐकवायचे. त्यांचा मुख्य हेतू आईला चिडवण्याचाच असायचा. आणि आई पण चिडायची. त्राग्याचं निमित्त करून बहुधा आपल्या माहेरचं मोठेपण सांगायची. म्हणायची, ''...यांच्या माणसांनी तर आमच्या बाबांना खूप सतावलं. अशा काही चित्रविचित्र गोष्टींची मागणी करायचे की काही विचारू नका. यांच्या मामांचा एक पोरगा होता सूरज परसाद नावाचा. त्याने वराच्या न्याहरीच्या वेळी आमच्याकडच्या एका तरुण न्हाविणीचा धरला की हात ! हो ना... काय म्हणावं आता या वरातीत आलेल्या लोकांना ?''

दद्दा खो खो करीत हसायचे आणि म्हणायचे, ''आता सूरज परसाद तरी काय करणार ? तुमच्याकडची ती न्हावीण होतीच नखरेबाज.''

''काही नव्हती नखरेबाज.'' आई एक हात वर करीत म्हणायची, ''तिला कशाला नखरेबाज म्हणता ? तुम्ही नखरे केले की नाही ? हो, नाही तर काय.''

''आता आम्ही तर नखरे करणारच की हो. नवरामुलगा नखरा करणारच. वरपक्षानं वधूपक्षाला दाबात ठेवायचं नाही तर मग कुणी ठेवायचं ?'' दद्दांचा आवाज थोडा चढायचा.

''हो ना. आता ही तर जगाची रीतच झाली आहे म्हणा. देवानं ज्यांना पोरी दिल्या आहेत त्यांना दबूनच राहावं लागणार. आमच्या दद्दांनी एवढं चांगलं लग्न करून दिलं होतं...''

आई आम्हाला सांगायची, ''आमच्याकडची करंडी पाहिली या लोकांनी आणि पाहतच राहिले... अशी भरगच्च भरलेली... आणि ही एवढी मोठी. आणि त्यात कितीतरी पदार्थ शिगोशीग भरलेले. करंज्या, कुरड्या, पापड्या, पाकातल्या पुऱ्या, खाजा, लाडू आणि गुना तर इतका सुंदर झालेला होता म्हणून सांगू ! गुना माहीत नाही ? आता काय सांगावं ? डाळीच्या पिठाचं असं गोल गोल कडबोळं केलेलं असतं. त्याच्यामधून सासू सुनेकडेही पाहू शकते.''

आजोबा आणि दद्दा दोघेही सासुरवाडीला आपला मान कसा ठेवून घ्यावा याचे अनेक उपाय सांगायचे. आणि घराची, समाजाची रीतभात मानलीच पाहिजे असे आईला वाटायचे.

लग्न-समारंभात मानापमानामुळे होणाऱ्या लढायांच्याही गोष्टी निघायच्या. *आल्हा* (वीरगाणी) ऐकल्यानंतरच बहुधा या गोष्टी निघायच्या. पावसाळ्यात तर आम्हाला आल्हा ऐकायला सवडही नसायची. उन्हाळ्यातल्या दुपारी आई आम्हाला आल्हा ऐकवायची.

चार लाकडी खुर्च्या, टेबल आणि एक गादी असलेल्या बाहेरच्या खोलीला बैठकीची खोली असे म्हटले जात असे. छोटू मोठ्या ऐटीत तिला ड्रॉइंगरूम म्हणायचा. बैठक आणि स्वयंपाकघर यांच्यामध्ये असलेल्या अनेक कामांसाठी उपयोगात येणाऱ्या

माजघरात आमच्या उन्हाळ्यातल्या दुपारी आम्ही घालवायचो. थट्टामस्करी, पत्ते, दंगाधोपा सगळे काही या माजघरात चालायचं. एका टेबलाखाली पंखा ठेवला जायचा. मग त्याच्या तिन्ही बाजूला चादर ओली करून बांधली जायची की झाला आमचा कूलर तयार. सर्वांत आधी चादर भिजवण्याचं श्रेय आपल्याला मिळावं म्हणून आमच्यात भांडणं व्हायची. मग दुपारी आम्ही आळसावलो म्हणजे चादर कोण भिजवणार या गोष्टीवरून पुन्हा भांडणं व्हायची. मग आम्ही एकमेकाला बोटाने टोचत 'तू चादर भिजव' असे म्हणायचो. आमचे आवाज वाढले म्हणजे मग आई आम्हाला कुत्र्यामांजरांची पदवी देऊन गप्प बसायला सांगायची. आमचा आरडाओरडा शांत व्हावा म्हणून ती आम्हाला आल्हा (एक छंदविशेष) ऐकवायची. आल्ह्यात प्रत्येक लग्नानंतर एक लढाई झाली असे वर्णन असायचे. म्हणून आम्ही विचारायचो, "लग्न व्हायचे त्या वेळी हे लोक लढायचे कशासाठी ?"

आई उत्तर द्यायची, "पूर्वीचे लोक फार मिजासखोर असायचे."

...पण या सगळ्या फार पूर्वीच्या गोष्टी झाल्या. जिज्जीचं वय जेव्हा लग्नाला योग्य झालं तेव्हा या सगळ्या गोष्टींना पूर्णविराम मिळाला. जिज्जी बी.ए. पास झालेली होती आणि आता काय करायचं याची हळू आवाजात चर्चा सुरू झालेली होती. जिज्जीनं काही न करता बसून राहणं ही जणू काही अभूतपूर्व घटना होती. जिज्जीनं पुढे शिकायची इच्छा व्यक्त केली होती; पण "आता काय करायचंय आणखी शिकून ?" "पोरींच्या जातीला जास्त शिकवून काय होणार ?" किंवा "पुरे झालं आता," यासारख्या पुटपुटण्यात तिची इच्छा विरून गेली. तेव्हा तूर्त अनिर्णित, अनिश्चित, अवस्थाही काही वाईट नाही असे ठरले.

याच काळात घरात बचत योजना लागू करण्यात आलेली होती. शंभर वॅटचा बल्ब फ्यूज झाला तेव्हा बैठकीत साठ वॅटचा बल्ब लावण्यात आला. रात्री उशीरा दद्दांना जेवायला वाढताना आई जातीतल्या मुलांच्यासंबंधी बहुधा बोलणं काढायची आणि आपली मुलगी तर इतकी सुंदर आणि सुशील आहे की कोणीही हसतखेळत तिला आपल्या घरी घेऊन जाईल अशी आशा तिच्या डोळ्यांत चमकू लागायची.

मुलाच्या शोधात आपला पहिला प्रवास पूर्ण करून दद्दा जेव्हा परत आले तेव्हा ते घरात शिरताच सगळेजण त्यांच्याभोवती गोळा झाले. जिज्जी स्वयंपाकघरात निघून गेली—चहा करण्यासाठी. दद्दांनी आपली सूटकेस भिंतीला टेकवून ठेवली आणि ते खुर्चीवर बसले. आई दाराच्या आड उंबरठ्यापाशी अर्धी आत अर्धी बाहेर अशी उभी राहिली. सगळ्यांच्या नजरेत खूप जिज्ञासा होती; पण कुणाकडेही लक्ष न देता दद्दांनी आपले बूट काढून ठेवले, सदऱ्याची बटणं काढली आणि दमल्यासारखे खुर्चीवर बसले. आमच्या घरात सगळेजण झोपी गेल्यानंतरच पसरते तसली शांतता काही क्षण खोलीत

पसरली. शेवटी आजोबांनी विचारले, ''काय झाले ?''

''हूं...'' दद्दांनी जणू काही चकित होऊन त्यांच्याकडे पाहिले. मग हळूच म्हणाले, ''काय व्हायचंय ? खंडीभर हुंडा मागताहेत !''

मग कोणीच काही बोलले नाही. आई आत निघून गेली. दादा 'हरिओम'चा गजर करीत आपलं लक्ष दुसरीकडे वेधवू लागले. जिज्जीने चहा केला आणि ती कप घेऊन बाहेर आली.

त्यानंतर दद्दा जेव्हा केव्हा प्रवासाहून परत येत तेव्हा आम्ही सगळेजण असेच काही न बोलता-सवरता त्यांच्या आसपास वावरायचो. जणू काही आम्ही विशिष्ट हेतूने नव्हे; तर उगीचच इकडे तिकडे फिरतो आहोत. बहुधा दद्दा काही सांगत नसत आणि कोणी काही विचारीत नसे. जिज्जी सगळ्यांचीच, विशेषत: दद्दांची नजर चुकवीत इकडच्या तिकडच्या फालतू कामात स्वत:ला गुंतवून घ्यायची. जिज्जीचं बोलणंही कमी झालेलं होतं. हो, पण आजोबांजवळ जाऊन हळूहळू गप्पा मारण्याचा तिचा क्रम मात्र चालू होता. कधी कधी जिज्जी आपली जुनी पुस्तकं काढून त्यातल्या कविता आजोबांना वाचून दाखवायची आणि आजोबा मध्ययुगीन कवींची व्याख्या जिज्जीला समजावून सांगायचे, हे पाहून आम्हाला खूप गंमत वाटायची. आजोबांना सूरदासांची किंवा तुलसीदासांची कविता समजावून सांगा म्हटले की आधी ती कविता जिज्जीला गाऊन दाखवावी लागायची. मग आजोबा अर्थ सांगायचे. पण खोलीत सगळेजण गोळा झाले की जिज्जी दाराच्या आड अर्धी स्वत:ला दडवून उभी राहायची.

काहीही विशेष न घडता एक वर्ष निघून गेलं होतं. फक्त जिज्जी एकदा टायफॉइडने आजारी पडली होती. तिची सगळ्यात जास्त काळजी आजोबांनाच होती आणि त्यांनीच तिची सर्वात जास्त शुश्रूषाही केली. तिच्या औषधपाण्याचं आणि पथ्यांचं नीट वेळेवर व्हावं म्हणून त्यांनी आपल्या दिनक्रमात खूप बदल केले होते. मी छोटूला नेहमी म्हणायचो, ''आपल्या लाडक्या नातीचं करता करता म्हाताऱ्याला काहीतरी होऊन बसायचं.''

ही एक घटना सोडली तर जे काही होत होतं ते इतक्या अदृश्यपणे होत होतं की वरून कोणताही बदल दिसून येत नव्हता. तसे आमचे सदरे खूप दिवस टिकायचे; पण आता आमच्या गंजिफ्राकला पहिल्यापेक्षा जास्त भोकं पडू लागली होती. आमचे गंजिफ्राक क्रमाक्रमाने विकत घेतले जात असत. त्यामुळे भोकं मोठी होत जायची. या त्रासातून वाचण्यासाठी मी गंजिफ्राक वापरायचंच सोडून दिलं. आणि ही फॅशन आहे हे दाखवण्यासाठी सदऱ्याचं वरचं बटण लावायचं सोडून दिलं. असले बदल कुणाच्या लक्षात येण्यासारखे नव्हते आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या ध्यानात ते आलेही नाहीत. भाजी आणायला मीच जायचो. मोठी पिशवी घेऊन जाण्यात आता काहीच अर्थ नव्हता म्हणून मी लहान पिशवी न्यायला लागलो होतो. पिशवी-बदलाची ही क्रिया कुणाच्याही ध्यानात

आली नाही. वाटेत कुणी विचारलंच तर म्हणायचं परवलं (एक महाग फळभाजी) आहेत. आत असायची स्वस्त तोंडली. दद्दांना प्रमोशन मिळाले होते आणि आता त्यांचा पगार सत्रा रुपये पासष्ट पैशांनी वाढला होता. आता एवढ्या पैशात सहा किलो तरी दूध आलं असतं; पण आम्ही एक पाव दूध कमीच केले. शेंगदाण्याच्या तेलाऐवजी आम्ही सोयाबीनचे तेल वापरू लागलो होतो. एवढेच नव्हे; तर त्याची चवही आता आम्हाला आपलीशी वाटू लागली होती.

ती संध्याकाळ इतर संध्याकाळसारखीच खूप ओळखीची वाटणारी होती. गल्लीतले, बाहेरचे अनेक अस्पष्ट आवाज घेऊन ती घरात शिरलेली होती. मी फिरून म्हणजेच मंडईत चक्कर टाकून भाजी घेऊन परत आलो होतो. आईला भाज्यांच्या किमती सांगितल्या आणि भावताव करून जवळ जवळ साठ पैसे वाचवले, ते सांगून माझ्या ज्ञानाचा आणि चातुर्याचा पुरावा मी तिच्यापुढे मांडला होता. कोहळ्याचा आणि ढेणसांचा भाव किलोला चार आणे कमी झाला आहे हे ऐकून आईला बरे वाटले. नवं सरकार महागाई कमी करण्याच्या दिशेने पावलं उचलीत आहे असा विश्वास तिला हवासा होता.

दद्दा नुकतेच ऑफिसातून परत आलेले होते. ते उत्साही आहेत का उदास आहेत याचा पत्ता त्यांच्या चेहऱ्यामोहऱ्यावरून कधीच लागत नसे. सकाळ-दुपार-संध्याकाळ केव्हाही पाहा, त्यांच्या चेहऱ्यात काही बदल नसायचा. आमच्याकडे घड्याळ असल्यामुळे सकाळ-संध्याकाळ वेळ कळायची; पण एरव्ही त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून ते ऑफिसला चालले आहेत का ऑफिसातून परत आले आहेत हे सांगणे कठीणच होते. आईने त्यांना चहा हवा का म्हणून विचारले तेव्हा अत्यंत प्रसन्न चित्ताने ते म्हणाले की ऑफिस सुटल्यावर घरी परत येताना वाटेत लोकांनी दोनदा चहा पाजला म्हणून आता एवढ्यात चहा नको, जरा वेळाने घेऊ. आई आणि आम्ही सगळेजण दद्दांकडे मोठ्या कौतुकाने आणि आदरभावनेने पाहत होतो—लोक त्यांचा केवढा मान राखतात. शेजाऱ्याकडून मागून आणलेले वर्तमानपत्र छोटूने लगेच आजोबांकडून घेऊन दद्दांना आणून दिले. दद्दा आले म्हणजे वर्तमानपत्र मागून आणायचं काम छोटूकडे होते. आज त्याने ते आधीच करून टाकले होते. आजोबा सगळं वर्तमानपत्र अथपासून इतिपर्यंत वाचायचे. मग त्यासाठी मॅग्निफाइंग ग्लास का वापरावा लागेना. छोटूने तो शाळेतून पळवून आणला होता. पण दद्दा फक्त पाच-सात मिनिटांत वर्तमानपत्रं उलटेपालटे करायचे. दद्दांनी वर्तमानपत्र उघडलं तेवढ्यात आजोबा म्हणाले, ''सध्या काय चाललंय काही कळत नाही. वर्तमानपत्रात जिकडे पाहावं जिकडे संप, दरोडा, चोरी, ॲक्सिडेंट आणि असलंच काहीबाही !''

खोलीत फक्त वर्तमानपत्र उलटलं जाण्याचा आवाज येत होता, त्याच वेळी दाराशी उभी राहून जिज्जी म्हणाली, ''मी नीरूबरोबर जाऊन टायपिंग शिकणार आहे.''

रात्रीच्या शांत वातावरणात चौकीदाराने जोरात शिट्टी फुंकावी तसं जिज्जीचं वाक्य होतं. एकदम जणू काही झणत्कार झाला आणि मग सारे कसे शांत शांत ! आजोबांनी भिवया आकुंचित करीत जिज्जीकडे पाहिले आणि मग ते जपमाळ फिरवू लागले. झोपेतून अचानक जागे झालेल्या माणसाप्रमाणे दद्दांनी विस्फारलेल्या नेत्रांनी जिज्जीकडे पाहिले आणि मग ते इकडेतिकडे पाहू लागले. आईच्या पुटपुटण्यातून पहिली प्रतिक्रिया बाहेर पडली—"हो, तू टाइप शिकणार म्हणे ! घरात काय कामधाम नाही का ?"

"घरचं कामधाम करूनही खूप वेळ शिल्लक उरतो," जिज्जीने सरळसाधेपणाने उत्तर दिले. जिज्जीच्या या उत्तरानंतर बोलणी सुरू झाली ती सतत पंचेचाळीस मिनिटे चालू राहिली. जिज्जी बोलायची, मग आई बोलायची. आपण काय बोलावं याचा निर्णय दद्दांना करता येत नसावा. कधी ते आईच्या बाजूने बोलायचे; तर कधी जिज्जीच्या बाजूने बोलायचे.

तो एक मोठाच वादविवाद होता आणि आम्हाला त्यात टाळ्या वाजवणाऱ्या श्रोत्यांएवढीही किंमत नव्हती; पण या कॉन्फरन्समध्ये जिज्जी टायपिंग शिकणार हे ठरलं एवढं आम्हाला समजलं. जिज्जीने इन्स्टिट्यूटची फी भरली आणि एके संध्याकाळी ती साधीसुधी साडी नेसून तशाच साध्यासुध्या चेहऱ्याने नीरू या आपल्या मैत्रिणीबरोबर टायपिंग शिकायला बाहेर पडली.

मुलीने टायपिंग शिकावे हे काम आमच्या घराण्यात प्रथमच घडलं.

जिज्जी टायपिंगची परीक्षा पास झाली होती आणि सगळं काही ठीक चाललेलं होतं. ठीक म्हणजे पहिल्यासारखंच काहीही विशेष न घडता. महिन्यातल्या पहिल्या पंधरवड्यात वरण आणि भाजी शिजायची. नंतर फक्त वरण. शेवटच्या आठवड्यात दद्दा मुगाच्या डाळीचे गुणवर्णन करायचे आणि बहुधा म्हणायचे— "आज फक्त खिचडी होऊन जाऊ द्या आणि बरोबर येऊ द्या चटणी आणि लोणचं." दद्दा "येऊ द्या" असं काही म्हणायचे की जणू गावस्करचाच चौकार येतो आहे.

दद्दांचे प्रवास चालूच होते. जिज्जीच्या फोटोच्या कितीतरी कॉप्या काढलेल्या होत्या. पाकिटाच्या किमती वाढल्या किंवा बसचे आणि रेल्वेचे भाडे वाढले की ती गोष्ट त्यांना फार लागायची. नवीन बजेटात या खात्यात टॅक्स वाढला की ते चिडायचे अणि म्हणायचे, "....ना गोळ्या घालून मारलं पाहिजे." एकदा छोटूने विचारले होते, "कुणाला ?" तेव्हा दद्दा चिडले आणि त्याला दटावत म्हणाले, "प्रत्येक गोष्टीत तोंड घालत जाऊ नकोस."

असल्याच रिकामटेकड्या दिवसात एके दिवशी जिज्जीच्या नावाने एक पाकीट आले तेव्हा सगळेजण थक्क होऊन गेले. महिन्याचा दुसरा शनिवार होता आणि दद्दा भोजन करून झोपले होते. जिज्जी शेजारी आपल्या मैत्रिणीकडे गेलेली होती. छोटू त्याचा मित्र

किन्ना याला पैसे साठवायच्या त्याच्या पेटीत ज्या गतीने पैसे जमा होत होते त्याचा हिशेब करून आपण रिस्टवॉच केव्हा घेणार ते सांगत होता. त्याच्या हिशेबाप्रमाणे जवळपास पंधरा वर्षे लागणार होती. पंधरा वर्षांनंतर घड्याळाची किंमत किती होईल हे गणित छोटूला सांगावे की नाही या विचारात मी होतो. छोटू आणि किन्ना यांनी घड्याळानंतर टेपरेकॉर्डरचा हिशेब करायला सुरवात केलेली होती. तेवढ्यात पोस्टमनचा आवाज आला-- 'पत्र..' आम्ही धावत जाऊन जमिनीवर पडलेले पाकीट उचलले पण त्यावर जिज्जीचे नाव आहे हे पाहताच आम्ही चकित झालो. आमच्या घराण्यात प्रथमच एखाद्या मुलीच्या नावाने पत्र आलेले होते. आम्ही त्या पाकिटाकडे भयभीत नजरेने पाहत राहिलो. ते पाकीट म्हणजे जणू काही टाइम बॉम्ब असावा अशा दृष्टीने. मग आम्ही ते दद्दांना नेऊन दिले. दद्दांनी आश्चर्याने पाकीट उलटसुलट करून पाहिले आणि मग म्हणाले— ''अरे हे तर सरकारी दिसतेय.''

पाकीट उघडून पाहिल्यावर समजलं की इंटरव्ह्यूचा कॉल आला आहे. एम्प्लॉयमेंट ऑफिसात जिज्जीने नाव कधी नोंदवले आणि अर्ज कधी केला याचा आम्ही अचंबा करीत होतो. तेवढ्यात जिज्जीला बोलावून आणण्यासाठी छोटू बाणासारखा केव्हाच सुटला होता. जिज्जीला अर्ज भरता येतो याच गोष्टीचे दद्दांना कितीतरी वेळ नवल वाटत होते.

जिज्जी घरी आली तेव्हा पहिले आक्रमण आईने केले. अत्यंत स्पष्ट आणि टोचणाऱ्या शब्दात ती म्हणाली की, ''जिज्जीकडून ही अपेक्षा नव्हती. लिहाय-वाचायला शिकवलं याचा अर्थ पोरीने वाटेल ते करावं असा नाही. काही न सांगतासवरता नोकरीसाठी अर्ज करायचा याचा दुसरा काय अर्थ होतो ?''

जिज्जी पूर्ण धारिष्ट्याने म्हणाली, ''नोकरी करून घरी मदत करणं यात काय वाईट आहे ? अर्ज असाच केला होता उगीच. सगळ्यांना सांगून करावं असं यात काय विशेष आहे ?''

दद्दांनी अडवले, '' पण घरात सगळ्यांशी विचारविनिमय करूनच काम करायला पाहिजे की नको? मी म्हणतो विचारायला किंवा सांगायला काय हरकत आहे ? फॉर्म कुणाकडून भरून घेतलास ?''

''फॉर्म मी स्वतःच भरला होता,'' जिज्जी हळूच म्हणाली.

''हूं....'' दद्दांनी गंभीरपणे डोके हलवले; पण त्यांच्या ओठांचा एक कोपरा राहून राहून वाकडा होत होता. त्यांना हसायची इच्छा तर असते; पण गंभीरपणा टिकवून ठेवणे आवश्यक असते, अशा वेळी त्यांचे असे होते हे आम्हाला ठाऊक होते. थोडा वेळ खोलीत एकदम शांतता पसरली. आजोबा आपल्या गादीवर तक्क्याला टेकून बसले होते. जेव्हा बोलणी चालू होती तेव्हा मांडी घालून ते अर्ध-पद्मासन मुद्रेत थोडे पुढे वाकून बसले होते आणि एका हाताने मांडी थोपटीत होते. त्यांच्या नजरेत आश्चर्य

होते. कधी ते जिज्जीच्या चेहऱ्याकडे पहायचे तर कधी दद्दांच्या चेहऱ्याकडे पहायचे ! पण या अस्वस्थ शांततेनंतर लगेचच खूप मोठा वादविवाद झाला. तर्कवितर्क, विरक्ती, जळफळाट, रुसणे-समजूत घालणे या प्रकारांनंतर बोलण्याचा वेग कमी होत गेला आणि शेवटी नोकरी मिळाली तर पगार किती मिळणार या गोष्टीवर प्रकरण संपले.

''सगळे मिळून सहाशेच्या आसपास मिळतील.'' जिज्जीने असे सांगितल्यावर पुन्हा शांतता पसरली.

''बरं, काय घाई आहे, विचार करू. आता रात्रीच्या जेवणाचं बघायला हवं.'' गुडघ्यावर हातांचा जोर देऊन उठत आई म्हणाली— ''लेकीसुनांना नोकरीला लावावं हे काही आपल्याला पसंत नाही. पण आता सगळ्यांचं मत काय असेल तसं करू.''

नोकरी मिळाल्यावर पहिल्या दिवशी जिज्जी अगदी साध्या कपड्यात ऑफिसला निघाली तेव्हा आम्हीच नव्हे; तर आसपासच्या दोन-चार घरातले लोकही कुतूहलाने पाहत होते. आमच्या घराण्यात प्रथमच एखादी मुलगी नोकरी करायला निघाली होती. दद्दा पण ऑफिसला जाण्यासाठी जिज्जीबरोबरच बाहेर पडले होते. आईच्या चेहऱ्यावर परिस्थितीशी मिळतेजुळते घेतल्याचा भाव होता. तिच्या चेहऱ्यावर चिडल्याची किंवा उपेक्षेची भावना नव्हती खरी; पण अलिप्तपणाच्या आवरणाखाली हेलावणारा असंतोष आमच्या लक्षात सहजच येत होता.

पण एक तारखेला जेव्हा जिज्जीने पगार आणून दिला तेव्हा आई हसली होती आणि त्या पगाराचा परिणाम पंधरा-सोळा दिवसांनंतर निश्चिंतपणाच्या रूपाने दिसू लागला तेव्हा तिचा चेहरा संतोषाने झळकू लागला. महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात भोपळ्याची भाजी आणि खिचडी याच्याऐवजी ती वांग्याची किंवा भेंड्यांची भाजी करू लागली तेव्हा तिला होणारा हार्दिक आनंद आणि आंतरिक अभिमान ओळखणे फारसे कठीण नव्हते.

जिज्जीला नोकरी मिळाल्यानंतर काही महिन्यांनी आईला आणि दद्दांना असे वाटले की आता कमावत्या मुलीचे लग्न हां हां म्हणता होऊन जाईल. यावेळी दद्दा प्रवासाला निघाले तेव्हा सगळ्यांना खात्रीच वाटत होती. यावेळी दद्दा नवीन सदरा घालून निघाले होते. पण प्रवासाहून दद्दा परत आले तेव्हा त्यांचे हे परत येणे पूर्वीच्या परत येण्यासारखेच ठरले—उदास आणि निष्फळ. पण या वेळी चर्चा चालू असताना जिज्जी नेहमीप्रमाणे आत गेली नाही.

...ही गोष्ट आम्हाला आश्चर्याची वाटली होती. त्या दिवशी संध्याकाळी घरी परत येताना जिज्जी ऑफिसातल्या आपल्या एका मैत्रिणीला आणि सहकाऱ्याला घेऊन घरी आली होती. ते बैठकीत बसले तेव्हा आम्ही दारातून वाकवाकून त्यांना पाहू लागलो.

मी विनाकारणच दोन वेळा बैठकीतून आतबाहेर केले. आणि छोटू पडद्याला धरून तो गोल गोल फिरवीत कणकीसारखी गुंडाळी करू लागला. लोक हसू लागले. तेव्हा तो पडद्याची गुंडाळी पकडून उड्या मारत नाचू लागला. जिज्जीच्या मैत्रिणीने विचारले, ''नाव काय बाळ तुझं ?''

तेव्हा बेसूर आवाजात तो गाऊ लागला - ''मै हूं डॉन... मै हूं डॉन.''

त्याचा हा गावंढळपणा मला अजिबात आवडला नाही. तेव्हा त्याला हलकेच एक चापटी मारत मी आत जात म्हणालो, ''हा कसला गावंढळपणा आहे ?''

आपली लाज झाकण्यासाठी आणि ऐट दाखवण्यासाठी तो म्हणाला— ''गप बे'' आणि पुन्हा गाणे म्हणू लागला. मी त्याने माजवलेल्या उत्पाताची माहिती जिज्जीला देण्यासाठी गेलो तो आई आणि जिज्जी समोरासमोर ठाकलेल्या. जिज्जीने सांगितले होते— ''आज ऑफिसमधल्या काहीजणांच्या बरोबर सिनेमाला जाणार आहे.''

आई काही क्षण अगदी गप्प बसून जिज्जीकडे रोखून पाहू लागली. मग कुजबुजली— ''तो माणूस कोण आहे ?''

''वर्मा आहेत.'' जिज्जी म्हणाली, ''ऑफिसात आमच्याबरोबरच काम करतो.''

''हूं...'' तीक्ष्ण दृष्टीने आई पाहत राहिली. मग जवळपास कैफियत ऐकून घेण्याच्या भावनेने अगदी हळू पण बोचऱ्या आवाजात तिने विचारले, ''मग काय त्याच्याबरोबर जाणार आहेस ?''

''आणखीही लोक आहेत.'' जिज्जी साधेपणाने म्हणाली, ''सात-आठजण आहेत. मुली पण आहेत.''

''हूं.'' आईने असहमतीच्या भावनेनेच संमती दिली. वास्तविक तिची परवानगी कुणी मागितलीही नव्हती. मग पंधरा मिनिटांनंतर आमच्या घराण्यात प्रथमच एखादी मुलगी आमच्या मंडळींना पूर्णपणे अनोळखी असलेल्या लोकांच्या बरोबर काही तासांसाठी बाहेर गेली.

''हे सगळं जे काही चाललंय ते आम्हाला बरं वाटत नाही,'' आईने प्रकरण कुरतडायला सुरवात केली.

''हो, पण गोष्ट अशी आहे की...'' दद्दांचे बोलणे भिडले.

... दुसऱ्या खेपेला वर्मा जिज्जीबरोबर एकटाच आला—सहजच. लहान होत चाललेल्या दिवसांची संध्याकाळ होती. पातळ चहा, स्वस्त भाजी आणि मसाल्याच्या वासांनी आणि डोंगरावरच्या व आरतीच्या आवाजांनी भरलेली. दद्दा आज थोडे लवकरच आले होते. जिज्जी अजून कशी आली नाही—या बाबतीत आजोबांची दोनदा काळजी व्यक्त करून झाली होती. आम्हालाही खरोखर काळजी वाटू लागली होती. एवढ्यात

जिज्जीचे आगमन झाले. जिज्जी आत निघून गेली आणि वर्मा दद्दांच्याबरोबर गप्पा मारू लागला. नंतर चहा-बिस्किटे घेऊन जिज्जी पण बैठकीत आली. वर्मा गेल्यानंतर आईने दद्दांना विचारले, ''हा पोरगा आपल्या जातीचा आहे का ?''

''नाही ना !'' दद्दा हळूच म्हणाले आणि मग गप्प बसून आपली बोटे मोडत राहिले.

''आपल्याला काही हे पसंत नाही.'' आईने पुन्हा विषयाला तोंड फोडले.

''हो... पण त्याचं काय आहे,'' दद्दाही भिडले.

दद्दा प्रवासाहून परतले होते...

कोट काढून ते खुर्चीवर बसले होते आणि आईने ताबडतोब चहा तयार करून आणला होता. आम्ही थोड्या वेळापूर्वी प्यालो तसला चालू चहा नव्हे. जास्त दूध घालून तयार केलेला स्पेशल चहा होता तो. दद्दांच्या चेहऱ्यावर या वेळी पूर्वीसारखा थकलेपणा नव्हता. आम्ही सगळे जवळपास रेंगाळत होतो. जिज्जी ऑफिसातून परत आलेली नव्हती; पण तिची यायची वेळ होऊन गेलेली होती. आजोबा, रोजच्याप्रमाणे छडी घेऊन बाहेरच्या रस्त्यावर फिरायला जाण्याची तयारी करीत होते. दद्दा आले म्हणून त्यांनी आपल्या कार्यक्रमात बदल केलेला होता आणि आपली छडी कोपऱ्यात ठेवीत गादीवर बसले होते... त्यांच्या विशिष्ट मुद्रेत.

आजोबांनी विचारले, ''काय, कसं काय झालं ?''

''यावेळी थोडीफार आशा तरी आहे.'' दद्दा चहाचा घोट घेत म्हणाले.

''पूर्ण आशा का नाही ?'' आईने विचारले.

''आता त्याचं काय आहे की त्या लोकांनी स्पष्ट असं काहीच सांगितलं नाही. येऊन जाऊन हेच म्हणाले की हुंडा चांगला मिळाला पाहिजे. लग्न स्टँडर्ड व्हायला हवं आहे. मुलगा चांगला आहे आणि घरबीरही ठीक आहे. पण...'' दद्दा आपल्या तळव्याने पाय चोळीत समोरच्या भिंतीकडे पाहू लागले.

आजोबा घसा खाकरत म्हणाले, ''हरिओम'' आणि गुडघ्यावर थापट्या मारू लागले. आता काय बोलावे हे कुणाला सूचत नव्हते. तेवढ्यात आई म्हणाली, ''जर बोलणे जमत असतील तर मी म्हणते थोडंफार कर्ज काढून उरकून टाकावं...''

आईचे बोलणे अजून पूर्ण झालेले नव्हते, तेवढ्यात जिज्जी ऑफिसातून परत आली. तिने आईचे बोलणे ऐकले होते. ते जाणूनच उभी राहिली होती. तिने पाळीपाळीने सगळ्यांच्याकडे एकदा पाहून घेतले. तिचे यावेळी हजर असणे सगळ्यांनाच कसेतरी वाटले. आई तिला म्हणाली, ''जा, हातपाय धुवून घे आणि चहा पी.''

तरी पण जिज्जी तशीच उभी राहिली आणि काही क्षण गेल्यानंतर म्हणाली, ''कर्जबिर्ज काढून लग्न करायचं ठरवता आहात का तुम्ही सगळे ?''

सगळ्यांच्या नजरा आश्चर्यानं विस्फारित झाल्या. आजोबांच्या हातातला कप निसटता निसटता वाचला. आमच्या घराण्यात प्रथमच एखाद्या मुलीने आपल्या स्वत:च्या लग्नाबद्दल घरातल्या माणसांशी चर्चा केली होती. आईच्या नजरेतलं आश्चर्य लगेचच तिरस्कार आणि क्रोध या भावनेत बदलून गेलं. ती कडवटपणाने म्हणाली, ''काय झालं, मुलींच्या लग्नात सगळं जग कर्ज घेत असतं. तुला काय करायचंय याच्याशी. छान निर्लज्जपणा शिकून आलीय कार्टी.''

''तुम्ही सर्वजण माझी काळजी करू नका. माझ्या लग्नासाठी सगळ्या घरादाराला कर्जाच्या खाईत लोटण्याची गरज नाही,'' जिज्जी आईकडे पाहत म्हणाली.

''आम्ही काळजी करणार नाही तर मग कोण काळजी करणार ?'' दद्दांनी सुनावणीच्या सुरात विचारले.

जिज्जी थोडा वेळ जणू काही आपल्या स्वत:चा अंदाज घेत राहिली. खोलीत एक विचित्र तऱ्हेची, श्वास कोंडल्यासारखी शांतता पसरली. सगळेजण जिज्जीकडे पाहत होते. शेवटी मोठ्या धैर्यानं जिज्जी शांतपणे म्हणाली, ''मी स्वत:च करीन दद्दा.''

''वा:, आली मोठी स्वत:च करणारी. तोंड पहा हिचं. नोकरी करायला काय लागली की लगेच सगळ्या गोष्टी आपल्या मनाप्रमाणे करायला मोकळी झाली म्हणायची,'' आई तीव्र स्वरात म्हणाली.

''मुलगा शोधण्यासाठी दारोदार भटकण्याची काहीएक गरज नाही.'' जिज्जीचा आवाज किंचित थरथरत होता; पण तरीसुद्धा त्याचा तोल ढळलेला नव्हता. ''मी स्वत:... म्हणजे... असं की मी माझं ठरवलेलं आहे.''

एव्हाना दद्दांचा श्वासोच्छ्वास वेगानं होऊ लागला होता आणि आता तर ते जाम भडकले होते. आधी त्यांनी प्रचंड आश्चर्यानं जिज्जीकडे पाहिले. नंतर त्यांच्या डोळ्यांतून जणू काही अंगार बरसू लागले होते. घृणेच्या कटुतेने भरलेल्या तीव्र सुरात ते म्हणाले, ''फार पुढे चाललीस तू. शिकून नोकरी करायला लागलीस अन् स्वत:ला एकदम स्वतंत्र समजू लागलीस ! काय ?... आं... काय ?'' दद्दांना शब्द सापडत नव्हते. त्यांचे ओठ थरथरत होते आणि त्यांच्या तोंडातून थुंकीचे कण उडत होते. रागाने थरथरणाऱ्या आवाजात ते पुन्हा म्हणाले, ''असली गोष्ट तोंडाने बोलायची हिंमत तरी तुला कशी झाली ?... हेच सगळं चाललं होतं काय नोकरीच्या नावाखाली... मी म्हणतो... मी म्हणतो...''

''काय तमाशा चालवलाय ?'' अचानक आजोबा तीव्र सुरात ओरडले. कितीतरी काळानंतर एखाद्या घरगुती प्रकरणात बोलून त्यांनी आपले अस्तित्व जाणवून दिले होते... अरे, आम्ही तर झाल्यागेल्या जुन्या जमान्यातली माणसं आहोत. जमान्याची जशी पद्धत होती तसं आमचं आयुष्य घालवलं आम्ही. पण तुम्ही तर चालू जमान्याचे लोक आहात. तुम्हाला आपल्या लेकीचं भलेपण दिसत नाही का ?''

तेव्हा आम्हाला कळलं की ते दद्दांना बोलत आहेत. नाही तर आधी आम्हाला वाटलं होतं की जिज्जीच्याच विरुद्ध आणखी एक मोर्चा सुरू झाला आहे म्हणून. आजोबांचा आवाज चढत गेला, ''दारोदार भटकता तेव्हा घराण्याची इज्जत जात नाही का ? आता राहिली कुलमर्यादेची गोष्ट, तर तिला घेऊन काय चाटायचं आहे ? अरे, दारादारावर डोकं घासून टेंगूळ आलं; पण चकरा मारायला लावणाऱ्या त्या हरामखोरांसमोर तुमचं तोंड उघडत नाही. माझ्यासारख्या म्हाताऱ्याला जे समजलं ते तुम्हाला समजत नाही ! काय वाईट सांगतेय ही पोर ? बोला, काय वाईट सांगतेय ?'' धपकन् एखादी वस्तू पडल्यानंतर पसरते तसली शांतता खोलीत पसरली ! जिज्जी आत निघून गेली. आई-दद्दा मान खाली घालून बसले ! आम्ही उगीचच आनंदित झालो.

# जहाज

सत्येनकुमार

मला नेहमीच असे वाटत आलेले आहे की आठवण ही बर्फासारखी असते. कोणतीही वस्तू त्यात जशी ठेवावी तशीच राहते.

जवळजवळ वीस वर्षांनंतर मी हे शहर पाहत होतो. काहीही बदललेले नव्हते. तोच तलाव, त्याच उंचसखल सडका, त्याच समोरासमोर उभ्या असलेल्या खूप जुन्या आणि खूप नव्या इमारती. पण बऱ्याचशा गोष्टी नक्कीच बदललेल्या असल्या पाहिजेत. तलाव खोल झाला असेल नाहीतर उथळ तरी. रस्ते रुंद झालेले असतील. काही खूप जुन्या इमारती पडल्या असतील. आणखी काही नव्या इमारती जुन्या झालेल्या असतील. बऱ्याच नवीन इमारतीही झालेल्या असतील... पण टॅक्सीच्या खिडकीतून पाहत असताना शहर मुळीच नवे वाटत नव्हते.

पण थोड्या वेळाने टॅक्सी अचानक थांबली तेव्हा मी एकाएकी थबकल्यासारखाच झालो. माझ्या बाजूच्या खिडकीच्या दूरपर्यंत ओसाड पसरलेल्या जागेवर नजर जणू काही चिकटून बसली होती. चमकून मी दुसरीकडे पाहिले. गाडी एका खूप मोठ्या हवेलीच्या कंपाउंडमध्ये येऊन थांबली होती. पण मुराद मंझिल...? आणि त्याचबरोबर मनात वीस वर्षांपूर्वीच्या एका झगमगत्या हवेलीचा ग्लॉसी प्रिंट जणू काही उमटला.

अचानक नजर पोर्चच्या वर मधोमध लावलेल्या संगमरवरावर थबकली. काळ्या दगडात लावलेली उर्दूतील मोठी मोठी अक्षरे दिसत होती - 'मुराद मंझील' आणि त्याच्या खाली — 1916.

टॅक्सी ड्रायव्हरने काही म्हणायच्या आधीच मी दार उघडले आणि पैसे चुकते करून सामान उतरवून घेऊ लागलो.

धुक्याने भरलेली धूसरशी एक सकाळ आणि निद्रिस्त ओसाडपणाने वेढलेली मुराद मंझिल. मी अजूनही तसाच उभा होतो. डोळ्यातले वीस वर्षांपूर्वीच्या झगमगत्या मुराद मंझिलचे चित्र पसरत चाललेल्या धुक्यात विरून जात होते आणि हळूहळू सगळ्या गोष्टींची नव्याने ओळख होऊ लागली होती. पोर्च, त्यात उभी असलेली काळी ब्यूक, उंच उंच खांबांनी वेढलेले लांबच लांब व्हरांडे, लॉन, कारंजे—सगळे काही तेच होते,

पण... आणि अचानक आणखी एक चित्र मनात जागे झाले.. युरोपातून परत येताना कोणत्या तरी बंदरावर एक जहाज पाहिले होते. डॉकयार्डपासून बरेचसे बाजूला उभे असलेले एक जुने, मोडके, कामातून गेलेले जहाज...

अचानक पोर्चच्या दुसऱ्या बाजूने कोंबड्यांचा एक थवा कलकलाट करीत बाहेर पळत गेला. नीरवता जणू काही झोपेत दचकली.

कंबरेत वाकलेली एक म्हातारी बाई इकडेच येऊ लागली होती. मी पुढे झालो.

''कोण ?'' बहुतेक पावलांचा आवाज ऐकून म्हातारीने विचारले.

''स्सलाम आलेकुम !'' जवळ जात मी म्हणालो.

उत्तरादाखल म्हातारी काहीतरी पुटपुटत राहिली आणि मग माझ्याकडे पाहू लागली.

''जनाब रफतुल्लाखानसाहेबांना...'' मी बोलायला सुरवात केली. मग लगेच वाक्य पूर्ण केले. ''मी दिल्लीहून आलो आहे.''

म्हातारे डोळे आता माझ्याकडे नीट पाहू लागले होते. उत्तर मिळाले, ''रफत मियाँ तिकडे आहेत.... जा तिकडे.'' तिने आपल्या पाठीकडे खूण केली.

मी पुढे गेलो. दुसरीकडे कोपऱ्यातल्या भागात एक दार होते. बाहेर एक लहानशी नेम प्लेट लावलेली होती — मुमताज जहाँ बेगम. मग समोरच्या ओट्यावर चढून मी नेम प्लेटच्या खाली लावलेले कॉल बेलचे बटण दाबले.

थोड्या वेळाने दार उघडले. एक प्रौढ साहेब ड्रेसिंग गाउन घातलेले, डोळे चोळीत उभे होते.

''कोण...?''

मी सलाम केला आणि मग म्हणालो, ''मी इमरोज... दिल्लीहून...'' मी एवढे सांगत होतो. तोवरच ते म्हणाले, ''अरे... अच्छा, अच्छा...! आओ मियाँ, आओ...!'' निद्रेच्या खुमारीचे काही पापुद्रे दूर झाले होते. माझ्या खांद्यावर हात ठेवून आत येत त्यांनी विचारले, ''सामान वगैरे ?...''

''जी, बाहेर...''

''ठीक आहे. आणवून घेऊ...या.''

आम्ही एका खोलीत दाखल झालो. बहुतेक ड्रॉइंगरूम होती.

''जी.टी.ने आला असाल...'' माझ्या समोरच्या सोफ्यावर बसत त्यांनी विचारले.

''जी हाँ.''

''तुमच्या वडिलांचे पत्र मिळाले होते,'' ते म्हणाले. मग ''एक मिनिट'' म्हणत उठले, ''चहा सांगून येतो.'' आणि ते समोरच्या दारातून आत निघून गेले.

का कोण जाणे पण मला एकदम बरे वाटले. टॅक्सीतून उतरल्यापासून एका विचित्र प्रकारच्या बेचैनीने मला घेरले होते. खोलीत रात्रभर बंद असलेल्या उकाड्याने भरलेला

एक रिकामपणा भरून राहिला होता. मी उठलो आणि माझ्या समोर असलेल्या खिडकीचा पडदा बाजूला सारून ती उघडली. समोर एक तलाव होता. खूप लांबवर पसरलेले. धुके हळूहळू नाहीसं होऊ लागले होते. आकाशाच्या दुसऱ्या टोकाला एक फिक्कट, मळकट लालिमा दिसू लागला होता. मी परत आपल्या जागेवर येऊन बसलो.

खोली नव्या ढंगानं सजवलेली होती. फिकट पिवळ्या रंगाच्या भिंती, लाल ज्यूटचा गालिचा, ग्लास-टॉप सेंटर टेबल... आणि नजर थबकली. एक मोठी फुलदाणी समोरच्या कोपऱ्यात ठेवलेली होती. जुन्या, रंगीत बेल्जियम ग्लासची खूप सुंदर फुलदाणी. संपूर्ण रिकामी.

''इथे पोहचायला काही त्रास तर नाही ना झाला ?'' रफतमियाँनी खोलीत प्रवेश करीत विचारले.

''जी, नाही. कसलाही त्रास झाला नाही.''

''तुमचा प्रोग्रॅम नीट कळला असता तर गाडी पाठवली असती.'' सिगारेट पेटवीत ते म्हणाले, ''पण मला वाटतं, तुम्ही तर मुराद मंझिल पाहिलेली असावी...''

''जी हाँ,'' मी हसत म्हणालो, ''मी खूप लहान होतो तेव्हा.''

''हो, पहा, आता मला आठवलं. बावन्न सालची गोष्ट आहे ना. तुमचे वडील त्या वेळी दिल्लीला गेले होते... तुम्ही तर मियाँ छोटे होता त्या वेळी. मला वाटतं, फार तर आठनऊ वर्षांचे असाल नसाल.''

''जी हाँ.''

एक नोकर चहाचा ट्रे घेऊन खोलीत आला. रफतमियाँनी आपल्या जवळच्या टीपॉयवर ट्रे ठेवून घेतला आणि ते चहा तयार करू लागले.

''तुम्ही शिकायला लंडनला गेला होता ना ?'' त्यांनी चहाचा कप माझ्या पुढे करीत विचारले.

''जी हाँ, इंजिनियरिंगसाठी.''

''बरेच दिवस राहिला असाल ?''

''जवळजवळ दोन वर्षं. नुकताच गेल्या महिन्यात परत आलो.''

''हूं...'' काही वेळ ते मुकाट्यानं चहा पीत राहिले. मग कपाकडे पाहत म्हणाले, ''बहुत अच्छा है मियाँ. सध्याच्या काळात शिक्षण आणि योग्यता हीच कामाला येतात.'' मग थोडं थांबून त्यांनी विचारले, ''इथे एच. इ. एल. मध्ये नोकरी मिळालीय ना ?''

''जी हाँ.'' मी चहाचा कप ठेवीत उत्तरलो.

चहा पिऊन झाल्यावर ते उठले. ''अच्छा, तुम्ही आता इथेच बसा थोडा वेळ. मी तुमची खोलीबिली साफ करवून घेतो.

''तुम्ही आंघोळ वगैरे उरकून घ्या. तोवर सगळेजण जागे होतील. नंतर भेटू...''

असे म्हणून रफतमियाँ निघून गेले होते.

मी अजून तसाच उभा राहून खोलीकडे निरखून पाहत होतो. अस्वस्थपणाने भरलेली ती बर्फासारखी जाणीव पुन्हा जागी झाली होती. ही एक गोलसर खोली होती. रफतमियाँच्या म्हणण्याप्रमाणे पै. अब्बाजान यांचा स्वप्नमहाल. चारी बाजूंना भिंतींवर मोठमोठे आरसे लावलेले होते. त्यांची चमक आता बरीचसी कमी झालेली होती. नोकराकरवी झाडपूस केलेली असली तरी एक प्रकारचा जुनाट पिवळेपणा त्यांच्यावर पसरलेला होता. खोलीत लावलेल्या बल्बचा उजेड त्यातून परावर्तित होऊन जास्तच पिवळा झाल्यासारखा वाटत होता. भिंतींवर आरशांच्या मधोमध थोडी जागा रिकामी होती. समोरच्या बाजूला थोड्या उंचावर एक किमती सोनेरी चौकटीत एक जुने पेंटिंग लावलेले होते.

खोलीत जुन्या रेशमाचा एक तीव्र गंध भरलेला होता. बाहेर सूर्य उगवला असावा. मी पुढे झालो. डावीकडच्या बाजूला लावलेले भारी मखमली पडदे बाजूला सारून मी खिडकी उघडली. पांढऱ्या स्वच्छ प्रकाशाने खोली भरून गेली. बाहेर खूप लांबवर पसरलेली, वाळलेल्या गवताने आणि असंख्य वाळलेल्या पानांनी आच्छादलेली बाग दिसत होती. आंब्याचे एकुलते एक झाड मधेच वाकलेले उभे होते. नीरव वातावरणात फक्त एकच आवाज ऐकू येत होता. कसलं तरी शिवणकामाचं मशीन चालू असल्याचा आवाज. तो जवळूनच कुठून तरी येतो आहे असे वाटत होते.

खिडकीपासून बाजूला होत मी खोलीकडे एकदा वरवर पाहून घेतले. आता थोडी बरी वाटू लागली होती. समोरच्या बाजूला भिंतीपासून थोडा लांब एक फ्रेंच पलंग होता. त्याच्यावर जुने मरून रंगाचे सॅटिनचे अघळपघळ बेडकव्हर अंथरलेले होते. पलंगाच्या पलीकडे डाव्या बाजूला एक दार होते. बहुतेक बाथरूम असावी. माझा अंदाज बरोबर ठरला. पांढऱ्या पाषाणात बांधलेली एक बरीच मोठी खोली होती. तिच्या एका भिंतीवर पुरुषभर उंचीचा एक आरसा लावलेला होता. दुसऱ्या कोपऱ्यात पांढऱ्या पाषाणाचे एक बरेच मोठे टब होते. जुन्या पद्धतीचे खासे छान स्नानगृह होते ते. मी खोलीत परत येऊन माझे सामान वगैरे सोडू लागलो. मध्येच नोकराने येऊन सांगितले की स्नानगृहात गरम पाणी ठेवलेले आहे. कपडे वगैरे काढून मी आंघोळीच्या तयारीला लागलो.

रफतमियाँच्या ड्रॉइंगरूममध्ये जाऊन पोहोचलो त्या वेळी नऊ वाजत होते. न्याहरीच्या टेबलाजवळ एक नऊ-दहा वर्षांचा मुलगा आणि त्याच्याहून साधारण दोन-तीन वर्षांनी लहान अशी एक मुलगी बसलेली होती. ''शबनम आणि फिरोज.'' रफतमियाँनी सांगितले आणि मग त्या दोघांना म्हणाले, ''बेटे, सलाम करो चचा को !'' दोन्ही मुलांनी लाजत हसत सलाम केला. तेवढ्यात स्वयंपाकघरातून हातात प्लेटी घेऊन एक बाईसाहेब खोलीत दाखल झाल्या.

''तुम्हारी भाभी,'' रफतमियाँ मला म्हणाले, आणि मग त्यांच्याकडे पाहत

म्हणाले, ''इमरोज मियाँ...'' मी उठून  सलाम केला.

''बसा, बसा...'' सलाम करीत त्या म्हणाल्या आणि टेबलावर प्लेटी मांडू लागल्या.

मुमताज जहाँ बेगम ! बाहेर लावलेली लहानशी नेम प्लेट माझ्या डोळ्यासमोर तरळून गेली. तीस-बत्तीस वर्षांचे वय असावे. काळजीपूर्वक निगा राखलेला थोडा जाडसर देह. गोरा रंग, सुंदर रेखीव चेहरा आणि दोन अतिशय काळे डोळे.

''आजच जॉइन व्हायचंय का ?'' रफतमियाँ विचारीत होते.

''जी, नाही. उद्या.''

''मग ठीक आहे. आज आराम करा. रात्री ट्रेनमध्ये कसलं झोपायला मिळालेलं असणार.''

''जी हाँ, तसंच काहीसं झालं...''

''भई, खरं तर फार वाईट गाडी आहे ही, मला तर धसकाच बसतो. आणि यांना तर मुळीच सहन होत नाही.'' बेगमसाहिबांकडे इशारा करीत ते म्हणाले.

इकडच्यातिकडच्या गप्पा होऊ लागल्या. बहुतेक वेळ रफतमियाँच बोलत होते. न्याहरी संपवून आम्ही उठू लागलो तेव्हा बेगमसाहिबा माझ्याकडे वळून म्हणाल्या, ''तुमची खोली उघडीच आहे ना ? खरं म्हणजे घाईघाईत नीट साफसूफ झालेली नाही ! मी आता करवून घेते...''

''तुम्ही कशाला त्रास करून घेता आहात...'' मी बोलायला सुरवात केली, आणि मग त्यांच्या चेहऱ्यावरचं हास्य पाहून मी हळूच बोलणं पुरं केलं. ''जी हाँ, खोली उघडीच आहे.'' आणि रफतमियाँबरोबर बाहेर आलो.

''या, जफरभाईच्याकडे जाऊ.'' बाहेर येऊन पोर्चकडे जात ते म्हणाले.

अगदी समोर एक बराच मोठा दरवाजा उघडलेला होता. त्या दारावर एक दाट मरून रंगाचा मखमली पडदा होता आणि त्यातून जागोजाग जरीकाम उसवलेले दिसत होते. आत गेल्यावर एका सोफ्याकडे बोट दाखवीत रफतमियाँ म्हणाले, ''तुम्ही बसा. मी बघतो.'' आणि ते आत जाणाऱ्या दारातून निघून गेले.

सोफ्यावर बसायला गेलो, तो मी त्यात रुतूनच बसलो. उगीचंच इकडेतिकडे पाहत असताना नजर वर गेली आणि तिथेच थबकली. खोलीच्या मधोमध एक मोठे झुंबर छताला लोंबत होते. स्फटिकाचे. क्षणभर मन एकदम कुठेतरी थांबल्यासारखे झाले. मग आठवले की ही खोली म्हणजे 'मुराद मंझिल'चे जुनी खास ड्रॉइंगरूम होती. बालपणी या खोलीत बहुतेक एखादा उत्सव पाहिलेला असावा. आणि त्याच वेळी हे झुंबर झगमगत प्रकाशात असलेले पाहिलेले असावे. पण आणखीहीं काहीतरी गोष्ट होती आणि तूर्त ती आठवत नव्हती.

नजर आता क्रमवारपणे खोलीत फिरू लागली होती. खूपच मोठी खोली होती.

जवळजवळ एक पूर्ण हॉलच म्हणा ना. उंच उंच भिंती, छताच्या जवळ मोठमोठे झरोके होते. त्यांच्या रेशमी दोऱ्या खाली लोंबकळत होत्या. खिडक्यांना तसेच जाडजूड मखमली पडदे लावलेले. संपूर्ण खोलीभर गडद लाल रंगाची सतरंजी अंथरलेली आणि तिच्यावर एक खूप मोठा लाल, काळ्या, पांढऱ्या रंगांचे पॅटर्न असलेला इराणी गालिचा अंथरलेला. आणि त्याच्यावर, खोलीच्या मधोमध भिंतीसमोर एक पांढरा फरचा गालिचा घातलेला. त्याची लोकर आता झिजून गेलेली होती आणि रंग पिवळा पडलेला होता. खालीत इकडेतिकडे जुने जडजड व्हिक्टोरियन फर्निचर मांडलेले होते. चारी बाजूंच्या भिंतींवर मोठमोठ्या सोनेरी फ्रेम्समधे अनेक पोर्ट्रेट्स् लावलेली होती. माझ्या डावीकडच्या भिंतीवर अशा तीनचार जागा रिकाम्या दिसत होत्या. सगळ्या चित्रांचे रंग अजूनही चमकत होते; पण सर्व सोनेरी फ्रेम्सचा रंग मात्र उडून गेला होता. भिंतीच्या मागे एक खूप मोठी फायरप्लेस होती आणि तिच्या दोन्ही बाजूंच्या भिंतींत काचेच्या अलमाऱ्या होत्या. त्यात कितीतरी पुस्तके व्यवस्थित ठेवलेली होती. सजावट म्हणून चारही बाजूंना स्टँडवर आणि भिंतींवर शिकारीच्या ट्रॉफी लावलेल्या होत्या—चितळ, हरीण, चित्ता, बिबळ्या यांची डोकी. काचेच्या चकाकणाऱ्या खोट्या डोळ्यांनी पाहत असलेली आणि सगळ्या वातावरणात तोच जुना रेशमाचा गंध पसरलेला.

रफतमियाँ दुसऱ्या एका महाशयांबरोबर बोलत बोलत खोलीत आले होते. मी उठून सलाम केला.

''जफरभाई,'' रफतमियाँ हसतच उद्‌गारले.

''वालेकुम अस्सलाम, साहबजादे !'' जवळ येऊन जफरभाईंनी मोठ्या उत्साहाने प्रत्युत्तर दिले. हातात हात घेतला आणि मला आपल्या खांद्याजवळ घेतले.

''भई वाह, माशाल्ला, खूप सुंदर नवजवान आहेस की. अगदी सरफराजचा मुलगा शोभतोस... तुला बघून खूप आनंद झाला...ये, बस.'' आणि मोठ्या सोफ्यावर ते माझ्या जवळ बसले.

मी हसून त्यांच्याकडे पाहिले. गोरा चेहरा आणि लाल दाढी. आणि अचानक झुंबराच्या गोष्टीचा प्रकाश माझ्या डोक्यात पडला. मग तर जणू काही सगळे कोनेकोपरे लखलखू लागले... लंडनहून परतीचा प्रवास, जहाज, आयरिश शिप कॅप्टन, त्याचा गोरा चेहरा आणि लाल दाढी. शिपचा डायनिंग हॉल आणि त्याच्या मधोमध छताला टांगलेले भारी क्रिस्टल ग्लासचे झुंबर...

जफरभाईंच्या आवाजाने मी त्यांच्याकडे ओढला गेलो.

''सरफराज तर ठीक आहे ना ?'' ते विचारीत होते.

''जी, तुम्हा सगळ्यांना दुआ सांगितली आहे. तुम्हा लोकांची खूप आठवण काढतात. कदाचित येतीलही इथे...''

''अरे, येतील काय म्हणतोस... आता तर इथेच येऊन राहायला पाहिजे. त्याने

भोपाळ सोडले त्याला एक जमाना होऊन गेला आणि आता तर आराम करायचे दिवस आले आहेत.'' आणि जफरभाई हसू लागले

जफरभाई अब्बांच्याच वयाचे होते. अब्बा या घरचे सेवक असले तरी मरहूम जनाब अताउल्लाखानसाहेबांनी कधीच आपल्या मुलांत आणि अब्बात भेदभाव केला नाही. शिवाय जफरभाई आणि अब्बा यांची वेगळ्याच ढंगाची दोस्ती होती.

जफरभाईंचे डोळे माझ्या चेहऱ्याकडे पाहत होते किंवा गतकाळाकडे.

आणि माझ्या डोळ्यात त्यांचा चेहरा, जहाजाच्या आयरिश कॅप्टनच्या चेहऱ्यावर झिळमिळत होता. दोघांच्या चेहऱ्यात आश्चर्यकारक रूपसाम्य होते. फक्त डोळे वेगळे होते. कॅप्टनचे निळे डोळे होते—समुद्रासारखे खोल. आणि जफरभाईंचे डोळे किंचित करडे—वाळलेल्या पानांनी झाकून टाकलेल्या ओसाडीसारखे.

''अरे हो...'' थोड्या वेळाने जफरभाईंना जणू काहीतरी आठवले, ''तू तर ब्रिटनहून परत आला आहेस नाही का. भई, तिकडे काय हालचाल आहे सांग ना. इंग्रज बहादुरांचा देश आता खूपच बदललेला असेल नाही.''

जफरभाई स्वत: लंडनला राहिलेले होते, लॉचे शिक्षण घेण्यासाठी.

मग तिकडच्याच गप्पा सुरू झाल्या.

रात्र झालेली होती. संपूर्ण दिवस मुराद मंझिलमध्येच गेलेला होता. काहीही विशेष केलेले नव्हते तरी पण खूप थकवा आलेला होता. ज्या दिवशी जहाज मुंबईला आले होते त्या दिवशी जहाजातून उतरताना जाणवला होता तसाच काहीसा थकवा जाणवत होता. मेंदूत पाणी भरल्यासारखे वाटत होते आणि ते शोषून नसा फुगवट्यासारख्या झाल्या होत्या. ज्या प्रकारे आजचा दिवस पार पडला. त्या प्रकारामुळे, का कोण जाणे असे वाटत होते की ज्याला बोलतासुद्धा येत नाही अशा एखाद्या आजाऱ्यापाशी बसून बसून आपण सगळा दिवस घालवला आहे.

पण वास्तविक पाहिले तर कितीतरी दिवसांनी मी एवढे बोललो होतो. जफरभाईबरोबर तर पूर्ण तीन तास निघून गेले होते. कुठल्याकुठल्या गप्पा मारल्या कोण जाणे. त्यातच अनेक गोष्टी माहीत झाल्या होत्या. त्या तीन तासात मी कितीदा तरी आश्चर्यचकित झालो होतो. ड्रॉइंगरूममधल्या इराणी गालिच्याचे पॅटर्न माझ्या मनात रेखले गेले होते. तिथून उठताना असे वाटत होते की मी माझे सगळे आयुष्यच जणू काही या खोलीत बसून घालवले आहे आणि माझ्या डोळ्यादेखत एक एक वस्तू जुनी होत गेली आहे. काळाचा एक प्रचंड समुद्रच तेथून पार झालेला आहे आणि मी आणि जफरभाई त्याने मागे टाकलेल्या ओल्या रेतीत रुतलेल्या पायांवर उभे राहून रेतीवर उमटलेल्या रेघा पाहतो आहोत.

मुराद मंझिल तीन भागात वाटली गेली आहे हे जफरभाईंनी मला सांगितले त्या

क्षणी माझ्या डोळ्यांसमोर वीस-बावीस वर्षांपूर्वीची असदुल्लाभाईंची छबी मूर्तिमंत उभी राहिली होती. गोरे, उंच आणि भरदार शरीर आणि हसरा, निश्चिंत, सुंदर चेहरा. मी त्यांच्याविषयी जफरभाईंना विचारणारच होतो, तोच आपल्या खास शैलीत ते सांगू लागले, ''असद गेला... तुला तर ठाऊकच असेल.'' आणि मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहतच राहिलो होतो. मग त्यांनी स्वतःच सांगितले की कसे कोण जाणे असदभाईंना पेथिड्रिनचे व्यसन जडलेले होते आणि त्यानेच त्यांचा बळी घेतला होता. जिवंत होते तोपर्यंत त्यांनी आपल्या वाटणीची सगळी संपत्ती उधळून टाकली, एवढेच नव्हे तर प्रचंड कर्ज मागे ठेवून गेले. आता अरमाना आपल्या दोन्ही मुलींना घेऊन डाव्या बाजूच्या भागात राहते आहे.'' जफरभाई म्हणाले होते, ''बराचसा भाग भाड्याने दिलेला आहे. त्यावरच गुजराण चालू आहे.'' आणि मग ते गप्प बसले होते.

बाहेर येऊन जफरभाईंनी हवेलीचे वेगवेगळे भाग दाखवले होते. मधल्या भागात जफरभाई राहत होते. त्यांनी लग्न केले नव्हते. उजवीकडचा भाग रफतमियाँकडे होता आणि डावीकडचा मरहूम असदमियाँकडे. त्यात आता आपाबेगम, गजाला आणि फरयाल राहत होत्या. जफरभाईबरोबरच आपाबेगम आणि फरयाल यांना भेटलो होतो. आपाबेगमकडे पाहिल्यावर आणि त्यांचे साधेसुदे कपडे पाहूनही त्या विधवा आहेत या गोष्टीवर विश्वास बसत नव्हता. वयाचा आणि दुःखद घटनेचा परिणाम या दोन्हीना मागे सारून दोन हिऱ्यासारखे चमकणारे डोळे समोर येत होते. त्यात पाहण्याचे धैर्य मला झाले नाही. फरयालही दिसायला तेवढीच सुंदर होती. फार तर पंधरासोळा वर्षांची एक अबोल मुलगी. ती आपाबेगमची कन्या वाटण्याऐवजी त्यांची धाकटी बहीणच वाटत होती.

आपाबेगम यांच्याकडे असलेला भाग हवेलीच्या इतर भागांपेक्षा वेगळा होता. त्याला मुराद मंझिलचा भाग म्हणणे जरा कठीणच होते. हवेलीच्या डावीकडच्या बाहेरच्या भागात तीन खोल्या आणि त्यांच्या मधोमध असलेले एक लहानसे दालन एवढेच. ते एक अगदी सामान्य घर होते. मागच्या बाजूने उघडणाऱ्या दारावर एक मळकट पडदा लावलेला होता आणि तो पाहिल्यावर अगदी अनिच्छेनेच ते घर, त्या घरातले वातावरण आणि सगळ्या जीवनाबद्दलच एक मत तयार होऊन गेले. दालनातच एक चटई अंथरलेली होती. जवळच लाकडी खोक्यावर एक शिवणकामाचे मशीन ठेवलेले होते आणि आजूबाजूला रंगीत कापडाचे कापलेले तुकडे पडलेले होते. ते मशीन पाहिल्यावर माझी खोली या बाजूला लागून आहे हे माझ्या ध्यानात आले.

एकूण तिथेही बराच वेळ बसणे झाले. गप्पांचा ओघ पुन्हा पूर्वीच्या दिवसांकडे वळलेला होता. आणि त्याच ओघात आपाबेगम मला म्हणाल्या, ''आता विश्वास बसणार नाही; पण त्या वेळी तू खूपच खोडकर होतास... तू आणि गजाला... तौबा... केवढा दंगा करायचे तुम्ही.'' त्या वेळी प्रथमच मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिले होते.

आणि त्यानंतर एक अस्पष्टशी छबी मनात उमटू लागली होती.

एका लाललाल गालांच्या गुटगुटीत मुलीची छबी... गजाला. नंतर एकदम आपोआपच जणू सगळा अल्बम उघडला गेला— कारंजाच्या खाली असलेल्या हौदात उभी राहून ती माझ्यावर पाणी उडवीत आहे... चिंचेच्या घनदाट सावलीच्या झाडाखाली आम्ही दोघे भर दुपारी चिंचा वेचून वेचून खात आहोत... कितीतरी चित्रं होती. पण त्यातल्या एकाही चित्रात मला गजालेचा चेहरा स्पष्टपणे दिसत नव्हता.

तिथून परत आल्यानंतर मला आठवले की बालपणी मी आपाबेगमला चर्चीजान म्हणायचो. पण लाख प्रयत्न करूनही मला त्यांचा आणि गजालेचा त्या काळचा चेहरा काही आठवेना. जफरभाई म्हणाले की गजाला सध्या कुठेतरी नोकरी करते आहे म्हणून त्या वेळी ती घरी नव्हती. संध्याकाळ होता होता गजालेचा चेहरा पाहायला मिळावा अशी तीव्र बेचैनी सुरू झाली होती. पण गजाला अजून बहुतेक परत आलेली नसावी; कारण थोड्या वेळापूर्वीच रफतमियाँच्या ड्रॉइंगरूममध्ये जवळजवळ सगळेजण बसून गप्पा मारीत होतो.

आता साडेदहा वाजले होते. मला आठवले की उद्या सकाळी लवकर उठावे लागणार आहे. नोकरी ! आणि एका नव्या जीवनाची सुरवात, पण या विचाराने कसलेही थ्रिल या वेळी का कोण जाणे जाणवत मात्र नव्हते.

दिवा बंद करण्यासाठी म्हणून मी उठलो. एकाएकी चारही बाजूंनी कितीतरी सावल्या उभ्या राहिल्या. चारही बाजूंनी भिंतींवरल्या आरशातून माझीच अगणित प्रतिबिंबे माझ्याकडे पाहत होती.

खिडकी बंद करावी म्हणून मी पुढे गेलो. लगतच्या भागातून आवाज येत होते—

''विलायतेहून परत आला आहे. आधी तर मी ओळखलेच नाही...'' आपा बेगमचा आवाज होता.

''... ...''

''रफतमियाँच पाहुणचार करताहेत. दुपारी स्वत: मुमताज खोली साफ करीत होती...'' या बोलण्यात थोडासा खोचकपणा होता.

''तर तर... करेल नाही तर काय...'' कुणातरी मुलीचा आवाज होता, ''आता रिझवीचा कंटाळा आला असेल ना... बरं आहे, नवा यार मिळाला आणि तोही घरबसल्या...''

थोडा वेळ शांत गेला. मग आपाबेगमचा बारीकसा आवाज ऐकू आला, ''आज अहसान आला होता...''

''कशाला ? काय म्हणत होता ?''

''तू ऑफिसला का येत नाही म्हणून विचारीत होता.''

''तू काय म्हणालीस?'' आवाज खूप कंटाळवाणा होता.

''मी काय म्हणणार ?'' आपाबेगम वैतागून म्हणाली, ''मला तर तू ऑफिसला जाते म्हणून सांगून जातेस...''

''मग काय जाहिराती छापू का मी कुठे जाते, काय करते म्हणून ?'' अचानकच तिचा आवाज चढला होता. तो गजालेचाच आवाज असणार हे मी ओळखले.

जरा वेळाने पुन्हा आवाज आला, ''हे घे... शंभर रुपये आहेत. जरा काळजीपूर्वक खर्च करा.''

आणि मग बराच वेळपर्यंत सामसूम धडकत राहिली. खिडकी बंद करून मी दिवा घालवला आणि येऊन आडवा झालो. मिटलेल्या डोळ्यांपुढे जहाजाच्या कॅप्टनचा लाल दाढीचा चेहरा आला होता. डोळ्यांचा रंग वारंवार बदलत राहिला होता...

बाहेर वारे जोराने वाहू लागले होते. एक विचित्र आवाज कानावर पडत होता. बहुतेक आंब्याच्या झाडाची पानं सळसळत असावीत. किंवा कदाचित जमिनीवर पडलेली वाळलेली पानं वाऱ्याबरोबर लोटली जात असावीत. असं वाटत होतं की मी पुन्हा जहाजावरच्या माझ्या केबिनमध्ये झोपलो आहे आणि रात्रीच्या नीरवतेत पाणी कापीत जहाज पुढे चालले आहे... अगदी तसलाच आवाज नीरवतेतून बाहेर येत पुन्हा त्यातच हरवणारा... एक दुसरे जुने जहाज... लाल दाढी आणि करडे डोळे असलेला कॅप्टन...जुन्या, भारी, मखमली पडद्यांची कॅप्टन्स केबिन... लक्झरी क्लास आणि त्याच्या एका केबिनमधे ठेवलेली रंगीत बेल्जियम ग्लासची जुनी सुंदर फुलदाणी आणि इकॉनमी क्लासमधले प्रवासी आहेत, आपाबेगम, फरयाल आणि गजाला. कसंतरी करून समुद्र पार करणे हाच त्यांच्या सगळ्या प्रवासाचा हेतू...

सकाळी झोप झाली तेव्हा पाहतो तो नोकर चहा घेऊन आलेला होता आणि उठवत होता. आठ वाजले होते.

चहा प्यायल्यावर शरीरात पुन्हा तरतरी आली. खूप प्रसन्न आणि हलकंहलकं वाटत होतं. कालच्या दिवसभरच्या गप्पा आणि परवाचा प्रवास यांनी आलेला थकवा झोपेने आपल्याबरोबर वाहून नेला होता. फॅक्टरीच्या ऑफिसात अकरा वाजता पोहोचायचे होते. मी उठून स्नानगृहाकडे गेलो. आंघोळीनंतर तयार होऊन मी खोलीत आलो ते अचानक थबकून उभा राहिलो. समोरच्या पलंगाजवळ असलेल्या आरामखुर्चीत एक सुंदर मुलगी बसलेली होती. संपूर्ण आत्ममग्न. काहीतरी विचार करीत असलेली. दाराचा आवाज ऐकताच तिने वर पाहिले. सलाम करण्यासाठी माझा हात अभावितपणेच वर उचलला गेला.

''तसलीम,'' अगदी सहज औपचारिकपणे हसत ती उभी राहत म्हणाली, ''मी...गजाला.''

''अरे, तू...!'' एकदम उत्स्फूर्तपणे माझ्या तोंडून शब्द निघाले, पण पुढे मी

काहीच बोलू शकलो नाही. पश्चात्तापासारखी निस्तब्धता वेढून राहिली होती. आपण जणू काही वीस वर्षांनंतर प्रथमच भेटत नसून फक्त काही तासांनंतर भेटतो आहोत असा भाव गजालेच्या चेहऱ्यावर होता. अनेक वर्षे एकत्र राहणाऱ्या आणि रोज भेटणाऱ्या दोघा जणात जो एक अत्यंत सहजपणा आणि हळुवार निस्पृहपणा असतो, तसाच भाव यावेळी आम्ही दोघांमध्ये होता.

''बस ना !'' थोड्या वेळाने मी म्हणालो.

''आई म्हणाली की तू आला आहेस,'' खुर्चीवर बसत ती म्हणाली.

''हो. काल आलो तू तेव्हा कुठेतरी बाहेर गेलेली होतीस.''

''हो.'' फक्त एका शब्दात उत्तर होते.

मला म्हणायचे होते की मी तिची चांगलीच वाट पाहिली म्हणून, पण मग हिंमत नाही झाली.

''आजपासून जॉइन होणार आहेस का ?'' जरा वेळाने तिने त्याच सामान्य सुरात विचारले.

''हो.''

''आणि...दिल्लीत सगळेजण ठीक आहेत ना ?'' पुन्हा थोड्या वेळाने तोच दूर थांबल्यासारखा आवाज.

''हो. सगळे ठीक आहेत,'' मी जमिनीकडे पाहत उत्तरलो. आई तुझी आठवण काढत होती.''

ती गप्प राहिली.

आणि थोड्या वेळाने ती उभी राहिली. ''बरंय... तर मग... तुला लवकर जायचं असेल ना ?...''

एक क्षणभर मी तिच्याकडे पाहत राहिलो. ती मोठ्या आत्मविश्वासाने आपल्या साडीचा पदर ठीकठाक करीत होती.

''हो...भेटू पुन्हा,'' मी तिच्याकडे पाहत म्हणालो.

''हूँ...'' आणि डोळ्याला डोळा न देता ती निघून गेली.

मी पलंगावर येऊन बसलो आणि खुर्चीकडे टक लावून पाहू लागलो. गेल्या रात्रीचे, खिडकीजवळ उभे राहून ऐकलेले बोलणे डोक्यात भिरभिरू लागले... पुन्हा पुन्हा तेच आवाज... आपाबेगमचे आणि त्या मुलीचे— गजालेचे. जरा वेळाने खिडकीच्या बाहेर नजर गेली. एवढ्याशा वेळात उन्हाच्या चमचमत्या उजळपणात दुपारसारखा साठलेपणा आणि रिक्तपणा भरून गेलेला दिसत होता.

नोकराने येऊन सांगितले की जफरभाई नाश्त्यासाठी बोलावताहेत. आवश्यक त्या कागदांची फाइल घेऊन मी नोकराबरोबरच खोलीच्या बाहेर पडलो. हवेलीच्या वेगवेगळ्या भागांची वाटणी झालेली असल्यामुळे आतल्या बऱ्याचशा वाटा बंद केलेल्या असाव्यात.

कारण ड्रॉइंगरुममधूनच आम्हाला डायनिंगरूमकडे जावे लागले. एक लांबलचक खोली होती, ट्यूब लाइटच्या उजेडाने भरलेली ! एक मोठे डायनिंग टेबल होते. त्याच्या दुसऱ्या टोकाला जफरभाई एकटेच वर्तमानपत्र वाचत बसले होते. मला पाहून त्यांची वर्तमानपत्र बाजूला ठेवले आणि हसत म्हणाले, ''आओ भई, बोल, चांगली झोप झाली ना ?''

''जी, अगदी बरोबर.'' मी हसत उत्तरलो आणि त्यांच्या शेजारच्या खुर्चीवर जाऊन बसलो.

त्यांनी नोकराला हाक मारली आणि म्हणाले, ''आत्याला सांग, नाश्ता पाठवून द्यायला.'' मग मला म्हणाले, ''तू तर अगदी तयारच होऊन बसला आहेस. आताच जायचे आहे का ?''

''जी, नाही. आताच नाही. इथूनच जावं असा विचार केला.''

''हाँ, ठीक है. टॅक्सी इथेच मागवून घेऊ.'' मग थोडा विचार करून म्हणाले, ''नाहीतर तुला हवी असेल तर गाडी घेऊन जा.''

''जी, नको. त्याची काही गरज नाही. मी जाईन आपला.'' ड्रॉइंगरूममधल्या फोनची बेल वाजली.

''मी आलोच,'' म्हणत जफरभाई उठले.

माझी दृष्टी समोर गेली. भिंतीच्या मधोमध जमिनीपासून ते छतापर्यंत एक खूप मोठा संपूर्ण आरसा लावलेला होता. इथे बसल्याबसल्याच त्याच्या दुसऱ्या बाजूला असलेला लहानसा स्वीमिंग पूल दिसत होता. स्वीमिंग पुलाच्या चारही बाजूला सिमेंटच्या एक दीड फूट उंचीच्या जाळ्या लावलेल्या होत्या. त्यातली क्वचितच एखादी धड राहिलेली असावी. मधल्याअधल्या काही जाळ्या तर पूर्णच उखडल्या गेलेल्या होत्या. दुसऱ्या टोकाला एक मोडका कुबड्यासारखा मिनार होता. त्याचे जागोजाग निघालेले प्लास्टर अगदी जखमांसारखे दिसत होते, मला वाटते एके काळी तो डायव्हिंग टॉवर असावा. पावसाचे पाणी बहुतेक तलावात भरलेले असावे. त्यावर शेवाळ्याचा थर मखमलीसारखा पसरलेला होता.

नीट ध्यान देऊन पाहतो तो काय. एका मेलेल्या सापाची कात पाण्यात पडलेली होती. स्वीमिंग पूलच्या मागे थोड्या अंतरावर सिमेंटचे बनवलेले एक टेनिस कोर्ट होते. त्यात ठिकठिकाणी भेगा पडलेल्या होत्या आणि मधोमध झुडुपाच्या आकाराचे जंगली गवत उगवलेले होते. टेनिस कोर्टाच्या पलीकडे खूप लांबपर्यंत उजाड माळरान होते. आणि दूरवर विनाकारणच उभी असल्यासारखी एक पडकी कंपाउंडवजा भिंत होती.

पावलांचा आवाज ऐकून मी वळलो. जफरभाई खोलीत येत होते. टेबलावर नाश्ता मांडला जात होता. आम्ही दोघे त्याच खुर्च्यांवर बसलो.

''आरसा तर मोठा खास ढंगांचा आहे.'' ऑम्लेटचा तुकडा तोडता तोडता जफरभाई आरशाकडे बोट दाखवीत म्हणाले, ''आमच्या मरहूम दादांच्या रंगेल

स्वभावाची खूण आहे... खोलीतून बाहेरचे सगळे काही दिसते. पण बाहेरून आतले काहीच दिसत नाही.'' आणि ते हसले.

मीही हसलो.

जफरभाईंनी विस्तार करायला सुरवात केली होती. ''त्या काळाचा... इंग्रज बहादुराची जात. त्या काळात मुराद मंझिलची पाहुणी कशी असायची. आठदहा जण पाव्हणे नसतील तर दादामियांना नीट जेवणही जात नसायचे... आणि आता, कल्पना करा त्या काळातल्या परिस्थितीची. तेव्हा इथे मेजवान्या झडायच्या, आणि तिकडे पऱ्या नहायच्या...'' जफरभाईंचा आवाज पाण्यात चमचणाऱ्या रंगीबेरंगी मासोळीसारखा चालला होता—हळूहळू वळणं घेत असलेल्या आठवणी, अभिमान, व्यंग्य, दर वेळी एक नवा रंग चमकताना दिसायचा.

काल सगळ्यात आधी मला दिसली होती ती कंबरेत वाकलेली म्हातारी बाई स्वयंपाकघरातून हातात एक प्याला घेऊन खोलीत आली. जफरभाईंनी हसून तिच्याकडे पाहिले आणि ते तिला म्हणाले, ''ये आत्ते,'' मग मला म्हणाले, ''तू तर ओळखलं नसशीलच ? हलीमा आत्या...यांनी तर तुला मांडीवर खेळवलंय.'' आणि ते हसू लागले.

''अरे हो मियाँ, अगदी चांगलं खेळवलंय,'' हलीमा आत्या माझ्याकडे पाहत म्हणाली.

मी सलाम केला आणि मग हळूच म्हणालो, ''माफ करा हं आत्या, मी काल ओळखलं नाही.''

''जीते रहो, अरे त्यात काय एवढं बेटा... मी स्वत: तरी कुठे ओळखले होते ? अल्ला तुझे बरे करो. शप्पथ सांगते, जफरमियाँनी तुझ्याबद्दल सांगितलं ना, तर मला खूप खूप आनंद झाला बघ...'' म्हातारा आवाज गळ्यात अडकत असल्यासारखा वाटत होता ! तो प्याला माझ्यापुढे करीत म्हणाल्या, ''घे बेटा, घे. आज फार भाग्याचा दिवस आहे. खुदा तुझा वंश वाढवो.'' मी पाहिले, प्याल्यात प्रसादाची मिठाई होती.

''आभार, आत्या !'' मी म्हणालो आणि खाऊ लागलो. जफरभाई हसत होते. त्यांचे करड्या वर्णाचे डोळे...

जवळजवळ दोन आठवडे होऊन गेले होते. आयुष्याचा पुन्हा एक क्रम सुरू झालेला होता. ऑफिस नंतरचा बराचसा काळ मुराद मंझिलमधे जात होता. तरी पण आता आपण येथे पाहुण्यासारखे राहतो आहो ही जाणीव संपलेली होती. पहिल्या दोन दिवसात जो अस्वस्थपणा जाणवलेला होता, तो आता संपलेला होता म्हणा किंवा अंगात भिनून गेला होता म्हणा, शहरी जीवनात सतत कानावर पडणाऱ्या गोंगाटासारखा.

जफरभाईंबरोबरच कितीतरी संध्याकाळच्या वेळा घालवलेल्या होत्या. त्यांच्या

अनेक मित्रांशी भेटी झाल्या होत्या. वस्तुत: संध्याकाळ झाली की मुराद मंझिलसमोर त्यांच्या दोस्तांच्या तीन-चार गाड्या येऊन थांबत असत. ड्रॉइंगरूमचे वातावरण एकदम बदलून जात असे. प्रखर प्रकाशाच्या लोटाने सगळी खोली भरून जात असे आणि जफरभाई आणि त्यांचे मित्र यांच्या हसण्याखिदळण्याचे आवाज वारंवार येत असत. रात्री उशिरापर्यंत हे चालत राहायचे आणि मग म्हाताऱ्या खोलीच्या फासळ्या हसून हसून दुखू लागल्या म्हणजे ती मुकाट्याने अंधारात झोपी जायची.

संध्याकाळ आणि रात्र या काळात जफरभाईंचा चेहरा जणू काही बदलून जायचा. पहिला पेग घेतल्याबरोबरच त्यांच्या गोऱ्या रंगात एका उडत्या लाल रंगाची छटा विरघळू लागायची. मग हळूहळू सगळा चेहराच पालटून जायचा आणि त्यांचे डोळे खोलीत सजवून ठेवलेल्या शिकार केलेल्या मृत जनावरांच्या डोळ्यांसारखे चमकू लागायचे. त्यांच्या मैफिलीत मला ज्या सहजपणाने आणि त्वरेने सामील केले गेले त्याचं मला विशेष आश्चर्य वाटले नाही. मला दारू वर्ज्य नाही हे मी न सांगताच जफरभाईंनी ओळखले होते. थोड्याच दिवसात संध्याकाळचे मला व्यवस्थित निमंत्रण येऊ लागले होते. गेल्या तीन-चार दिवसांपासून रोजचे भोजनही जफरभाईंकडेच होऊ लागले होते. मध्यंतरी दोन वेळा मी रफतमियाँ आणि भाभीजान यांची भेट घ्यायचा प्रयत्नही केला होता. पहिल्या वेळी फक्त भाभीजानच भेटल्या होत्या आणि थोडा वेळ बसून मी निघून आलो होतो. दुसऱ्या वेळी दरवाजापर्यंत जाऊन मुकाट्याने परत फिरलो होतो; कारण आतून भाभीजानचा रागाने कापणारा आवाज बाहेरपर्यंत ऐकू येत होता. थोडेसेच बोलणे मला नीटपणे ऐकू आले होते, ''माहीत आहे मोठे मर्द लागून गेलात ते... इस्टेट पण सांभाळता आली नाही... बायकोच्या नावाची नेमप्लेट लावली म्हणून जग थुंकतंय तुमच्यावर...पण मी सगळं माझ्या नावावर केलं ही माझीच अक्कलहुशारी होती, नाहीतर मियाँ फिरले असते सडकेवर ठेचा खात... आले मोठे बायकोला ताब्यात ठेवणारे...''

त्यानंतर तेथे उभे राहायची मला हिंमत झाली नाही.

आज शनिवार होता. आजची संध्याकाळ रफतमियाँबरोबर घालवायची असे मीच ठरवले होते. पण ऑफिसमधून परत येत असतानाच रफतमियाँची पोर्चमधेच भेट झाली आणि त्यांनी स्वत:च आग्रहापूर्वक जेवणाचे निमंत्रण दिले. रफतमियाँ एकटे भेटले म्हणजे माझ्याशी खूप मोकळेपणाने आणि प्रेमाने वागायचे; पण दोघं असले म्हणजे का कोण जाणे असे वाटायचे की दोघेही विशेष प्रकारे तयार होऊन मला भेटतात, बोलतात वगैरे. माझ्या हजर असण्यामुळेच कितीतरी गोष्टी बदलल्या जायच्या. बोलण्याचा ढंग, नजरा, चेहरे. एक चमत्कारिक सावधपणा सगळ्या वातावरणात भरून जायचा.

कपडे वगैरे बदलून जेव्हा मी तिथे गेलो तेव्हा रफतमियाँ ड्रॉइंगरूममध्येच बसलेले होते. बेगमसाहिबा—त्यांना मी आता भाभीजान म्हणायला सुरवात केली होती—त्या पण तिथेच हजर होत्या.

''बेगम, कोणी खरेदी करणारा तरी हवा...'' रफतमियाँ म्हणत होते.

पण मला पाहताच एकदम गप्प झाले. मग हसत म्हणाले, ''आओ मियाँ, आ जाओ !'' त्यांनी त्यांच्या जवळच्या सोफ्याकडे निर्देश केला. त्यांचा चेहरा बदललेला होता. भाभीजानना सलाम करीत मी बसलो.

''तिकडे जेवणार नाही म्हणून सांगितलं आहे ना ?'' उलट सलाम करीत विचारले.

''जी. हाँ !''

''मियाँ,आज तुमच्यासाठी बेगम स्वत: पाया शिजवणार आहेत,'' रफतमियाँ हसत म्हणाले.

''आज भूक पण खूप जोरात लागलेली आहे, आणि आता तर...'' मी हसलो. माझ्याबरोबर ती दोघंही हसली.

''तुम्ही लोक काही महत्त्वाचं बोलत होता का ? तसं असेल तर...'' थोड्या वेळाने रफतमियाँकडे पाहत मी विचारले.

''अरे नाही, महत्त्वाचं वगैरे काही नाही,'' भाभीजाननी उत्तर दिले. ''गाडीबद्दल मी सांगत होते. अगदी बिनकामाची पडून आहे. त्यापेक्षा विकून टाकलेली बरी.''

''जी....,'' मी मान हलवीत म्हणालो. डोळ्यांसमोर पोर्चमध्ये उभी असलेली काळी ब्यूक दिसू लागली. आज सकाळीच मी बराच वेळ तिच्याकडे पाहत उभा राहिलो होतो. तशी जाता-येता नजरेला पडतच होती; पण एवढे लक्षपूर्वक या आधी कधी पाहिली नव्हती. पोर्चच्या मधोमध ती तशीच केव्हापासून उभी आहे कोण जाणे. जागोजाग काळ्या रंगाच्या खाली उठून दिसणारे लाल विटकरी रंगाचे लहानमोठे डाग, तडा गेलेला विंडस्क्रीन, पक्ष्यांच्या शिटाने भरलेली टपाची चादर आणि बसलेल्या टायरांवर धुळीचा एक मोठा थर. 'ब्यूक-एट'— निकेलच्या ग्रिल्ड फ्रंटवर असलेल्या इंग्रजी अक्षरात धूळ आणि मळ भरलेला होता.

''भई, सवाल हा आहे की सध्या नबाब किंवा राजमहाराजे उरलेले नाहीत. मग हा हत्ती कोण विकत घेणार ?'' इतक्या वेळच्या शांततेनंतर रफतमियाँ हसत म्हणाले आणि माझ्याकडे पाहून मोठ्याने हसू लागले.

मी मंदस्मित केले.

''बरं, जाऊ द्या...'' या वेळी भाभीजान बोलल्या.''तुमचा उद्याचा काय कार्यक्रम आहे ते सांगा,'' त्यांनी मला विचारले.

''काही खास नाही. उद्या तर सुट्टीच आहे.''

''हो. म्हणून तर, पिक्चरचा प्रोग्रॅम ठरवतो आहोत. तुम्ही पण या ना. फिल्म फार चांगली आहे म्हणून ऐकलंय.''

''अवश्य. चांगली फिल्म पाहून मलाही तसे बरेच दिवस झाले आहेत,'' मी उत्तरलो.

काही वेळ अशाच गप्पा झाल्या. मग भाभीजान स्वयंपाकघराकडे गेल्या. आम्ही दोघे गप्पात दंग झालो.

बाहेर कोणीतरी कॉलबेल वाजवली. रफतमियाँ उठून बाहेर गेले. मला काही सुचेना म्हणून शेजारच्या कपाटात ठेवलेला एक मोठा अल्बम घेऊन पाहू लागलो. रफतमियाँच्या लग्नाचे फोटो होते. व्यवस्थितपणे लावलेल्या फोटोंच्या खाली पांढऱ्या शाईने लिहिलेले समर्पक शेर आणि वचने होती. मी अल्बमची पाने उलटत होतो तोच अचानक एका फोटोवर नजर खिळून राहिली. फोटोत रफतमियाँनी सेहरा (मुंडावळ्या) बांधलेला होता. त्यांच्या एका बाजूला जफरभाई होते आणि दुसऱ्या बाजूला असदभाई. तसेच उंच, भरदार शरीर आणि सुंदर निश्चिंत मुद्रा. पेथिड्रिन.

''काय पाहता आहात ?'' खोलीत परत येत रफतमियाँनी विचारले. मग अल्बम पाहून म्हणाले, ''अच्छा ! खरंच, लग्नाच्या वेळी तुम्ही नव्हता ! फक्त सरफराज आलेले होते !''

''हो.'' मी अल्बम बंद करीत म्हणालो, ''फोटो खूप छान आलेले आहेत.''

''अरे, हे तर काहीच नाही. तुम्ही मूव्ही कुठे पाहिली आहे. सगळा लग्न-समारंभ कव्हर केला आहे. फार जोरदार निघालीय,'' रफतमियाँ हसत म्हणाले.

''इथेच आहे का ?'' मी विचारले. का कोण जाणे मला ती पाहावीशी वाटली.

''हो हो.... सगळं काही आहे.'' त्यांनी उत्तर दिले. ''असं करू या, भोजनानंतर प्रोग्रॅमच करू. म्हणजे आरामात बघता येईल. ठीक ?''

''जी, ठीक. तेच बरं होईल.''

''पण तुम्हाला थोडी मदत करावी लागेल.'' रफतमियाँ स्मित करीत म्हणाले, ''पेटी वगैरे उचलावी लागेल.''

''नाही तर ह्या माझ्या प्रकृतीचा उपयोग तरी कधी होणार ?'' मी पण हसतच उत्तरलो आणि आम्ही दोघेही हसू लागलो.

''मग मला वाटतं आपण काढूनच ठेवू या सगळं सामान. नाहीतर जेवण झाल्यावर जरा कठीणच होईल.''

''जी, हेच जास्त बरं होईल.''

रफतमियाँबरोबर मी आत गेलो. बेडरूमला लागूनच आणखी एक खोली होती. दरवाजा उघडून रफतमियाँनी भिंतीत बसवलेला स्विच कितीतरी वेळा खालीवर केला. मग ''बहुतेक बल्ब फ्यूज झालेला दिसतो आहे,'' असे म्हणून ते मेणबत्ती आणायला गेले. थोड्या वेळाने मेणबत्तीच्या मंद उजेडात एकावर एक अनेक पेट्या ठेवण्यात आलेली ती एक स्टोअररूम आहे असे मला दिसले. रफतमियाँ एका लाकडाच्या पेटीसारख्या दिसणाऱ्या बॉक्सकडे निर्देश करीत म्हणाले, ''हीच आहे बरं का मियाँ, जरा हात लावा.''

बॉक्स विशेष जड नव्हती; पण आम्ही दोघांनी मिळून ती ड्रॉइंगरूमकडे उचलून आणली. बॉक्सच्या चारही बाजूंवर आणि वरच्या बाजूलाही धुळीचा चांगलाच थर बसलेला होता. रफतमियाँनी एक कापड घेऊन ती स्वच्छ केली आणि मग उघडत म्हणाले, ''मला वाटतं, सगळं हिच्यातच असलं पाहिजे.''

बॉक्समधे सर्वात वर एका बाजूला एक बराच जुना प्रोजेक्टर ठेवलेला होता. रफतमियाँनी तो उचलला. त्याच्यावरची धूळ झटकत म्हणाले, ''तीस वर्षं झाली पहा या प्रोजेक्टरला. आणि यारदोस्तांनी याची ही अशी हालत केली आहे, नाहीतर एकदम उत्कृष्ट वस्तू होती. कोडॅक आहे. अब्बांनी खास आमच्यासाठी मागवला होता. स्क्रीन वगैरे सगळं काही व्यवस्थित, पण आमचे एक दोस्त घेऊन गेले होते, त्यांनी फाडून परत आणला.''

रफतमियाँ त्याचे स्पूल वगैरे फिट करण्याचा प्रयत्न करीत होते. शेवटी तो जवळच्या टेबलावर ठेवीत म्हणाले, ''चला, काम तर भागेल. जरा हाताने धरावं लागेल...''

नंतर मूव्हीचे डबे उलटसुलट करून पाहू लागले. बॉक्स मूव्हीच्या डब्यांनी भरलेली दिसली. बहुतेक फिल्मा लहान मुलांच्या कार्टूनच्या किंवा फेअरी टेल्सच्या होत्या. त्या बहुतेक त्या काळी अब्बा हुजूरांनी विकत घेतलेल्या असाव्यात.

बऱ्याच वेळानंतर रफतमियाँनी सहा मूव्हीज निवडून बाजूला काढल्या आणि बॉक्स बाजूला सरकवून ठेवली. तेवढ्यात भाभीजान खोलीत आल्या. ''चला, खाना तयार आहे.'' त्या म्हणाल्या. मग प्रोजेक्टर पाहून म्हणाल्या, ''आता काय फिल्मा पाहणार की काय ?''

''खाना झाल्यानंतरचा कार्यक्रम आहे,'' मी हसून उत्तर दिले.

''चला, या तर मग...''

आणि आम्ही डायनिंग रूममध्ये गेलो.

डायनिंग टेबल खूप छान व्यवस्थित सजवलेले होते. पांढरा स्वच्छ खळीचा टेबलक्लॉथ, चांदीच्या ग्लासात फुलांचा आकार देऊन ठेवलेले नॅपकिन्स. क्रॉकरी जुनी होती खरी; पण खूप उंची होती. बहुतेक ब्ल्यू बँड असावी— मी अंदाज केला. चांदीची कटलरी तिन्ही प्लेटींच्या आजूबाजूला व्यवस्थितपणे मांडलेली होती. माझ्या तोंडून अनायासच प्रश्न बाहेर पडला, ''मुलं दिसत नाहीत कुठे ?''

''मुलं त्यांच्या मामीकडे गेली आहेत. येतील उद्या,'' भाभी उत्तरल्या. मग हसून म्हणाल्या, ''म्हणून तर थोडा निवांतपणा आहे. नाहीतर खुदा की कसम, ती असती तर स्वयंपाक करणं तर लांबच राहिलं, धड जेवूसुद्धा दिलं नसतं.''

रफतमियाँ टेबलाच्या एका टोकाला यजमानाच्या खुर्चीवर बसले होते. मी त्यांच्या उजव्या बाजूच्या खुर्चीवर बसलो. भाभीजान टेबलावर खाना मांडत होत्या. माझी दृष्टी टेबलावरच्या कटलरीकडे पाहत होती. सर्व चांदीच्या वस्तूंमध्ये दोन चमचे स्टीलचे होते

आणि ते वेगळे उठून दिसत होते. मी लगेच नजर फिरवली आणि रफतमियाँकडे पाहिले. त्यांची नजर पण नकळत त्याच चमच्यांवर खिळलेली होती. मी उगीचच माझ्यासमोर ठेवलेली प्लेट फिरवू लागलो.

''घ्या, सुरू करा,'' थोड्या वेळाने माझ्या समोरच्या खुर्चीत बसत भाभीजान म्हणाल्या.

मी नजर उचलून पाहिले आणि पाहतच राहिलो. विविध पदार्थांनी टेबल गच्च भरलेले होते. भाभीजानने खरंच खूप मेहनत घेतली असली पाहिजे.

''रोज इथेच खाना घ्यावा असं वाटू लागलंय,'' थोड्या वेळाने हसत भाभीजानकडे पाहत मी म्हणालो.

''पुरे पुरे. तेवढ्यासाठी तारीफ करायची काही गरज नाही,'' त्यांचा चेहरा फुलला होता.

''तारीफ करणे तर फारच अडचणीचे आहे, कारण तुम्ही समोर हजर आहात.'' मी हसलो.

''नहीं भई, खाना आज खरोखरच कमालीचा छान झाला आहे बेगम !'' यावेळी रफतमियाँ हाडापासून मांस वेगळे करीत म्हणाले.

''बरं बरं, पुरे झालं.'' भाभीजानच्या चेहऱ्यावर एक गुलाबी नाजूकसं स्मित उमटलं होतं. नंतर त्या हळूच म्हणाल्या, ''खरं तर आता सवयच राहिलेली नाही. नाहीतर पूर्वी खाना तयार करायला खरोखर आनंद वाटायचा किती. यांची मित्रमंडळी नेहमी येत असत... आणि ते सर्वजण या साऱ्या पदार्थांचं...''

गेलेल्या दिवसांबद्दल बोलत असताना भाभीजानचे डोळे आणखीनच काळे झाले.

जेवण झाल्यानंतर आम्ही सर्वजण ड्रॉइंगरूममध्ये परत आलो. भाभीजान पान लावत होत्या. रफतमियाँ प्रोजेक्टरच्या मागे असलेल्या सोफ्यावर बसून त्यात फिल्म वगैरे भरण्यात रंगले होते. बराच वेळ समोरच्या भिंतीवर प्रोजेक्टरच्या उजेडाचा एक चौकोनी तुकडा थरथरत राहिला. शेवटी एकदाचा फोकस नीट झाला आणि तोंडात पान कोंबत रफतमियाँ म्हणाले, ''हाँ भई, आता मामला जमला. मियाँ, तुम्ही इकडे या. बेगम, तुम्ही पण तिकडेच या.''

आम्ही तिघे एका सोफ्यावर बसलो. प्रोजेक्टर ऑन करून रफतमियाँनी दिवा घालवला आणि समोरच्या भिंतीवर पुन्हा तसाच रंगीत धूसरपणा दिसू लागला. नंतर त्या ठिकाणी एक चित्र दिसू लागले. फिक्कया पिवळ्या रंगाच्या भिंतीवर चित्रांचं प्रतिबिंब तेवढंसं चांगलं येत नव्हतं; पण तरीही चेहरे वगैरे स्पष्ट दिसत होते.

''अच्छा, शादीची दिसतेय,'' भाभीजान म्हणाल्या. मग हळूच म्हणाल्या, ''अरे, हे काय दाखवताय ?''

''भाई, हे शादीला कुठे हजर होते ?'' रफतमियाँनी उत्तर दिले आणि मग मला म्हणू लागले, ''ते पहा... ओळखलं का यांना ? रामपूरचे नबाब आहेत, ते पण आले होते लग्नाला. हे असदभाई, रिसीव्ह करताहेत.''

माझे डोळे चित्रावर खिळून राहिले. असदभाई दाट निळ्या रंगाची शेरवानी घालून नबाबसाहेबांचे स्वागत करीत होते. अगदी एखाद्या फिल्मी हीरोसारखे.

भिंतीवरची चित्रे बदलत होती. रफतमियाँची टिपणी चालू होती... ''ते पहा जफरभाई... आणि ते त्यांच्या पाठीमागे अब्बा उभे आहेत. कशावरून तरी अब्बा त्या वेळी रागावलेले होते... आणि ते पहा... अब्बांच्या शेजारी उभे आहेत ते... काय बरं नाव त्यांचं ?... अरे फार मोठी असामी होती त्या वेळची.. अब्बांचे फार जिगरी दोस्त होते... आणि ही इकडे पार्टीची तयारी चाललेली आहे. इथे समोरच झाली होती.... बागेत.... ते पहा कारंजं दिसतंय ना ?...'' माझे डोळे खरोखरच कारंज्यावर खिळून राहिलेल होते. खालच्या हौदात बदके पोहत होती... त्याच हौदात उभी राहून गजाला... कारंज्याच्या अगदी मधोमध एक छत्रीसारखं काहीतरी होतं. त्याच्यामुळे पाणी एका विशिष्ट प्रकारे खाली पडायचे. छत्रीच्या खाली जणू तिचे रक्षण करीत आहेत अशी पाषाणातून कोरलेल्या देवदूतांची शिल्पे होती. त्यांच्या पंखांवर छत्री तोलून धरल्यासारखी दिसत होती.

कारंज्याची छत्री आता मोडून गेलेली होती. त्याचबरोबर देवदूतांचे पंख पण...

''ही बेडरूम पहा... असदभाईनी सजवली होती. मियाँनी एका बागवानाकडून सबंध ताटवाच विकत घेऊन टाकला होता. फक्त सजावट करण्यासाठी...''

समोर रफतमियाँच्या पहिल्या रात्रीची बेडरूम दिसत होती. थोड्या वेळापूर्वी गेलो होतो तीच खोली होती. पण अगणित फुलांनी आणि गजऱ्यांनी नटलेली. जमिनीवर सर्वत्र गुलाबाच्या पाकळ्या अंथरलेल्या होत्या.

''....या बेगम आहेत. बरोबर लुबना आणि ती अर्शी... आता त्या दोघी बिचाऱ्या पाकिस्तानात आहेत. अच्छा, ही लग्नानंतरची पंगत दिसतेय... याच खोलीत झाली. हे पहा, इथेच बसलेल्या होत्या, तुम्ही बसला आहात तिथेच.''

समोर भाभीजानचे चित्र होते. अगदी याच जागेवर बसलेल्या होत्या. लाल जरीची साडी नेसलेल्या. सुंदर, सडपातळ, अशक्त, नाजूकशा भाभीजान ! त्यांच्यासमोर ग्लासटॉपच्या टेबलावर तीच बेल्जियम ग्लासची सुंदर फुलदाणी ठेवलेली होती. त्यात लांबलांब देठांचे लाल आणि पिवळे गुलाब ठेवलेले होते. ताजी, सुंदर फुलं.

अहेतुकपणे माझी दृष्टी समोर जरा लांबवर असलेल्या ग्लासटॉप टेबलाकडे गेली. टेबल तिथेच होते. समोर लावलेल्या आरशात भिंतीवर दिसणाऱ्या चित्रांचं अस्पष्ट, वेडवाकडं प्रतिबिंब पडत होतं. चित्रं बदलत होती, त्याचबरोबर त्यांची प्रतिबिंबही बदलत होती. आणि धूसर, पळणाऱ्या, एकमेकात मिसळणाऱ्या रंगांच्या प्रसारात वेढली गेलेली

फुलदाणी तिथेच होती... बेल्जियम ग्लासची संपूर्ण रिकामी फुलदाणी. एका क्षणात मला असं वाटून गेलं की इतक्या वर्षांत भाभीजानचा चेहरा पण त्या फुलदाणीसारखा रिकामा होऊन गेला आहे. सुंदर त्या अजूनही होत्या. चेहरामोहरा तोच होता. तोच गोरा रंग. पण काहीतरी जे होतं ते आता नाही आहे.— लांब दांड्यांच्या लालपिवळ्या गुलाबासारखं काहीतरी...

''आणि ही लग्नानंतरच्या खान्याची...'' रफतमियाँ सांगत होते. ''ते पहा, निजाम हैद्राबाद उभे आहेत. त्यांच्याबरोबर असद आहे... आणि ते तिकडे सर रॉबर्ट आहेत... आणि ते...''

बरीच प्रसिद्ध नावे रफतमियाँ घेत चालले होते. काहीजणांचे चेहरे मला ओळखता येत होते. कारण त्यांचे फोटो आधी वर्तमानपत्रात वगैरे पाहिलेले होते. या सगळ्या गर्दीत असदभाईंचा चेहरा पुन:पुन्हा सगळ्याहून वेगळा दिसत होता. तिन्ही भावंडात अब्बांचं व्यक्तिमत्त्व अत्यंत प्रखरपणे आणि स्वभावाच्या वैशिष्ट्याने असदभाईंमध्येच प्रत्ययास येत होते.

''आणि अब्बा वृक्षारोपण करून घेत आहेत बेगमकडून... याच बागेत... अब्बांनी खूप वृक्ष लावले होते... आम्ही सर्वांनी वृक्षारोपण केले होते... फक्त एकच वृक्ष नीट लागला... तिकडे आहे तो, तुम्ही पाहिला असेलच...तुमच्या तिकडच्या बाजूला एक आंब्याचे झाड आहे ना... तेच... असदमियाँनी लावलं होतं...''

थोडा वेळ फक्त प्रोजेक्टर चालू असल्याचा विचित्र आवाज ऐकू येत राहिला. मग रफतमियाँचा आवाज ऐकू आला, ''ही पण बागेतली आहे.'' चित्रात रफतमियाँ आणि बेगम बागेत फिरत आहे...

''भई, कसम से, त्या वेळी किती उमदी बाग होती म्हणून सांगू. विलायती गवत होतं मियाँ, अगदी जसा गालिचाच... आता या साल्या म्युनिसिपालटीवाल्यांनी पाण्याचे मीटर सुरू केले आहेत... वाटोळं करून टाकलंय...''

मी मुकाट्याने ऐकत होतो.

त्यानंतर आणखी काही मूव्हीज होत्या. पिकनिकच्या, पाहुण्यांच्या, शिकारीच्या. एका शॉटमधे रफतमियाँ मारलेल्या सिंहावर एक पाय आणि रायफल ठेवून उभे होते.

''हा, मियाँ, शेवटचा सिंह मारला,'' रफतमियाँ म्हणाले.

''जी,'' मी म्हणालो.

आणि त्याचबरोबर भाभीजानचा 'ऊंह' असा व्यंगस्वर उमटला. त्याचबरोबर दिवेही लागले.

''असं आहे, मियाँ...'' रफतमियाँ हसत होते.

''फार जोरदार मूव्हीज आहेत.'' मला दुसरं काही म्हणायला सुचलं नाही.

रफतमियाँ प्रोजेक्टर आणि फिल्म आवरून ठेवायला लागले. मी भाभीजानकडे

पाहिले. त्या माझ्याकडेच पाहत होत्या. एक क्षणभर त्या चमकल्या आणि मग लाजल्यासारखं एक उदास स्मित त्यांच्या चेहऱ्यावर पसरलं.

थोडा वेळ रफतमियाँ आणखी बऱ्याच गोष्टींवर बोलत राहिले. त्या काळातल्या. भाभीजान बहुतेक वेळ गप्पच राहिल्या. मी मुकाट्याने रफतमियाँच्या गोष्टी ऐकत राहिलो. हळूहळू त्यांना पण जांभया येऊ लागल्या. मी घड्याळ पाहिले. बारा वाजून गेले होते.

''बरंय तर मग,'' मी हळूच म्हणालो, ''निघतो आता. बराच उशीर झालाय.''

''बरं, फार दिवसांनी इतक्या निवांतपणे बसायला मिळालं म्हणा,'' रफतमियाँ उभे राहत म्हणाले, ''अच्छा मग...''

मी त्या दोघांना 'शुभरात्री' म्हणून खोलीबाहेर आलो. बाहेर चांदणे पडलेले होते... बेहोश झाल्यासारखे.

एकदा वाटले की आपल्या खोलीकडे जावे. पण मग वाटले की एवढ्यात झोप नाही येणार... मी हळूहळू पोर्चच्या समोर थोडे बाजूला कारंज्याजवळ येऊन उभा राहिलो. समोर जमिनीत रुतल्यासरखी ब्यूक उभी होती, पोर्चच्या अंधारात. उजवीकडे खाली रस्त्याच्या पलीकडे तलाव दिसत होता. लांबपर्यंत पसरलेल्या चांदीच्या चमचमत्या चादरीसारखा. उजव्या बाजूच्या लांबलचक व्हरांड्यात थोड्या थोड्या अंतरावर चांदीचे तुकडे अंथरल्यासरखे दिसत होते, मेलेल्या जनावराच्या मऊ केसाळ कातड्यासारखे. व्हरांड्यातच एका खांबाजवळ एक डेक चेअर होती. अगदी रिकामी... जहाजावर, वरच्या डेकवर एक म्हतारा जर्मन नेहमी अशाच डेक चेअरवर बसलेला असायचा. दूरवर पसरलेल्या समुद्राकडे पाहत राहायचा. काही दिवसांनंतर आमची ओळख झाली होती. त्याच्या मोडक्यातोडक्या इंग्रजीत तो नेहमी खूप छान गप्पा मारायचा. एकदा समुद्राच्या बदलत्या रंगासंबंधी मी काहीतरी म्हणालो. कारण दिवसभरात समुद्राचे अनेक रंग बदलत असत. कधी हिरवा, कधी निळा, कधी राखी, कधी आकाशी, कधी अगदी काळा. उत्तरादाखल हसत तो जर्मन म्हातारा माझ्याकडे पाहत त्याच्या इंग्रजीत म्हणाला होता, ''इट इज डा कलर ऑफ डा स्काय डॅट चेंजेस, यंग मॅन, नॉट ऑफ डा सी...''

सुट्टीचा दिवस होता. जफरभाई आणि रफतमियाँ सकाळीच कुणाच्या तरी अंत्यविधीसाठी गेले होते. आता दुपार होऊ लागली होती. थंडी जरा जास्तच होती. कदाचित खोलीत बसून राहिल्यामुळेही जास्त वाटत असावी. नॉव्हेल घेऊन बाहेर उन्हात बसावे या हेतूने मी हवेलीच्या मागच्या बाजूला आलो होतो. काही दिवसांपूर्वी अहेतुकपणे भटकत असताना मी हा भाग पाहिला होता. आपाबेगम, गजाला राहतात त्याच्या बरोबर मागे हा एक ओसाड भाग होता. त्यात एका बाजूला कोपऱ्यात जुन्या काळच्या तबेल्याच्या पडलेल्या भिंती आणि वासे यांचा ढिगारा होता. तेथून जवळच घोड्यांना

आंघोळी घालण्याचा एक लहानसा तलाव होता. त्यात आता कचऱ्याचा ढिगारा साठलेला होता. आणि या जागेपासून थोड्या अंतरावर एक जुना, खूप मोठा चिंचेचा वृक्ष होता. त्याच्या चारी बाजूंनी एक पक्का गोल ओटा बांधलेला होता. जवळच एका तोडलेल्या वृक्षाचा एक बराच मोठा बुंधा पडलेला होता. मी त्याच्यावर बसून नॉव्हेल वाचत होतो. थोड्या वेळाने एक जरा चांगलासा भाग शोधून मी त्या बुंध्यावरच अर्धवट आडवा झालो. ऊन फारच छान वाटत होते. थोडा वेळ मी आकाशाकडे पाहत राहिलो. अगदी निर्मळ निळ्या रंगाचा विस्तार.

नॉव्हेल वाचता वाचताच थोड्या वेळाने मला जवळपास काहीतरी हालचाल होत आहे असे जाणवले. मी मान वळवून पाहिले. आपाबेगम राहतात त्या भागाच्या मागचा दरवाजा उघडून गजाला बाहेर आलेली होती. बहुतेक न्हाऊन आलेली असावी. कारण नंतर ती एका मोठ्या पाषाणावर इकडे पाठ करून केस पसरून बसली होती. गजालाचे केस खूप लांबसडक होते.

मधल्या काळात गजाला फक्त एकदाच भेटली होती. त्या दिवशी आपाबेगमनी जेवायला बोलावले होते, तेव्हा गजाला हजर होती. नेहमीसारखेच औपचारिक बोलणे त्या वेळी झाले होते. गजालाचा ढंग अगदी तसाच होता. परिणामी बहुतेक वेळ मी आपाबेगम आणि फरियाल यांच्याशीच बोलत राहिलो होतो.

मधल्या काळात गजाला दिसली मात्र होती बऱ्याच वेळेला. दोन-तीन वेळा तिचा आवाजही ऐकू आला होता. किंबहुना गेल्या रात्री गजालाचा आवाज जेव्हा माझ्या कानांवर पडला होता, तेव्हा बराच वेळपर्यंत माझ्या धमन्यांत जणू काही जड निस्तब्धता विरघळू लागली होती आणि माझ्या रक्ताबरोबर वाहू लागली होती. गजाला बहुतेक आपाबेगमला उद्देशून मोठ्याने, जवळजवळ ओरडतच म्हणत होती, ''मग तुला काय वाटतं, तुझ्या शिवणकामाच्या मशीनवर घर चाललंय ? आणि जर तुला माझ्या चालचलवणुकीची काळजी वाटत आहे, तर तू काय माझं लगेच लग्न करून देणार आहेस का ?...''

गजालाचे हे उद्‌गार जणू काही माझ्या मेंदूतल्या अनेक चित्रांच्या खाली चित्रसूचक वाक्यासारखे चिकटून बसले होते. गेल्या काही दिवसांपासून बऱ्याच वेळेला बरीच रात्र झाल्यावर एखादी गाडी 'मुराद मंझिल'च्या बाहेर येऊन थांबत असे. आणि त्या गाडीतून उतरून गजाला मुकाट्याने घरात जात असे. दर वेळी नवी गाडी...

काही का असेना, रात्रीच्या त्या उद्‌गारात गजालेच्या संबंधी असलेल्या माझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळालेली होती. त्यानंतरही बराच वेळपर्यंत आवाज येत राहिले. आरडाओरडा करणारे आवाज...

'मुराद मंझिल'मधले बहुतेक लोक बोलायला लागले म्हणजे बहुधा आरडाओरडा करायला लागतात. ही गोष्ट विचित्र असली तरी एवढ्या काही दिवसांत ती अनेक वेळा

माझ्या अनुभवास आली होती. जफरभाई आणि रफतमियाँपासून ते भाभीजान, गजाला यांच्यापर्यंत एवढेच नव्हे; तर हलीमा आत्यालाही मी बऱ्याचदा एवढ्यातेवढ्या गोष्टीवरून आरडाओरडा करीत असताना ऐकलेले आहे ! आपापसात कसले का बोलणे असेना, फार थोडा वेळ शांतपणे चालायचे ! मग अचानक आवाज मोठा होत जायचा आणि मला अटळपणे जहाजावरचे जीवन आठवायचे ! समुद्रात कधी वादळ झाले किंवा लाटा उसळू लागल्या म्हणजे नेहमीच जहाजावरच्या खलाशांना एकमेकांशी जोरजोरात ओरडतच बोलावे लागते ! वेगाने वाहणारे वादळी वारे आणि जहाजांना धडका मारणाऱ्या लाटा यांच्या प्रचंड आवाजात ते लोक खूप मोठ्याने ओरडायचे पण शब्द मधेच तुटून विखरून जायचे...

मी नॉव्हेल पुन्हा उघडली; पण वाचनात मन लागले नाही ! नजर अनायासपणे गजालेच्या दिशेने जात तिच्या लांबलांब केसांवर जाऊन थांबली होती !

थोड्या वेळाने गजाला अचानक उठली आणि त्याच वेळी तिची दृष्टी इकडे वळली. काही क्षण ती तशीच उभी राहून माझ्याकडे पाहत राहिली. मग हळूहळू इकडेच येऊ लागली.

''इथे कसं काय बसलास ?'' जवळ येऊन तिने आपल्या विशिष्ट आत्मविश्वासाने विचारले.

''सहजच ! खोलीत जरा थंडी वाजत होती...''

''हूं ऽऽ!''

गजालेला साध्या, घरगुती पोशाखात मी प्रथमच पाहत होतो. ती न्हाऊन आलेली होती. त्यामुळे तिच्या चेहऱ्यावर स्वच्छ ताजेपणा दिसत होता ! लहानपणाची ती लाल गालांची गोबरी मुलगी आणि ही गजाला यांच्यामध्ये मला प्रथमच एक खास सारखेपणा जाणवला.

''तुझी नोकरी कशी काय चालली आहे ?'' गजाला विचारीत होती.

''बरी चाललीय !''

आणि अचानक मला वाटले की आपणही हाच प्रश्न गजालेला विचारावा ! का कुणास ठाऊक, अचानक हा प्रश्न गजालेला विचारून तिला त्रास द्यावा असे मला वाटले. आज प्रथमच मला ती इतकी चांगली वाटत होती तरीसुद्धा.

''कुठे गेला नाहीस आज...?'' थोड्या वेळाने आणखी एक प्रश्न !

'हूं. जावंसं वाटलं नाही !''

''हूं ऽऽ''

ती थोडा वेळ जमिनीकडे पाहत मुकाट्याने उभी राहिली.

''एक गोष्ट सांगू ?'' थोड्या वेळाने माझ्या तोंडून आपोआपच शब्द बाहेर पडले.

''काय ?''

‘‘वाईट तर वाटून घेणार नाहीस ?’’

‘‘नाही !’’ अनायासच तिच्या चेहऱ्यावर पुन्हा सावधपणा आला होता.

‘‘इथे यायच्या आधी वाटलं होतं की... का कोण जाणे असं वाटत होतं की तुझी भेट झाल्यावर आनंद होईल...’’

ती मुकाट्याने तशीच उभी राहिली. मग पुन्हा आपल्या संयत आवाजात म्हणाली, ‘‘मला असं वाटलं नव्हतं !’’

वाऱ्याच्या एका मोठ्या झुळुकीने वातावरणात मंद सळसळ निर्माण केली होती. चिंचेची वाळलेली नाजूक पानं हळूहळू खाली पडत होती. माझी दृष्टी वर गेली आणि मी पाहतच राहिलो ! बालपणी भर दुपारी आम्ही दोघं खेळत असू तोच हा जुना चिंचेचा वृक्ष ! खूप घनदाट सावली असलेला वृक्ष होता. दुपारीसुद्धा त्याच्या तळाशी थंडगार अंधार पडलेला असायचा ! पण आता ? खूप थोडी पाने शिल्लक राहिलेली होती आणि उघड्यावाघड्या फांद्यांच्यामधून उन्हाचे आणि उजेडाचे मोठेमोठे कवडसे खालच्या ओट्यावर आणि जमिनीवर पडत होते.

फॅक्टरीच्या कॉलनीत फ्लॅट मिळणार ही गोष्ट तशी जॉइन होतानाच ठरलेली होती; पण फ्लॅट इतक्या लवकर ताब्यात मिळेल असे मला वाटले नव्हते. दोन-तीन महिने तरी लागतील असे मला वाटले होते. पण फ्लॅट रिकामा होऊन एक आठवडा झाला होता. पंधरा दिवसात तिथे जाऊन राहणे आवश्यकच होते. गेले काही दिवस मी या विचारातच होतो की आज जफरभाईंना किंवा रफतमियाँना सांगायचेच; पण रोजच मी उद्या सांगू म्हणून ही गोष्ट टाळत होतो. हळूहळू मला आता माझाच राग येऊ लागला होता. शेवटी मलाच सांगावे लागणार आहे, मग त्यात लाज वाटायचे काय कारण होते ?

दारावर थाप पडली. मी आरामखुर्चीतून बसल्याबसल्याच म्हणालो, ‘‘कोण ? दार उघडेच आहे.’’

‘‘हुजूर, मी आहे...’’ जफरभाईंचा नोकर दार उघडून आत आला, ‘‘आपल्याला बोलावलंय.’’

‘‘ठीक आहे. आलोच म्हणून सांग.’’

‘‘जी हुजूर.’’

अचानकच माझ्या डोळ्यांसमोर जफरभाईंची ड्रॉइंगरूम उभी राहिली. त्यांच्या मित्रांच्या येण्याची वेळ झालेली होती. का कोण जाणे अलीकडे मला या बैठकांची भीतीच वाटू लागलेली होती. प्रौढ आणि म्हाताऱ्या लोकांची एक विशिष्ट प्रकारची जमात, त्यांच्या गप्पा नेहमी काही खास विषयाभोवतीच फिरत राहतात. दारू, राजकारण, गावंढळ विनोद आणि एक खूप मोठा गेलेला जमाना. नाहीतर मग हजर नसलेल्या लोकांच्याबद्दल चमत्कारिक गोष्टी. वास्तविक जफरभाईंच्या मित्रांपैकी

त्यांच्याकडे रोज येणारे मित्र फक्त सलीममियाँ हेच होते. नाही तर दर वेळी दोन-तीन नवेच चेहरे असायचे. काही दिवस ते नियमितपणे दिसायचे मग अचानकच नाहीसे होऊन जायचे— जहाजावरच्या पक्ष्यांसारखे. जहाज ब्रिटनहून निघाले तेव्हा त्याच्यावर असंख्य पक्षी बसलेले होते हे मला कितीतरी वेळा आठवले होते. प्रवासातच मला अनेकदा असे आढळून आले होते की सकाळीच बहुतेक पक्षी दूर समुद्राकडे उडून जायचे आणि दिवसभर कुठे गुप्त होऊन जायचे कोण जाणे. पण संध्याकाळ झाली की ते सगळे परत यायचे रात्र घालवण्यासाठी. नंतर त्या म्हाताऱ्या जर्मनाने मला सांगितले होते की ''बरेच पक्षी ऋतू बदलला की जागा बदलतात आणि जहाज हा पण त्यांचा एक मार्ग आहे...''

मी उठून कपडे बदलले आणि बाहेर पडलो. पोर्चमध्ये गाड्या उभ्या होत्या. मी हळूहळू ड्रॉइंगरूमकडे चालू लागलो. मी आत गेलो तेव्हा मला थोडे आश्चर्य वाटले; कारण आत चार-पाच महाशय बसलेले होते. अगदी शांत. सलीममियाँ नव्हते. मी सलाम करीत एका बाजूच्या सोफ्यावर जाऊन बसलो.

जफरभाई बहुतेक आत गेलेले असावेत. मला काहीतरी विचित्र वाटत होते. लोक इतके गप्प बसलेले होते की ते एखाद्या कबरीजवळ बसले आहेत, फातिहा पढताहेत, मुकाट, असे मला वाटले. खोलीत प्रकाश मंद होता. पिवळा, आजारपणाची अवकळा असल्यासारखा. मी वर पाहिले. झुंबर पेटलेले होते. मी अंदाज केला की बहुतेक त्याच्या काचा पिवळ्या पडलेल्या असाव्यात. अनायासच जहाजावरचे डायनिंग रूम डोक्यात जागे झाले. किती प्रखर उजेड असायचा तिथे. अगदी पांढराफेक, जीवनाची लकाकी असलेला.

माझ्या समोरच्या बाजूला जवळजवळ बसलेल्या दोघा जणांनी हलक्या आवाजात बोलायला सुरवात केली होती.

थोड्या वेळाने जफरभाई हसत खोलीत आले. माझ्यासमोर बसलेले दोघे जण उठून उभे राहिले. आपला परिचय करून देऊ लागले. ते नॅशनल आर्काइव्हकडून आलेले आहेत असे कळले.

''अच्छा, अच्छा... बसा ना !'' जफरभाई म्हणत होते.

त्यानंतर जफरभाईंनी सगळ्यांना माझी ओळख करून दिली आणि आपल्या मित्रांची परवानगी घेऊन त्या दोन माणसांशी ते बोलू लागले. जफरभाई आणि रफतमियां यांच्याजवळ काही खूप जुनी, राजकीय महत्त्व असलेली पत्रे आणि आणखी काही कागदपत्रे आहेत अशी माहिती मिळाल्यामुळे आर्काइव्हजच्या लोकांना ती पाहायची आहेत वा विकत घ्यायची आहेत असे कळले.

''होय, महाशय. आहेत, पुष्कळ गोष्टी आहेत.'' जफरभाई सांगत होते, ''तुम्ही एखाद्या दिवशी सवड काढून या आणि पहा. खरं तर आमच्याकडे अफाट वस्तू आहेत.

पत्रं वगैरे तर हजारो आहेत म्हणा ना. मला काय म्हणायचंय की सगळीच काही एवढी महत्त्वाची नसतील; पण खूप काही आहेत. काही पत्रं जिना यांनी अब्बाजानना लिहिलेली आहेत... एलिझाबेथ राणीचेही एक पत्र आहे. ...आणि गांधींची, नेहरूजींची पण आहेत. माझे धाकटे बंधू रफतुल्लाखान आहेत, त्यांच्याजवळही बऱ्याच वस्तू आहेत, आपण पाहून घ्या.''

''ठीक आहे, फारच छान.''

थोडा वेळ शांतता पसरली. मग जफरभाईंनी हळूच विचारले, ''अच्छा, तुम्ही म्हणजे आर्काइव्हवाले, या गोष्टी काय नीट विकत घेता !''

''हो ना. ज्या वस्तू किंवा डॉक्युमेंट्स इंपॉर्टंट असतात त्या आम्ही विकत घेतो.''

''हूं ऽऽ, मला वाटतं, म्युझियमवाले घेतात तसंच ना ?''

''हो. तसंच समजा. पण म्यूझियमवाले पैसे जास्त देतात; कारण वस्तूही त्याच दर्जाच्या असतात, पेंटिंग्ज वगैरे. त्यांची किंमत जास्त असते हे उघडच आहे.''

''हो, हो...उघडच आहे.'' जफरभाई घाईघाईने म्हणाले. मग थोडे थांबून माझ्याकडे व आपल्या मित्रांकडे पाहत हसत म्हणाले, ''भाई, आमच्याकडे किती वस्तू पडून आहेत कोण जाणे ! आणि आम्ही काही पैशाच्या दृष्टीने इंटरेस्टेड नाहीत. असं वाटतं की इतक्या महत्त्वाच्या वस्तू आहेत तर त्या लोकांच्यासमोर यायला पाहिजेत, नाहीतर आम्हाला काय...''

''हो. उघडच आहे.''

''तुम्ही पाहाल तर तुमच्या लक्षात येईल, काही पत्रं तर अशी आहेत महाशय की त्यांच्यामुळे अर्धा इतिहास चुकीचा आहे असे सिद्ध होऊ शकेल...''

''हो.''

थोडा वेळ जफरभाई त्यासंबंधीच बोलत राहिले. मग 'पुन्हा एखाद्या दिवशी येऊ' असा वायदा करून ती दोन माणसे निघून गेली.

''भई, माफ करना, हे लोक आले होते ना...'' जफरभाई त्यांना बाहेर पोहोचवून खोलीत परत येत म्हणाले.

''नाही नाही. ठीक आहे मियाँ...'' त्यांच्या एका मित्राने उत्तर दिले. जफरभाईंनी नोकराला हाक दिली आणि ग्लास वगैरे आणायला सांगितले.

प्याले भरले गेले होते. जफरभाई म्हणाले, ''घ्या भई, उचला.'' अनेक संमिश्र आवाजात मी पण एक प्याला उचलला आणि एक घोट घेतला.

समोर बसलेले गृहस्थ जफरभाईंना म्हणत होते, ''अरे मियाँ, मी तर विसरूनच गेलो. ते आपले अब्बासमियाँ आहेत ना, अरे ते, ते आपल्या मौलानाचे धाकटे बंधू, ते सध्या रायफल मिळवायच्या काळजीत पडलेले आहेत. तुम्हाला तुमची थर्टी स्प्रिंगफील्ड काढून टाकायची आहे ना... म्हणत असाल तर बोलणी करू ?''

मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहतच राहिलो. लोक काही गोष्ट किती सहजपणे बोलून टाकतात. कसल्याही प्रकारच्या गोष्टी. मला फॅक्टरीतल्या फ्लॅटची आठवण झाली. मी ग्लास उचलून आणखी एक घोट घेतला.

जफरभाई दुसरा पेग बनवीत होते. त्यांचे डोळे चमकू लागले होते.

वेटर दुसऱ्यांदा बियर ओतत होता. थकावट विरून चालली होती. इथे येऊन बसणे बरेच झाले.

लंचनंतर ऑफिसला अचानक सुट्टी मिळाली होती. त्या वेळी खूपच राग आला होता; कारण आज सकाळी नोकराने उठवले तेव्हा ऑफिसला जायची मुळीच इच्छा नव्हती. ऑफिसला सुट्टी मिळाल्यामुळे दिवसाचा उरलेला भाग कसा घालवावा ही मात्र तापदायक गोष्ट होती. शेवटी ठरवले की इथे येऊन बियर प्यावी. या शहरातल्या एखाद्या रेस्टॉरंटमध्ये एकटे जाण्याची ही माझी पहिलीच वेळ होती.

वास्तविक सकाळी झोप झाली तेव्हा असे वाटत होते की थकलेपणाच्या एखाद्या जड खडकाखाली शरीर दडपले गेले आहे. काल रात्रभर झोप आलेली नव्हती. अगदी पहाटे काही क्षण डोळे मिटले होते एवढेच.

रात्री खूप उशीरापर्यंत गजाला आणि आपाबेगम यांचे आवाज येत राहिले होते. स्पष्ट असे काहीच ऐकू येत नव्हते. पण कुठल्यातरी महत्त्वाच्या प्रकरणावर खूप वेळ बोलणी चाललेली आहेत असे वाटत होते. मधूनमधून आपाबेगमच्या शिव्या ऐकू येत होत्या, नाही तर त्यांचाच रडण्याचा आवाज ऐकू येत होता. आधी मी काही विशेष महत्त्व दिले नाही; कारण बोलणी बहुतेक रफतमियाँ आणि भाभीजान यांच्याबद्दलच चाललेली होती. भाभीजान काल दिवसा आपल्या माहेरी निघून गेल्या होत्या.

वस्तुत: गेल्या तीन-चार दिवसांपासून मुराद मंझिलच्या आयुष्यात एक चमत्कारिक अशुभ उदासपणा आलेला होता. अगदी शांत आणि निस्तब्ध समुद्रात अचानक वादळ उठावे तसा. शुक्रवारी रात्री भाभीजान आणि रफतमियाँ यांच्यामध्ये भांडण झाले होते. शेवटी जफरभाईंवर तेथे जाऊन त्यांची समजूत घालावी लागण्याची पाळी आली होती. सगळे प्रकरण भाभीजान आणि रफतमियाँचे कोणीतरी मित्र यांच्या संबंधात होते एवढेच मला कळू शकले होते. एकूण ती रात्र आणि दुसरा दिवस याच भानगडीत गेला. त्या दोघांशी वेगवेगळी अशी बोलणी जफरभाईंनी तासन्‌तास केली होती; पण काहीच उपयोग झालेला नव्हता. काल म्हणजे रविवारी भाभीजान बरंच अवजड सामान बरोबर घेऊन माहेरी निघून गेल्या होत्या.

काल रात्री रफतमियाँ पण जफरभाईंच्या ड्रॉइंगरूममध्ये इतर लोकांच्या बरोबर शेवटपर्यंत बसून राहिले होते.

बारा वाजण्याच्या सुमारास मी माझ्या खोलीत परत आलो होतो. बराच वेळ

शेजारून बोलण्याचे आवाज येत राहिले. पण जेव्हा आपाबेगमच्या रडण्याचा आवाज ऐकू आला, तेव्हा मी खिडकीच्या जवळ जाऊन उभा राहिलो होतो. बराच वेळ उभा राहिलो तरी हुंदक्यांच्या मधून येणाऱ्या काही घाणेरड्या शिव्यांशिवाय मला दुसरे काहीच ऐकू आले नव्हते.

सकाळचा नाश्ता जफरभाईंबरोबरच झाला होता. जास्त काही बोलणे झाले नव्हते. मी ऑफिसला जाण्यासाठी निघालो तेव्हा जफरभाई बाहेरपर्यंत आले होते आणि मग आपाबेगमच्या बाजूकडे गेले होते.

पाच वाजले होते. निघायला हवं असा विचार करून मी वेटरला बिल आणायची खूण केली आणि उरलेल्या बियरचे मोठमोठे घोट घेऊन टाकले.

मुराद मंझिलकडे जाईपर्यंत संध्याकाळ होऊन गेलेली होती. मी टॅक्सी गेटवरच थांबवली आणि हळूहळू कंपाउंडमध्ये आलो. समोरच पोर्चच्या थोडे पुढे जफरभाई उभे होते. आणि त्यांच्या पुढे उजव्या बाजूला आपाबेगमच्या दरवाजासमोर एक टॅक्सी उभी होती. तिच्यात सामान चढवले जात होते. मला काहीच समजले नाही; पण तरीही माझ्या आत कुठेतरी काहीतरी थरथरल्यासारखे झाले. मी जफरभाईंकडे वळलो.

''काय...आलास... ?'' जफरभाई हळूच म्हणाले.

''जी...पण हे काय ?'' माझ्या तोंडून बाहेर पडले.

''काही नाही...गजाला निघालीय,'' आवाजावर संयम ठेवीत त्यांनी उत्तर दिले.

''कुठे ?''

''मुंबईला.'' आणि ते गप्प बसले.

दर क्षणाला अंधार दाट होत चालला होता.

तेवढ्यात गजाला दारातून बाहेर आली आणि तिच्याबरोबर फरियालही हुंदके देत बाहेर पडली. गजालाचा एक हात फरियालच्या खांद्यावर होता. बाहेर आल्यावर तिने एकदम फरियालला आपल्या मिठीत घेतले आणि तिला हळूच म्हणाली, ''अगं, रडू नकोस... वेडी कुठली,'' आणि तिच्यापासून बाजूला होत ती इकडे वळली. जफरभाईंच्या जवळ आल्यावर तिने एकवार माझ्याकडे पाहिले आणि मग जफरभाईंना म्हणाली, ''अच्छा, बडे अब्बा... !''

''अच्छा बेटे !'' जफरभाईंनी आपला हात तिच्या डोक्यावर ठेवला आणि हळूच म्हणाले, ''खुदा तुला खुश ठेवो !''

गजालाने पुन्हा एकदा माझ्याकडे पाहिले आणि मुकाटपणे सलाम करण्यासाठी हात उचलला.

अंधार आता इतका वाढला होता की गजालेचा चेहरा मला नीट दिसतही नव्हता. काहीही करून तिचे डोळे मला दिसावेत... तिचा चेहरा दिसावा... या वेळी तिच्या

चेहऱ्यावर कोणते भाव आहेत ते पाहता यावेत यासाठी मी अतिशय बेचैन झालेलो होतो.

''अच्छा...खुदा हाफिज !'' गजाला वळली.

ती सरळ टॅक्सीत जाऊन बसली. फरयाल अजूनही दाराजवळ उभी राहून हुंदके देत होती. टॅक्सी स्टार्ट होताच ती आत पळाली. थोडा वेळ टॅक्सीच्या एक्झॉस्टचा आवाज येत राहिला. आणि मग थकलेली, काळी पडत चाललेली संध्याकाळ एकदम कोसळून पडली.

आम्ही दोघे पोर्चमध्ये शिरलो. मी हात पुढे करून पोर्चचा दिवा लावला. पिवळा उजेड जणू काही अचानक थबकून उभा राहिला—संकोचल्यासारखा. जफरभाईंनी चमकून माझ्याकडे पाहिले. पोर्चमधल्या मंद उजेडात त्यांच्या चेहऱ्यावर चमत्कारिक रंग दिसत होता. मातकटल्यासारखा पिवळा. एखाद्या जुनाट पुस्तकाच्या पानांच्या रंगासारखा. दाढीचा लालपणाही गंज चढलेल्या रंगासारखा दिसत होता. जफरभाई खूपच म्हातारे झाले आहेत हे त्या वेळी मला प्रथमच जाणवले.

जफरभाई मान खाली घालून पोर्चच्या पायऱ्या चढत होते. मी तिथेच उभा राहून त्यांना त्यांच्या ड्रॉइंगरूममध्ये जात असलले पाहत राहिलो आणि नंतर माझ्या खोलीकडे गेलो.

खोलीत येऊन मी दिवा लावला आणि खिडकीजवळ जाऊन उभा राहिलो. शेजारून रडण्याचा आवाज येत होता. बहुतेक आपाबेगमच असाव्यात. समोर थोड्या अंतरावर अंधारात आंब्याचे झाड वाकलेले दिसत होते. मी खिडकी बंद केली आणि आरामखुर्चीवर येऊन बसलो. बंद डोळ्यांसमोर एक मूव्ही चालू झालेली होती—गेल्या दिवसांतली एक एक गोष्ट, एक एक चित्र— रफतमियाँ, भाभीजान, गजाला, जफरभाई...

किती वेळ मी तसाच बसून राहिलो, कळलेच नाही. घड्याळाकडे पाहिले तेव्हा सात वाजले होते. जफरभाई एकटेच असतील बहुतेक हे माझ्या ध्यानात आले. तशी त्यांच्या मित्रांच्या येण्याची वेळ झालेली होती. मी उठून कपडे वगैरे बदलले आणि बाहेर पडलो. रफतमियाँच्या भागात पूर्ण अंधार होता. त्याशिवाय सर्वत्र पसरलेल्या अंधाराने वेढलेली शांतताही दाटली होती. फक्त पोर्चचा दिवा जळत होता. ड्रॉइंगरूममध्येही उजेड होता. मी आत येऊन पाहिले. जफरभाई दिवाणावर अगदी सरळ आडवे झालेले होते. छताकडे पाहत होते. खोलीत उदबत्तीचा मंद सुगंध दरवळत होता. क्षणभर मला असे वाटले की आपण एखाद्या खूप जुन्या शाही महालाच्या तळघरात उभे आहोत आणि समोर हजारो वर्षांपूर्वीच्या कोण्या बादशहाची ममी ठेवलेली आहे.

पावलांचा आवाज ऐकू आला तशी जफरभाईंची समाधी भंग पावली. ते उठून बसले. ''ये मियाँ...''

मी त्यांच्या शेजारच्या सोफ्यावर जाऊन बसलो.

आम्हा दोघांच्या समोर असलेल्या टेबलावरच्या एका ट्रेमध्ये चार-पाच ग्लास ठेवलेले होते. एक आइस-बकेट आणि एक व्हिस्कीची बाटली पण होती. जफरभाई थोडा वेळ शांतपणे गालिच्याकडे पाहत राहिले. मग हळूहळू त्यांची नजर वर पाहू लागली. त्यांच्या चेहऱ्यावर आता बराच सावरल्याचा भाव होता. तरी पण मी त्यांच्याकडे पाहू शकलो नाही.

''आणखी काय, बोल...'' बाटली उचलत ते म्हणाले. मग थोडे थांबून म्हणाले, ''आज तुझ्या बाबांचे पत्र आले होते.''

''जी.'' मला दुसरं काही बोलायला सुचले नाही.

जफरभाईंनी दोन प्याले तयार केले आणि एक माझ्यापुढे देत म्हणाले, ''पुढच्या आठवड्यात इथे येत आहेत.'' आणि त्यांनी ग्लास उंच उचलून धरला.

मी पण एक घोट घेतला, ''जी, होय. मला पण लिहिलंय त्यांनी तसं.''

''आणि हो... तुला फॅक्टरीकडून घर मिळाले असे ऐकतोय. कधी जाणार आहेस ?'' त्यांचा आवाज आता अगदी नियंत्रित होता.

काय उत्तर द्यावे याचा मी विचार करीतच होतो, तेवढ्यात बाहेर कुठलीतरी गाडी थांबल्याचा आवाज आला.

''बहुतेक सलीम आलेले दिसतात...'' जफरभाई म्हणाले.

सलीममियाँच होते. त्यांच्याबरोबर आणखी दोन गृहस्थ होते. त्यांना मी कधी पाहिलेले नव्हते.

सलीममियाँनी ओळख करून दिली आणि नंतर आपला ग्लास घेऊन माझ्या शेजारच्या सोफ्यात बसत म्हणाले, ''मग काय मियाँ इमरोज... काय खबर आहे ?''

''जी, ठीक आहे आपल्या आशीर्वादाने.'' मी हसायचा प्रयत्न केला.

''यार, तुझं नाव फारच छान आहे.'' सलीममियाँ एक मोठा घोट घेत मागे टेकत म्हणाले.

''हो ऽऽ...'' जफरभाई आपल्या ग्लासकडे पाहत हळूच म्हणाले, ''इमरोज... म्हणजे आज... न गेलेला, न येणारा... फक्त आज,'' जफरभाई स्वत:शीच बोलत होते.

''यावरून मियाँ, एक शेर आठवला,'' समोर बसलेले गृहस्थ म्हणाले आणि शेर ऐकवू लागले.

आणखी एक संध्याकाळ सुरू झालेली होती. किंवा एवढ्या वेळात एक पूर्णपणे अशुभ आणि अतिशय कष्टदायक अशी संध्याकाळ निघून गेली होती. कालची होऊन गेली होती. आणि एक नवी, दुसरी संध्याकाळ सुरू झालेली होती. जफरभाईंचा चेहरा निघून गेलेल्या संध्याकाळबरोबर निघून गेला होता. रात्रभरासाठी. आणि त्या जागी पुन्हा जहाजाच्या कॅप्टनचा चेहरा आला होता— कॅप्टन्स बॉलच्या रात्रीचा चेहरा...

जहाज प्रवासाचा अखेरचा टप्पा पार करीत होते तेव्हा मुंबईला पोहोचण्याच्या आधी कॅप्टन्स बॉल झाला होता. प्रवास सुरक्षितपणे पार पडला म्हणून कॅप्टनतर्फे साजरा केला जाणारा विशेष उत्सव. जहाजावरचा मोठा डायनिंग हॉल पूर्णपणे भरला होता. सगळे काही कॅप्टनतर्फे होते— मद्य, भोजन, सिगरेट्स, सिगार्स... आणि सर्व प्रवाशांच्यामध्ये कॅप्टनचा हसणारा चेहरा...

जफरभाईंच्या ग्लासात थोडीशी दारू शिल्लक होती. मी त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिले. त्यांच्या अगदी बरोबर मागे दीपपात्राजवळ एका स्टँडवर एक खूप मोठा तगडा चित्ता ठेवलेला होता. त्याच्या डोळ्यांकडे पाहिले म्हणजे असे वाटत होते की आता हा कोणत्याही क्षणी जफरभाईंवर झेप घेणार. एक खोटी झेप.

अचानक दीपपात्रातून एक मोठा उंदीर बाहेर पडला आणि दरवाजाकडे पळत गेला.

मला शिरशिरी आल्यासारखे झाले.

...जहाजावर त्या जर्मन म्हाताऱ्याने मला एकदा सांगितले होते— ''जेव्हा एखादे जहाज बुडायला लागते तेव्हा उंदीर खूप जोराने पळू लागतात... बाहेर पडण्याच्या प्रयत्नात...''

# नैनसीचा बैल धूडा

**स्वयंप्रकाश**

शून्य, काळे, पाणीदार, मोठमोठे डोळे पापण्या न हलवता आकाशाकडे टक लावून पाहत आहेत. त्यांच्यात कसलीही ऊब, जिवंतपणा किंवा हालचाल दिसत नाही. एक कष्टपूर्ण याचना आहे फक्त. ''मुगृती द्या !'' बास... खूप झालं.... आता मुक्ती द्या.

कुठे आहे मुक्ती ? मुक्तीचा रंग बहुधा हिरवा असावा— काठ्यांचा मार खाताना.. भूक लागली असताना... अपमान, उपेक्षा झाली असताना.. प्रत्येक ऐकल्या न गेलेल्या विनंतीत नेहमी हिरवा रंग दिसत आला आहे. हिरवाकंच ! पोपटाच्या पंखावाणी.

त्या हिरवळीत ठिपकेदार कबऱ्या रंगाचा एक डाग आहे... नेहमी स्थिर असलेला... ती आई आहे. आणि एक पांढराशुभ्र बिंदू आहे... बागडणारा... उलटसुलट उड्या मारणारा. ते त्याचे बालपण आहे. स्वत:चे.

शेतात मचाणावर उभ्या असलेल्या बाईसारखी... चारही बाजूंना दृष्टी टाकणारी... कान उंच करून... साऱ्या परिसरावर नजर ठेवणारी... उशीर झाल्यावर बोलावणारी... संकट आलेलं दिसताच धावत येणारी... कानांना, अंगाला प्रेमाने चाटणारी... ही आई आहे.

आईचे सड गुलाबी, ताठ आहेत. दुधाने टिच्चून भरलेले... ते धावत येतात आणि एकाच हिसड्यात अमृताची धार सोडू लागतात. एक नाही... चांगले चार-चार. सगळेच्या सगळे भरलेले... कायमचे... कधी एक पितो...मग तो सोडून दुसऱ्याला लुचतो... मग तिसऱ्याला चाचपडतो. आहे. सगळ्यात आहे. काय काय प्यायचं ! भरभर. आणि आई कुल्ले चाटत असते... प्रेमाने... मायेने...तृप्तीने. पण लौकरच त्याला ओढून बाजूला करण्यात येतं. विरोध करण्यासाठी आई लाथा झाडते तेव्हा तिचे पाय बांधण्यात येतात... त्याला आचळापासून फूटभर दूर ठेवलं जातं... तळमळत... आणि आईचे डोळे निरंतर व्याकूळपणाने भिजून जातात. आणि दोघांच्या डोळ्यांदेखत त्याच्या वाट्याचा आहार दुसरेच कोणी हिसकावून नेतात.

अन्यायाशी त्याची ही पहिली ओळख होती. आणि नाइलाजाशी पण.

पण लहानपणच्या दु:खांचे वयही कमी असते. पुन्हा बागडायला सुरवात होते.

नैन्या त्याची थट्टामस्करी करू लागतो. कधी मानेवरून हात फिरवतो. कधी पाठीवर थाप मारतो... कधी समोर बसून त्याच्या तोंडात झाडपाला कोंबतो, कधी त्याच्या भाषेत काय काय बडबडत बसतो कोण जाणे ! त्याच्या आवाजात प्रेम आहे. म्हणून तो मित्र आहे. मित्र त्याला आपल्या मागोमाग पळवतो. त्याला चुकवून पुन्हा उलट पळतो... मित्राला पाहिले की तो थबकून उभा राहतो. थकल्यासारखा. नैन्या आनंदाने ओरडतो आणि टाळ्या वाजवतो. अचानक तो डोके पुढे वाकवून जोराने पुढे जातो आणि नैन्याच्या ढुंगणाला धडक मारतो. हळूच. नैन्या खदखदा हसतो आणि त्याच्या गळ्यात पडतो.

आणखीही बरेच मित्र आहेत. त्यांना नावं नाहीत. त्यांना 'वासरं-वासरं' अशा सामूहिक नावानेच संबोधले जाते. ती अजून लहान आहेत. त्याच्याच वयाची. तो मोठी होतील तेव्हा त्यांना नावे ठेवण्यात येतील.

ते सगळे सकाळी फिरायला निघतात. खूप जण मिळून. बरोबर. मिरवणुकीसारखे. मागे लहानलहान काठ्या घेतलेले तोंडाने टर्र् टिटिक् असा आवाज काढणारे दोघे तिघे लहानलहान गुराखी असतात. पायात मोठ्यांच्या सारख्याच वहाणा, अंगावर पंचा घेतलेले. (किंवा अंगरखाही असेल, पण खाली धोतरासारखी वस्तू मात्र मुळीच नसते.)

आधी नैन्या पण बरोबर येत होता. त्याचा आवाज... त्याचे हसणे... त्याचे खिदळणे... लांबूनच ओळखू यायचे. नैन्याने हाका मारल्या म्हणजे तो कान उंचावून, शेपूट उचलून लगेच धावू लागायचा. नक्कीच काहीतरी गमतीची गाषेट असली पाहिजे. पण आता नैन्या येत नाही. तो शाळेत जाऊ लागलाय.

गुराखी झाडाखाली पसरायचे, कवड्या खेळायचे, गप्पा मारायचे, मोरचंग वाजवायचे. वेडेवाकडे गायचे... झोपी जायचे... या काळात तुम्ही मस्त भटकायचे, कोवळी हिरवळ चापायची, एकमेकांशी टकरा घ्यायच्या... एकमेकांच्या पाठीवर चढायचे... दमलोभागलो की बसायचे आणि डोळे मिटून रवंथ करीत राहायचे. मस्तपणे. टिरिक् टिरिक् करीत ते गुराखी सगळ्यांना गोळा करून घरी घेऊन जातील... तिथे दुसरीकडे कुठून तरी आई येईल... आपले गुलाबी, ताठ, दुधाने भरलेले सड घेऊन.... आणि नैन्या... आणि अंधार... विविध आवाज... आणि एका खुंट्या-जवळची गारगार जमीन.

घर खूप मोठे होते. आणि त्यात अनेक जण होते. काही नैन्यासारखे, आणि काही खूप मोठेमोठे. एक खूप मोठी बाई होती, ती खूप काळ्या रंगाचा घागरा नेसायची. आणि तिचे हात पण खूप मोठेमोठे होते. तिचा खूप वचक होता. पण तीही मित्र होती. ती बाजरीचे रोट खायला घालायची. कधी रबडी, कधी लापशी तर कधी खूश झाली तर गूळ पण द्यायची. ती खूप मोठ्याने बोलायची आणि सगळ्या लोकांवर रुबाब गाजवायची. सगळेजण तिला 'बाई' म्हणायचे. एक खूप मोठा माणूस होता. तो

फक्त संध्याकाळीच दिसायचा. कधी कधी त्याच्या तोंडातून खूप धूर निघायचा. आणखीही बरेच जण होते.

एके दिवशी त्याला भटकत असताना वाटेत एका शेतात खूप मोठे गवत दिसले. ओळीने लावले होते. कमरेइतके उंच. तो थांबला. टोळीपासून वेगळा झाला आणि खाऊ लागला. ते गोड गवत होते. खूप रसाळ. त्याने ठरवले, रोज इथे येऊन हे गवत खायचे. पण तेवढ्यात एक गुराखी धावत आला आणि त्याने त्याच्या पाठीवर जोरात चारपाच काठ्या हाणल्या. तो गडबडून गेला आणि धावत सुटला. खूप लांब जाऊन थांबला आणि विचारात पडला. का ? त्याने का मारले ? तुम्ही आम्हाला दूधही पिऊ देणार नाहीत आणि गवतही खाऊ देणार नाहीत. का ? त्याला त्या गुराख्याचा राग आला. त्याच्या मनात आले.... त्याला वाटले, आपण मोठे झालो म्हणजे नक्की या गुराख्याच्या पोटात शिंगाड खुपसायचे.

वेळेवर शिंगे पण उगवली... पण आपला बालपणीचा निर्णय तो विसरून गेला. आणखीही पुष्कळ गोष्टी होत्या... एकाहून एक नव्या आणि छान. त्यामुळे त्या गोष्टीची आठवण न राहणे स्वाभाविकच होते. आईच्या दुधापासून त्याला एकदमच तोडण्यात आले होते. आणि काही दिवसांनंतर आईनेही दूध देणे बंद केले होते. आता आईच्या पुढचे घमेले रिकामे असायचे आणि तिच्या अंगाचा मऊपणाही नाहीसा झाला होता— एवढेच नव्हे; तर तिची हाडंही दिसू लागली होती. आता आई त्याच्याकडे पाहून कसलेही वात्सल्य दाखवत नव्हती. आणि त्यालाही आता आईबद्दल पहिल्यासारखा उल्हास राहिलेला नव्हता. आई पहिल्यासारखी व्याकूळ होत नव्हती... तो पहिल्यासारखा उत्सुक राहिलेला नव्हता. नैन्या रोज पाटी-दफ्तर घेऊन शाळेला जायचा आणि संध्याकाळी त्याला कुठल्या ना कुठल्या तरी कामाला जुंपले जायचे. त्याला दुसरे मित्र मिळाले होते आणि तो दुसरे खेळ खेळू लागला होता. तो आता क्वचितच त्याच्या जवळ यायचा. आला तरी पहिल्यासारखा बोलायचा-खेळायचा नाही... गुपचूप त्याचं शरीर चाचपडायचा, कुरवाळायचा, पाठीवर थाप मारायचा, शेपूट पिरगाळायचा, तोंड उघडून दात बघायचा... आणि निघून जायचा. त्याचे नावही बदलून 'नैन्या'ऐवजी 'नैनसी' झाले होते.

नैन्याच्या वागण्यात एक महत्त्वाचा बदल झालेला होता. तो आता त्याला 'धूडा' म्हणून हाक मारायचा. आपलंच नाव 'धूडा' आहे आणि 'धूडा' म्हणून आपल्यालाच हाक मारली जातेय हे त्याला बऱ्याच उशीरा आणि खरोखर बऱ्याच प्रयत्नानंतर कळले.

यथासमय त्याला हे पण कळले की आपल्या टोळीतली वासरं ही 'जनावरं' असतात आणि सगळीच वासरं सारखी नसतात. काही खोंडं असतात तर काही कालवडी असतात. दोघांच्या शरीरातला फरकही त्याच्या लक्षात आला. आतापर्यंत त्याच्या मित्रांपैकी अनेकांना दात आणि शिंगे आली होती आणि टोळीत आणखी

काही नवीन वासरे सामील झालेली होती. लहान लहान. त्यांच्याकडे दुर्लक्ष करायला त्याला आवडायचे. ज्या प्रमाणात त्याची भूक वाढत होती त्या प्रमाणात गवत-हिरवळ कमी होत चालली होती. हिरवळ फक्त शेतात होती. आणि शेतात तोंड घालायला मनाई होती. पाणी पिण्याच्या वेळी जायचे... हिरवळीच्या अगदी मधोमध...पण कोणीही हिरवळीत तोंड नाही घालायचा. भुकेची कसर घरी कोरड्या कोंड्याने किंवा चाऱ्याने थोडीफार भरून निघायची. पण तो कोरडा, पिवळा, निर्जीव पदार्थ तोंडात भरायचा, लाळेनं ओला करायचा, चावून मऊ करायचा आणि गिळायचा हे काम तो मोठ्या परिश्रमाने आणि कष्टानेच शिकला होता. त्याला मनसोक्त खुराक मिळत नव्हता; पण त्याच्या शिरात आणि पुठ्ठ्यात वाढत्या तारुण्याची ताकद होती आणि तो मान करून रुबाबात चालायचा... डोळ्यात विश्वास आणि चालण्यात मस्ती. नदीच्या उसळणाऱ्या लाटांसारखा जोशपूर्ण आणि प्रफुल्ल. त्याच्या हे पण ध्यानात आले की जगात सर्वांहून बलिष्ठ, सर्वापेक्षा स्वाभिमानी, सर्वांत प्रभावशाली आणि मस्त प्राणी कोणी असेल तर तो म्हणजे सांड होय... त्याची डरकाळी म्हणजे विजयघोषणा असते... आणि अनेक भलेभले त्याच्यासाठी वाट मोकळी सोडतात. मोठे झाल्यावर आपण सांड व्हायचे असे त्याने ठरविले.

आपल्याला वाटले तेवढे घर मोठेही नाही आणि समृद्धही नाही हे काळाने त्याला समजावून दिले. आणि लोक तर मुळीच तेवढे मोठे नाहीत... आई फक्त ममतामयी दूधदात्री नाही... ती फुसकारते सुद्धा, शेपूट पण झाडते आणि जवळ गेलो तर शिंगेही उगारते. अगदी जनावरांसारखी. आणि नैनसी एक काळा टंगाळा, सुरकुतलेल्या, मुरमाने भरलेल्या चेहऱ्याचा, उभ्या केसांचा, पिवळ्या दातांचा दुबळा मनुष्य होत चालला आहे. तो माणूस त्याला सारख्या शिव्या देत असतो आणि बाई तर ठोकूनही काढत असते. अन् हिरवळ दिवसेंदिवस सुकत चालली आहे आणि कोंड्यासारखा पिवळा रंग धरतीवर पसरतो आहे. अन् भूक आणि भोजन हे जीवनातले सर्वात मोठे सत्य आहे आणि खुंटा हे एका कष्टदायक वस्तूचे नाव आहे. त्याला माणसांची भाषा आणि स्वरसमुच्चय यांचे थोडेथोडे ज्ञान होऊ लागले आहे— आणि त्याला जाणवतंय की घरातले खिदळण्याचे आवाज दिवसेंदिवस कमी होत गेले आहेत आणि लाचारी दिवसेंदिवस वाढत चालली आहे. बाहेर गोठ्यात लोक ये-जा करताहेत, भांडणतंटे चालू आहेत. माणूस तोंडातून धूर काढतो आहे आणि आत घरात बाई दिवसभर पस्तावते आहे आणि आल्यागेल्यावर हात चालवते आहे.

तरी पण आई ती आई, बाई ती बाई आणि घर ते घर हे होतेच.

मग असा काळ आला की आई हरपून गेली, बाई थेरडी झाली आणि घर... घर हिरावलं गेलं. पण दुर्भाग्याचा हा अध्याय सुरू व्हायला अजून वेळ होती.

तो पाच वर्षांचा झाला तेव्हा तो तरुण झाला असे समजण्यात आले. गब्रू तर तो होताच. स्वत:ची भूक आणि रहस्यमय जिज्ञासा असली तरी. येणारा-जाणारा प्रत्येक जण म्हणायचा की 'धूडा आता तरुण झाला आहे.' कुणाच्या स्वरात अभिलाषा असायची, कुणाच्या ईर्ष्या तर कुणाच्या चीड. काही जण तर किंमतही करायला लागायचे- चार हजार. नाही तीन हजार. आता हे खरे आहे की वाह्यातपणे वागणाऱ्या, उगीचच्या उगीच काठी मारणाऱ्या आणि पोहासाठी पाठीला चिकटणाऱ्या लोकांना त्याने दोन-चार वेळा शिंगं मारली होती, पाच-दहा वेळा (आपल्या हिशेबाने) संधी पाहून पिकात तोंड घातले होते, आणि काही भित्र्या आणि मूर्ख कालवडींच्या पाठीशी पण लागला होता. त्यामुळे हा आता जवान झाला असे म्हणू लागले. वेसण घाला आणि जुंपा.

एके दिवशी त्याचे दात मोजले गेले. एका आंड काढणाऱ्याला बोलावले गेले. त्याच्या तंगड्या बांधून जमिनीवर पाडण्यात आले. नाकात वेसण घालण्यात आली आणि त्याचे खच्चीकरण केले गेले. तो तडफडत होता, तोंडातून फेस बाहेर टाकत होता; पण त्याला लाचार करण्यात आले होते. आंड काढणाऱ्याच्या हातात ब्लेड होती. फक्त ब्लेड. त्याने धूडाच्या अंडकोशाला एक चीर पाडली. अंडकोश काढून फेकून दिले आणि कातडे अंगठा व बोट यांच्यामध्ये दाबून धरले. बास. दोन मिनिटांत सगळे काम झाले. आपल्याला निसर्गाने दिलेल्या कोणत्या अधिकारापासून, सुखापासून, कोणत्या शक्यतांपासून वंचित केले गेले आहे याचा धूडाला मुळीच पत्ता लागला नाही. सहज जीवन जगण्याचा त्याचा अधिकार काय म्हणून हिरावून घेण्यात येत आहे ? जणू काही त्याला सांगितले जात होते, काही, वाटून घेऊ नको, स्वप्ने पाहू नको. कारण आम्ही ती कधीच पूर्ण होऊ देणार नाही.

एखादा उत्सव असावा तसे त्याला एका जोडीदाराबरोबर नांगराला जुंपण्यात आले. आणि पाठीवर चाबूक फटकारले जाऊ लागले. त्याने आपल्या पाठीवर कधी माशीसुद्धा बसू दिली नव्हती. तो शेपूट उचलून धावत होता—यथाशक्ती—सुटण्यासाठी. आणि त्याची प्रशंसा केली जात होती. त्याच्या या कृत्यावर त्याचा जोडीदार खुश नव्हता—पण तो काहीच करू शकत नव्हता—पळायचं तर त्यालाही होतं.

हळूहळू त्याला या सगळ्याची सवय होऊन गेली. आणि जोडीदाराचीही. एवढेच नव्हे; तर त्याला आपल्या गळ्यात बांधलेली घंटा आणि तिचं किणकिणणं आवडू लागलं. पाठीवरची संवेदनशील थरथर लोपून गेली. पायाला चालण्याची आणि मानेला जुंपून घेण्याची सवय झाली. आता समोर जोखड आले आणि थोडेसे चक्‌चक् केले की तो जोखडात मान द्यायला लागला.

एके दिवशी त्याला आंघोळ घालण्यात आली. त्याच्या पाठीवर रंगीत छापे मारण्यात आले, त्याच्या अंगावर रंगीत झूल घालण्यात आली, शिंगं रंगवली गेली,

त्यांच्यावर रंगीत तुरे लावण्यात आले. पायांना झालर बांधण्यात आली, गळ्यात कवड्यांची माळ घालण्यात आली आणि मग त्याला गाडीला जुंपून कुठेतरी नेण्यात आले. ते एक वेगळेच जग होते. नवा अनुभव होता आणि नवी गंमत होती. गाडीत नटूनथटून नैनसी बसलेला होता. जिथे गेला तिथे खूप छान हिरवं गवत खायला मिळाले, खूप आराम करायला मिळाला. जोडीदाराजवळ दिवसभर सावलीत बसून मन मानेल तेवढे खायचे आणि रवंथ करायचे. बास. आणि तिसऱ्या दिवशी एका गोऱ्यापान ठसकेबाज स्त्रीला नैनसी बरोबर बसवून घेऊन आला.'

रुसलेले बहर काही दिवसांसाठी जणू घरी परत आले होते. आजारपण आणि म्हातारपण असूनही बाई नाचत होती, रुबाब गाजवत होती. नैन्याची बायको काही ना काही तरी खायला देऊ लागली. नैन्या लाड करू लागला. माणसाच्या तोंडातून धूर निघायचे कमी झाले होते. त्याचा दिवस पहाटेच सुरू होत असे. बाई चूल पेटवून भाकऱ्या भाजायची, नैन्याची बायको जनावरांच्या पुढे खळीकोंडा घालायची, ताक घुसळायची, झाडलोट करायची. सकाळ व्हायच्या आधीच ते निघायचे. दिवसभर शेतात खपायचे. दुपारी थोडीशी विश्रांती. गडी घरी यायचे, खाऊनपिऊन पडायचे. खूप कामाचे आणि थकायचे दिवस होते. तरी पण कुणी गायचा, कुणी हसायचा. दुर्भाग्य हे की या घरातले हे अखेरचे हसणे होते. हे घर पुन्हा कधी हसणार नव्हते.

दुष्काळ पडला.

पेरणीनंतर एक शिंतोडा पडला आणि बास. अंकुर फुटले आणि बास. थोडासा चारा झाला आणि बास. विहिरीतले पाणी खाली गेले. जिथे विहिरींवर मोटारी लावलेल्या होत्या तिथेच फक्त हिरवळ होती आणि बास !

कोंड्याचे प्रमाण कमी होऊ लागले. आई रात्री हंबरायची. कोणी ऐकत नसे. भांडणतंटा पुन्हा सुरू झाला होता. आता त्याला कुठेच काही काम नव्हते. त्याला खायला घालणे घरच्या लोकांना जड वाटू लागले. नैनसीने दुसऱ्यांच्या शेतावर जाऊन काम करायला सुरवात केली. तिथे विहिरींवर मोटारी लावलेल्या होत्या. तिथे हिरवळ होती. तिथे दुष्काळ मुख्य भागी नव्हता. आजूबाजूला होता.

पिकं तयार झाली तेव्हा माणसाच्या तोंडातून निघणारा धूर आणखी दाट झाला. त्यात आता शिव्या मिसळल्या गेल्या. घरात खायचा तुटवडा पडू लागला. हे लोक कर्जात बुडून गेले होते. जमिनीचे तुकडे पडू लागले होते. जमीन सावकाराच्या घशात जाऊ लागली होती.

एके दिवशी त्या माणसाने कशावरून तरी नैनसीला मारले. बाई मध्यस्थी करायला गेली. तिलाही दोन थपडा खाव्या लागल्या. नैनसीची बायको रडू लागली. बाई पण रडू लागली. धूडा मोठ्या आश्चर्याने डोळे फाडून सगळा घटनाक्रम पाहत होता. मुकाटपणाने. आई पण. जणू काही भांडणाच्या मुळाशी आपणच आहोत. आता

आपल्यालाही मार मिळू शकेल. त्या रात्री नैनसीने त्याचे खूप लाड केले. त्याच्या गळ्याला मिठी मारली. पाठीवरून हात फिरवला. 'धूडा धूडा' म्हणत राहिला.

दुसऱ्या दिवशी त्याला—म्हणजे धूडाला—भाड्याने देण्यात आले. गाडीला जुंपण्यासाठी.

सकाळी सकाळीच तो माणूस त्याला एका अनोळखी घरी सोडून आला. जुंपून घेण्यात काही त्रास नव्हता. शेतातल्या भुसभुशीत ढेकळातून किंवा खडकाळ ओल्या जमिनीवरून तो चालू शकायचा. पण इथे वेगळीच दशा होती. गाडीत बरेच मोठे ओझे असायचे. जोडीदार नवा होता. काळाकुळकुळीत आणि ठेंगणा. एकदम. सगळं ओझं धूडावरच पडायचे. आणि गाडी हाकणारा फारच मूर्ख होता... त्याला आसूड फटकारण्याचा रोग होता. सारखा लगाम ओढायचा. सारखा आसूड मारायचा. उगीचच. धूडा जोर लावून पुढे जायचा तर जोडीदाराच्या नाकी नऊ यायचे. तरी सबंध वाटेत त्याला एकदाही आसुडाचा फटका बसलेला नव्हता. जमीन दगडासारखी घट्ट आणि काळी होती. मोठमोठे चढउतार आणि धोक्याची वळणे. एका चढावर हाकणाऱ्याने ओरडत, शिव्या देत धूडाच्या पाठीत दांडकं खुपसलं. धूडा रागाने बिथरला. तो जोरात फुसकारू लागला आणि त्याने जोडीदाराच्या कपाळावर शिंग मारले. गाडी वेडीवाकडी झाली. त्यामुळे त्याला आणखी मार मिळाला.

रात्र पडल्यावर घरी परतला. पण हे घर, आपले घर नव्हते. हा खुंटा तो खुंटा नव्हता. आई नव्हती. बाई नव्हती. नैन्या नव्हता. त्याची बायको नव्हती. धूडा मुकाट्याने उभा राहिला. त्याच्यासमोर कसला तरी कोंडा टाकण्यात आला. त्याने वास घेऊन टाकून दिला. पाणी प्याला. दोनचार घोटच प्याला. मान वर करून उभा राहिला. त्याच्या मानेवर घट्टे पडले होते. दुखत होते. पण काय करू शकणार ? सहानुभूतीचे... प्रेमाचे दोन खोटे बोल बोलणाराही तेथे कोणी नव्हता. धूडा यांचा कोणा लागतो ? धूडा मेला तरी यांना काय फरक पडणार आहे ? सगळे झोपले आहेत. तो उभा राहिला. थोडासा आवाज झाला तरी त्याचे कान उभे राहतात. डोळे सगळीकडे टकामका बघू लागतात. आता कोणीतरी येईल आणि सोडवून घेऊन जाईल... कदाचित नैन्या येईल... कदाचित बाई... पण कोणी आले नाही. रात्रभर कोणी आले नाही. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंच्या काळ्या धारा वाहू लागल्या. नाकपुड्या फुसकारू लागल्या. मनात प्रचंड राग गोळा होऊ लागला. सकाळी जो कोणी समोर येईल त्याची खैर नाही.

तिथे धूडा दिवसभर श्रमत राहिला. आणि मार खात राहिला आणि घरासाठी व्याकूळ होत राहिला आणि रागीट बनला. संधी सापडली की लोकांना शिंगं मारायचा. मर्जी नसली तर अडून बसायचा. एकदा एका पोराला शिंगावर उचलून त्याने मागे फेकून दिले. तेव्हापासून त्याच्या जवळ कोणी जात नाही. हाकणाऱ्याशिवाय. ते मित्र नाहीत. अजूनही. धूडाला जेवढा खुराक मिळायला हवा तेवढे खायला देत नाहीत. वाट

चालताना तो वाटेल त्या पदार्थांत तोंड घालतो. त्याच्या पुठ्ठ्यांवरचे सगळे मांस सुकून गेले आहे. जखमांच्या खुणा पक्क्या झाल्या आहेत. तो आता हडकुळा आणि मारखाऊ झालेला आहे. एकदा त्याला डाग पण दिला गेला होता. ज्याला कामाची कदर नाही त्याच्यासाठी कशाला राबायचे ? विनाकारण सतावत राहणाऱ्यांसाठी आपल्या हाडाची काडे कशाला करायची ? याचा कधी चांगल्या जनावराशी संबंधच आला नसेल, किंवा कोणी याच्याकडे नीट काम करावे या लायकीचाच हा नसेल. प्रेमाचे दोन बोल नाहीत. पोटभर खायला नाही. मार कधीच थांबत नाही. धूडा—रागीट धूडा आता आपल्या जुन्या घराबद्दल क्वचितच विचार करतो. आता त्याचा विचार एकच... खुंटा तोडून पळून जायचे... एकदम स्वतंत्र आणि मस्त होऊन जायचं... सांडासारखं. आणि एके दिवशी खुंटा तोडून पळून पण गेला... दोरखुंट्यासकट... पण बराच वेळ मस्ती केल्यानंतर त्याला घराची आठवण झाली आणि तो 'आपल्या' घरी येऊन पोहोचला. पण तिथे कुणाच्याही नजरेत त्याचे पहिल्यासारखे स्वागत दिसले नाही आणि त्याच्या हंबरण्याला न जुमानता त्या माणसाने त्याला पुन्हा याच राक्षसाच्या घरी आणून सोडले.

दुसऱ्या वर्षीही पाऊस पडला नाही. तिसऱ्या वर्षी पण नाही. दुष्काळ. गावावरच्या आभाळात घारी फिरू लागल्या. किर्रऽऽ किर्रऽऽ! चौफेर सन्नाटा. निस्तब्धता ! हिरवळीचा कुठेही अंश दिसेना. डोळ्यात धूळ, उन्हाच्या कडक फुलबाज्या आणि गळ्यात टोचत आहेत तहानेचे टोकदार सराटे.

जमीन गेली. बाई वारली. नैनसी नोकरी करण्यासाठी रामनगरला गेला. त्याची बायको माहेरी निघून गेली. घरात कोण ? धूर सोडणारा माणूस. आई... एका कोपऱ्यात हंबरत असलेली. भुकेने... आणि धूडा... दुसऱ्या कोपऱ्यात... खुराने कोरडी जमीन उखणत असलेला... माती चाटत.

कोणीतरी घ्या. कोणीतरी आमची जनावरं विकत घ्या. तशीच घेऊन जा. बिचारी मरणार तरी नाहीत. पण घेणार कोण ? माणसं भुकेली-तहानेली फिरत आहेत... जनावराच्या हत्येचे पाप कोण घेणार ?

सगळे घर दिवसभर मुकाट, सुनेसुने पडून राहायचे. सकाळी बाहेर गेलेला माणूस संध्याकाळी घरी यायचा आणि धापा टाकीत, नाहीतर धूर सोडत, नाहीतर कूस बदलत 'दाता... दाता...' करीत राहायचा. आई आणि धूडा त्याच्याकडे कातरपणे पाहत राहायचे. मुकाट्याने, निश्चलपणाने. काय झाले आहे ? कसला त्रास आहे ? आम्ही तुझ्या कामी येऊ शकत नाही का ?

सर्वत्र लोक आजारी पडू लागले होते. आणि मरू लागले होते. जनावरं पडायची... रक्त ओकायची आणि खलास. लोक... हे नापीक आणि कडके लोक... बिनपावसाची त्यांना सवय होती... दुष्काळाशी ते परिचित होते. पावसासाठी प्रार्थना करणारे कोणतेही

गाणे त्यांच्या भाषेत नव्हते. ते पशुधनाच्या किंबहुना पशुबळाच्या जोरावर अनेक पिढ्यांपासून निसर्गापुढे छाती काढून उभे राहात आले होते. जमीन अशी होती की दोन पाऊस वेळेवर झाले तर भरपूर धान्य उत्पन्न होत असे. तेच वर्ष, दोन वर्ष-तीन वर्ष कंजूषपणाने वापरून राहता येत होते. यापेक्षा जास्त त्यांना काही नकोही होते. त्यांच्या कण्याचे, ताठपणाचे रहस्य होते त्यांचे पशुधन. बैल, गाय, उंट, शेळी, मेंढी... पण पशूंना द्यायलाही पाणी नसेल तर ? बाप्पा, ही तर सरळसरळ पोटावर लाथ झाली !

पोटाच्या खालच्या भागावर. हुं: !

आणि देव ? हो, देव. देव किती क्रूर आहे.

लोक झुंडीने गाव सोडू लागले. जनावरं बरोबर घेऊन. आपला लहानमोठा संसार घेऊन. या प्रदेशात कसाई फिरू लागले होते. गाईची किंमत वीस रुपये, बैलाची किंमत तीस रुपये. मरा मारेकऱ्यांनो ! आपण कोडकौतुकाने पाळलेले जनावर यांना कोण विकेल ? पण कोणीतरी विकत असणार. नाहीतर हे कशाला आले असते ?

त्या माणसाच्या धापात, सतत कूस बदलण्यात, त्याच्या 'दाता', 'दाता' म्हणून धावा करण्यात असले किती हाहाकार चक्री वादळासारखे चकरा मारीत असतील कोण जाणे.

एके दिवशी कुठून तरी पीठ आणून त्या माणसाने रोट बनवले. आपल्या हाताने आईला खायला घातले. गूळ खायला घातला. हे सगळं करीत असताना तो धापा टाकीत होता. खरं तर तो रडत होता. आतून कुंकू आणून तिच्या भाळावर लावले... तिच्यासमोर हात जोडले... आणि दोरी सोडून तिला बाहेर हाकलून दिले. गोठ्याचे दार बंद करून टाकले आणि तिथेच जमिनीवर धपकन बसून धाय मोकलून रडू लागला.

आई मोठमोठ्याने हंबरत होती. अनिष्टाच्या शंकेतून उचलून तिला भीतीच्या भयंकर खाईत लोटण्यात आले होते. एकाएकी. एक कालवड म्हणून ती या घरात आली होती. आपल्या आईबरोबर. चार वेळा व्याली. ती या कुटुंबाचे अंगच होऊन गेली होती. आहे. जिवंत. नाही का ? कोणी म्हणेल तरी ? आणि किती निर्दयपणे तिला हाकलून देण्यात आले !! तिचे करुण आणि कातर हंबाऽऽ हंबा ऽऽ बंद दारावर किती वेळ आक्रोशात राहिले ! कोण जाणे ? माणूस... माणूस दगडासारखा. जड आणि निस्पंद.

आणि एके दिवशी एक तेली धूडाला विकत घेऊन गेला. फक्त पन्नास रुपयात.

धूडाच्या डोळ्यावर पट्टी बांधण्यात आली आणि त्याला घाण्याला जुंपले गेले. आणि चल बाबा. एखादी तिरीपही दिसू नये असली रात्र धूडाच्या आयुष्यात कधी आलेली नव्हती. एकच वास. एकच वाट. एकच जोखड. रात्रंदिवस. खायला कोरडा कोंडा आणि थोडीशी खळी. पायाखाली भिजलेली वैरण. घाणीच्या बाहेर पाण्याची डोणी. तिथेच खायचे. तिथेच झोपायचे. जेवढा वेळ तेली झोपू देईल तेवढेच. पण तेली काय म्हणून झोपू देईल ?

चालला. चालला. चक्कर आली. पडला. मार बसला. चालला. पुन्हा लटपटला. पुन्हा मार बसला. नाही चालला. चालणार नाही. मार किती मरायचे ते.

पण मारण्याचीही एक सीमा असते. पळाला. पण कुठे पळणार ? तेच गोल-गोल- गोल. येऊ दे... जवळ तरी येऊ दे कुणाला...असं शिंग मारीन... आणि त्याने शिंग मारले. पण मार मिळायचा तो मिळालाच, वर अन्याय म्हणजे त्याची शिंगेच कापून टाकण्यात आली.

सगळं जीवनच क्लेशदायक झालं. नरक. आणि तो विझत गेला, विझत गेला. त्याच्या डोळ्यातला प्रकाश गेला... आत्म्याचा प्रकाश पण विझू लागला. सगळा उत्साह, सगळा विद्रोह, सगळा स्वाभिमान... थेंबाथेंबाने पिळून निघाला. काही पण खायचं... वाटेल ते सहन करायचं... कसंही मरायचं आहे. कसली इच्छा नाही, कसलं स्वप्न नाही, कसली आठवण नाही. अत्याचारच झाला असता... जर कोणी आता त्याच्या डोळ्यावर बांधलेली पट्टी सोडली असती आणि त्याला स्वतंत्र केले असते तर.

पण त्याला हेच भोगावे लागले.

चार वर्षे चांगले राबवून घेतल्यानंतरही त्याच्या हाडातले सगळे सत्त्व पिळून घेतल्यानंतरही न काम बंद झाले न मार बंद झाला. त्याच्या मानेवर धाव झालेला होता. जखमेवर दिवसभर माशा बसायच्या... उभं राहिल्यावर त्याला त्या शिंगानेही उडवता येत नव्हत्या आणि शेपटीनेही... शिंगं होतीच कुठं म्हणायला ? जखमेत पू झाला होता... त्याचा दुर्गंध येऊ लागला... आणि पसरू लागला... आणि जखम सारखी वाहू लागली... आणि मान वर उचलता येईना अशी त्याची अवस्था होऊन गेली. रात्रंदिवस रडत आसवं गाळायचा आणि राबत राहायचा. आजार-कष्ट-मार-भीती-मृत्यू सगळ्यांविषयी त्याची बाह्यच नव्हे तर आंतरिक रोधक शक्तीच नष्ट झालेली होती आणि तो प्रेत होऊ लागला होता.

सगळी घाणी जखमेच्या आणि पुवाच्या वासाने भरून गेली. दुर्गंधी तेलातही उतरली. ग्राहक चिडू लागले, भडकू लागले, येईनासे झाले. पण तेली—दिवाळीच्या दिवशीही त्याने बैलाला सुट्टी दिली नाही. त्याला राबवत राहिला. पळवत राहिला.

एके दिवशी धूडा असा काही पडला की पुन्हा उठलाच नाही. उठवणाऱ्यांनी लाख प्रयत्न केले. शेवटी त्याच्या डोळ्यांवरची पट्टी काढण्यात आली. पोटाखाली काठी घालून दोऱ्याने बांधून ओढून त्याला उभे करण्यात आले, सोडले गेले, बाहेर आणले गेले आणि सोडून देण्यात आले. जा... तुझे भाग्य घेऊन जाईल तिकडे जा.

एक रोगट, मरतुकड, म्हातारं जनावर... माशा, कावळे आणि किडे यांनी वेढलेले. रडते आहे आणि खुरडते आहे. ते भुकेजले आहे... आणि कुणीतरी त्याच्यापुढे गवत आणून टाकले आहे... हिरवं गवत... पण ते जबड्यात घालण्याची किंवा चावण्याची ताकदच त्याच्यात उरलेली नाही. तहान लागलीय... आणि पाणी आहे...आणि पाणी

तोंडात टाकले आहे... पण ते घशाखाली उतरवता येत नाहीय. अशा जीवाला मृत्यू यावा. यापेक्षा चांगले दुसरे काय असू शकते ?

पण वाईटातले वाईट जीवन हे सुंदरातल्या सुंदर मृत्यूहूनही चांगले असते. कुठल्या तरी आंतरिक चेतनेने... किंवा अंतर्प्रेरणेने— कुठल्या तरी आवेगाने... हळूहळू आपले रोगट शरीर आणि त्यावरचे किडे ओढत ओढत त्याने आपल्या गावची वाट शोधून काढली. जनावरांच्या ज्या बऱ्याच काही गोष्टी माणसाला कधीच कळणार नाहीत, त्यातली ही एक होती. चालत राहिला. खुरडत राहिला. उद्वेगहीन. थांबत. चालत. जायचेच आहे.

आता समोर गाव होते... पूर्वीसारखेच हिरवेगार... हिरवेकंच... पोपटाच्या पंखासारखे ! अरेरे ! हे पाहण्यासाठी त्याचे डोळे कधीपासून तळमळत होते. थांबला. टकमक पाहत राहिला. बास. आता ठीक आहे. मग निघाला. हळूहळू. चालीत उतावळेपणा मुळीच नव्हता. डोळ्यांतून आसवे वाहत होती. काळ्या रेघा. मान खाली वाकलेली होती. जड पावले प्रयत्नपूर्वक हळूहळू सरकत होती.

गावावर सकाळचे चंदेरी ऊन पसरले होते. शीतल वारा वाहत होता. पिकं डुलत होती. गोऱ्हे आणि कालवडी यांची पांढरी झुंड नाचत-बागडत चरायला निघाली होती. त्यांच्या पाठीमागे टर्रर टिरिक करीत गुराख्यांची दोन-तीन पोरे चाललेली होती. एक जण मोरचंगही वाजवत होता. कुणास ठाऊक... कदाचित नसेलही वाजवत. नुसताच भ्रम झाला असावा.

एका निर्जन, हिरव्या, उंच टेकाडावर जाऊन पोहोचला. अनंतापर्यंत हिरवळ पसरलेली. गोऱ्हे, कालवडी पांढरे, धूसर डाग होऊन गेले. आपल्या बालपणीच्या कुरणाच्या किती जवळ आला होता तो. पण किती दूर. गावाबाहेर... एका स्वतंत्र जमिनीवर... निसर्गाने घडवला तसा... पोहोचला आणि कोसळला. कोसळला आणि मेला. डोळे उघडे पडले. टकमक आकाशाकडे पाहू लागले.

आता कावळे येतील आणि काळ्या, पाणीभरल्या शून्य डोळ्यात चोची खुपसून मऊ मऊ भाग ओढून काढतील. मग गिधाडे येतील. भयानक आणि अशुभ. आणि त्यांच्यासाठी डोळ्यांचे मऊ तंतू शिल्लक ठेवून कावळे खुरांच्या खालचे मऊ मांस ओरबाडायला सुरवात करतील. सगळीकडे दुर्गंध पसरेल. त्या वासावर कुत्री येतील आणि आपल्या तीक्ष्ण दातांनी त्याचे पोट फाडतील आणि त्याची आतडी चावू लागतील. मग गिधाडांची टोळीच्या टोळी येईल आणि ते इतकं खातील की त्यांना उडताही येणार नाही आणि ते पुन्हा पुन्हा खातील. कातडं फाटत, सुटत, निघत जाईल... मांस संपू लागेल आणि सापळा दिसू लागेल... त्याच्यावर तरीही ठिकठिकाणी गुलाबी पांढरं मांस चिकटून राहिलेलं असेल. मग हळूहळू फक्त पांढरा सांगाडा शिल्लक राहील... आणि

ती विरून मातीत मिसळून जायच्या आधी... कोणी तरी कुणाला तरी विकून टाकेल.

रामनगरच्या झोपडपट्टीच्या बाहेर उकिरड्याच्या ढिगात एक प्रेत सापडले आहे. जिवंत होता तोपर्यंत त्याला कुणी माणूस म्हणून ओळखलेही नसेल; पण ते माणसाचे प्रेत आहे असेच म्हणावे लागेल. मेलेल्या माणसाचे वय काही फार नाही. पण फोड आणि मुरुम, तसेच रक्त आणि पू यामुळे त्याचा चेहरा पार विकृत होऊन गेलेला आहे. कोणी तरी मजूर होता म्हणतात. खेड्यातून बऱ्याच वर्षांपूर्वी तरुण असतानाच आला होता आणि रिक्षा चालवू लागला होता. नंतर कुलूप-किल्ल्यांच्या कारखान्यात लागला होता. तेव्हा शहरात एक मोहीम चालू होती. त्या मोहिमेत निस्संतान असूनही त्याची नसबंदी करण्यात आली होती. फॅक्टरीच्या शेठजींनं हळूहळू त्याचे कर्ज खूप वाढवले होते. त्याला एक तऱ्हेचा वेठबिगारीच करून टाकले होते. आणि तो त्याच्याकडून चोऱ्या करवायचा. एकदा त्यानं आपल्या गावी पळून जायचाही प्रयत्न केला होता; पण त्यात तो यशस्वी झाला नाही. जेव्हा त्याची हाडंकाडं दुबळी झाली तेव्हा त्याने चोरी करायचे नाकारले. त्याच दिवशी त्याला चोरीच्या आरोपावरून पकडून देण्यात आले. पोलिस ठाणे-कचेरी-जेल यांचे चक्र एकदा सुरू झाले ते चालूच राहिले. त्याचे नाव गुन्हेगारांच्या यादीत सामील झाले. त्याने चोरी केलेली असो वा नसो, आता केव्हाही आणि कुठेही चोरी झाली की त्याला पकडले जात असे. अखेर कंटाळून त्याने खरोखरच चोऱ्या करायला सुरवात केली आणि वारंवार आत-बाहेर होत राहिला. असे वारंवार जाणेयेणे होत राहिल्यामुळे त्याला एक चमत्कारिक रोग जडला. त्याच्या सगळ्या शरीरावर फोड फोड उठले आणि त्यात पू झाला. त्याने दारू प्यायला सुरवात केली आणि हळूहळू पक्का दारूडा होऊन गेला. प्रत्येक ठिकाणी त्याला झिडकारले जाऊ लागले. कुत्र्यासारखे धुडकारले जाऊ लागले.

...रस्त्यात पडलेल्या कागदांनी तो आपल्या जखमांतला पू पुसत राहायचा आणि संधी सापडताच चोरी करायचा...दारू प्यायचा...पोटभर जेवायचा... आणि कुठेही पालथा पडायचा.

शेवटी मेला.

त्याचे नाव धूडा होते असे लोक म्हणतात. पण मी तुम्हाला खात्रीने सांगतो की त्याचे नाव धूडा नाही, नैनसिंग आहे.

आणि खरी गोष्ट अशी आहे की तो मेलेला पण नाही.

# रमजानमध्ये मरण

मंजूर एहतेशाम

असदमियाँचे डोळे मिटलेले होते. क्षणभर मला वाटले की परत फिरावे. दुसऱ्याच क्षणी असदमियाँ डोळे उघडून पाहत होते. त्या डोळ्यांत धुकं भरलेल्या सकाळसारखा उजेड होता.

''खुदा के लिए बंदे...'' छाती दुखून दुखून अगदी फुटायला लागलीय !

सुहेलाभाभी आरशासमोर उभी राहून डॅबिंग करीत चेहऱ्यावरचे डाग घालवत होती. खोलीत लावलेल्या बल्बचा उजेड हळूहळू बाहेर पसरत चाललेल्या अंधाराबरोबर वाढत चाललेला होता. सूर्य बुडायला थोडासाच वेळ होता.

''जमील ! अरे जमील !'' सुहेलाभाभींनी हाक मारली.

असदमियांच्या पलंगावरची चादर पांढरी होती. पलंगाच्या खाली दोन तुटक्या चपलांच्यामध्ये एक बेडपॅन होते. त्याचा वापर त्यांनी गेल्या काही तासात अनेकदा केलेला असावा असे दिसत होते. त्यांचे पाय मळके होते. आणि टाचांच्या कातड्यात भेगा पडलेल्या होत्या. जिथे त्यांचे पाय होते तो बिछान्यावरच्या चादरीचा भाग मळलेला होता.

जफरभाई येत आहेत. असदमियाँच्या नजरेकडे न पाहता मला म्हणायचे होते. पण त्यांनी स्वतःच डोळे मिटून घेतले आहेत असे नंतर मला दिसले. सुहेलाभाभींनी थट्टेखोर नजरेने माझ्याकडे पाहिले आणि पुन्हा हाक मारली, ''जमील...अरे कुठे खपलास ?''

''अगं, येतो आहे ना !'' बाहेरून कुठून तरी आवाज आला.

दूर आकाशात चमकल्यासारखे झाले. क्षणभराने स्फोट झाला. असदमियाँच्या डोळ्यांच्या पापण्या हलकेच हलल्या, पण डोळे बंदच राहिले.

... दोन ... तीन ... चार ... तोफांचे आवाज होत होते. इफ्तारची (रोजा सोडायची) वेळ झाली होती.

''पण यार ! तोफाच का ? हे म्हणजे कुणाला तरी सलामी देताहेत असे वाटते. सायरनही वाजवला जाऊ शकतो !'' मला एकदा माझ्या मित्राने विचारले होते आणि मी नुसताच हसलो होतो.

''स्वत:ला स्वच्छ राहता येत नाही तर निदान इतरांना तरी शांतपणे मरू द्यावं. स्वत:च्या पलंगावर झोपले नाहीत आणि सगळ्या चादरीचा सत्यानाश करून टाकला.'' सुहेलाभाभी एका सुंदर ड्रेसिंग टेबलावरच्या आरशात पाहत पुटपुटत होत्या... ''अन् जर चंद्र दिसला तर उद्या ईद... धुतलेली एक चादरसुद्धा घरात नसणार !''

मी पाहिले, आरसा अगदी निर्मळ होता. लाकडी फ्रेमचे पॉलिश जागोजाग उडालेले होते. आणि बऱ्याच जागी पडलेल्या खड्ड्यातून मूळ लाकडाचा रंग दिसू लागलेला होता. आरशापुढे असंख्य बाटल्या ठेवलेल्या होत्या... कॉस्मेटिक्स, परफ्यूम्स आणि स्प्रेच्या सुंदर बाटल्या. त्यातल्या बहुतेक रिकाम्या असाव्यात असा मी अंदाज केला.

जमील त्वरेने खोलीत आला. हात वर करून त्याने सलाम केला. मग विचित्रपणे हसत आपल्या वडिलांकडे— असदमियाँकडे— पाहू लागला.

''काय म्हणत होतीस अम्मी ?'' मग जणू माझ्यापासून लपवत असदमियाँकडे इशारा करीत त्याने नजरेनेच कसला तरी प्रश्न आपल्या आईला विचारला.

सुहेलाभाभींनी ओठ मुरडून मान हलवली, ''तुला बोलावण्यासाठी तासभर हाका माराव्या लागल्या !'' त्यांच्या स्वरात उग्रता होती.

''तू आली आहेस हे मला काय ठाऊक ? न सांगताच निघून गेली होतीस !'' जमीलने रोखठोक उत्तर दिले.

''चंद्र दिसला ?''

''ऊं हूं.''

''हे बघ. तू कुठे जाऊ नकोस. जरा वेळाने तुला माझ्याबरोबर यायचं आहे.''

''अम्मी !'' जमील तक्रारीच्या सुरात म्हणाला, ''शन्नो आणि बाकीची मुलं माझी वाट बघताहेत. मला त्यांच्याबरोबर जायचंय.''

''काही नाही कुठे जायचे-बियचे. तू माझी वाट पाहायची,'' असे म्हणत सुहेलाभाभी आतल्या खोलीत निघून गेल्या.

असदमियाँच्या श्वासांचाच फक्त आवाज येत होता. जफरमियाँ अजून आलेले नव्हते. येतील का ते ?

''यार, तू चल पुढे. मी इफ्तारीसाठी काही मित्रांना बोलावले आहे,'' असदमियाँचे तिसरे बोलावणे आले तेव्हा ते मला म्हणाले होते. मी शहजानआपाजवळ बसून शीरखुर्म्याची यादी तयार करीत होतो, ''तू चल, मी आलोच.''

असदमियांच्या उशाशी असलेल्या कॅलेंडरची पाने कितीतरी महिन्यांनी फाडलेली नव्हती. खोलीच्या एका भागात काळ्या अपहोल्स्ट्रीचे मोठे सोफे मांडलेले होते. कोपऱ्यात एका उंच बुकशेल्फावर व्यवस्थित-अव्यवस्थित अशी अनेक पुस्तके होती... एनसायक्लोपेडिया, बिझिनेस डिरेक्टऱ्या वगैरे. उजवीकडे भिंतीवर एका बुजलेल्या

घोड्याचे पेंटिंग लावलेले होते. सेंटर टेबलाखालचा गालिचा फाटलेला होता. जास्त वापरामुळे गालिच्यावरची नक्षी पुसट झाली होती. फक्त उडून गेलेले थोडेसे रंग दिसत होते. आणि बरीच धूळ बसलेली असल्यामुळेच बहुधा त्याचा मूलभूत सारखेपणा टिकून राहिलेला होता.

''जफर नाही आले अजून ?'' असदमियाँचे लुकलुकणारे डोळे माझ्याकडे पाहत होते.

''काही मित्रांना खान्यासाठी बोलावले आहे. येतीलच आता,'' मी हळूच म्हणालो— ''तब्बेत कधीपासून बिघडली ?''

''आँ...? तब्बेत...? चारपाच दिवसांपासून बिघडलीय. छातीत खूप दुखतंय. हृदय अगदी थांबल्यासारखं वाटतंय्.'' त्यांना धाप लागलेली होती.

''नाटकीपणा आहे. निव्वळ ॲक्टिंग ! आणि सर्व रोगांवर एकच औषध पेथिड्रिन !'' असदमियाँचे दुसरे बोलावणे आले तेव्हा जफरमियाँ चिडून म्हणाले होते— ''आणखीही काही कामं आहेत. चंद्र दिसला तर उद्या ईद. यांनी तर गंमतच चालवली आहे !''

त्या वेळी गावाकडून मी आलो त्याला एक तास झाला होता.

''कुणा डॉक्टरला दाखवलंत ?'' मी असदमियाँचे मनगट हातात धरीत म्हणालो.

सगळे काही पुन्हा शांततेत बुडून गेले. असदमियाँ धुराकडे सस्मितपणे पाहत होते. पंखा लावायच्या हूकवर त्यांचे डोळे जाणता-अजाणता खिळलेले होते. विजेचे फिटिंग तेथपर्यंत व्यवस्थित केलेले होते आणि एकदम दोन उघड्या वायरींच्या डोळ्यांनी पाहत होते.

''तू माझं एक काम कर.''

''जी.''

''माझी तब्बेत ठीक नाहीय आणि मी कालपासून इंजेक्शन पण घेतलेले नाही. काल दुपारपासून. कदाचित त्यामुळे तब्बेत ठीक होईल,'' त्यांच्या आवाजात पराकोटीच्या विनवणीचा भाव होता. ''तीन इंजेक्शने पेथिड्रिनची मदनकडे मिळतील.

मी हलकेच थंडपणे श्वास घेतला. असदमियाँ तशाच विनवणीच्या नजरेने पापण्याही न लववता माझ्याकडे पाहत होते. त्याच वेळी हातात काळ्या चामड्याची बॅग घेऊन, फिकट गुलाबी रंगाची साडी नेसलेल्या सुहेलाभाभी खोलीत आल्या.''

''मला जरा बाहेर जायचं आहे !'' स्वत:शीच बोलल्यासारख्या त्या म्हणाल्या— ''हा जमील कुठे गेला आहे ?'' मग कोणत्याही उत्तराची वाट न बघता त्या पडदा बाजूला करून बाहेर निघून गेल्या.

पायऱ्या उतरता उतरता मी अनिच्छेनेच जफरमियाँच्या घराकडे वळलो. फलक

मंझिलच्या बाहेरच्या भागात जफरमियाँ आणि त्याच्या पाठीमागच्या भागात त्याची धाकटी बहीण शहिदा राहते. मागच्या भागात सर्वांत थोरले बंधू असदमियाँ यांचा परिवार राहतो. वळून मी जफरमियाँच्या खोलीत गेलो.

शहनाजआपा तन्नूला त्याचे ईदचे बूट दाखवीत होती.

''मामा आले ! हे बघा मामा, अब्बूनी आमच्यासाठी नवीन बूट आणले आहेत !'' तन्नू खूप आनंदात होता.

''आणि बेटा, तू सिंहाला कसं मारलंस ते मामूला सांगितले नाहीस ? आणि तुझी बंदूक कुठे आहे ?'' जफरमियाँ बाहेरच्या खोलीतून आत आले होते. तन्नू नक्कल करून दाखवत होता. झाडीतून 'हाऊं' करीत सिंह कसा बाहेर आला आणि त्याने आपल्या कॉर्कच्या बंदुकीने त्याला कसे ठार मारले. मग दिवाणावर घातलेल्या सिंहाच्या कातड्याकडे बोट दाखवीत अगदी शिकाऱ्याच्या थाटात म्हणाला, ''हे त्याचंच कातडं आहे.'' जफरमियाँची हसूनहसून मुरकुंडी वळली होती.

''भई, खाना तयार झाला का ? रियाझचा तर रोजा होता. वाळला असेल बिचारा !'' ते शहानाजआपाला म्हणाले आणि दोघे स्वयंपाकघराकडे गेले.

तन्नू आपली बंदूक अडकवून बहुतेक दादी माँला सिंहाची शिकार ऐकवण्यासाठी गेला असावा. मी एकटाच दिवाणावर बसून राहिलो. खोलीतल्या दोन्ही कोपऱ्यात ठेवलेल्या लँप शेडमधून गाळून आल्यासारखा उजेड बाहेर पडून अंधारात मिसळून जात होता. सूर्य उगवण्यापूर्वीची किंवा मावळल्यानंतरची वेळ असावी असा एकंदरीत भास होत होता. मध्यभागी शिसवीचा सुंदर मोठा छपरी पलंग होता. त्याच्या छताला मच्छरदाणीच्या दोऱ्या लोंबत होत्या. शेजारच्या भिंतीजवळ गडद काळ्या रंगाचा वॉर्डरोब होता. आणि पुढे कोपऱ्यातल्या लँपच्याजवळ असदमियाँकडे होते अगदी तसलेच ड्रेसिंग टेबल होते. याच्या पॉलिशची चमक अजून गेलेली नव्हती. दुसऱ्या बाजूला बूट-चपलांचा स्टँड होता, त्यावर स्त्री-पुरुषांची अनेक पादत्राणे ठेवलेली होती. पलंगाला जोडूनच एक बुक-रॅक होते. लहानसे. त्यात व्यवस्थित पुस्तके लावून ठेवलेली होती. संपूर्ण खोलीभर गडद लाल, काळ्या रंगाचे संमिश्र पॅटर्न, विणलेला एक गालिचा अंथरलेला होता.

नाही, जफरमियाँ काही विसरणार नाहीत. मग असदमियाँचा उल्लेख त्यांनी का म्हणून टाळला असावा ? पंधरा दिवसांपूर्वी मी गावाहून आलो तेव्हाही असदमियाँची तब्बेत बिघडलेली होती. एवढेच नाही तर रमजानच्या आधी एक दिवस त्यांची परिस्थिती फारच नाजूक झालेली होती. तेव्हा मी जफरमियाँना म्हणालो होतो, ''एखाद्या डॉक्टरला दाखवू या का ?''

''तू पण यार कमालच करतोस ! असे दर दोन-तीन दिवसांनी कुठे डॉक्टरला दाखवतात काय ? आणि काही आजार असेल तर ना ! वाटेत कोण ओळखीचा भेटला की पायाला जखम झाल्यापासून ते फॅक्चरपर्यंतची गोष्ट त्याला ऐकवतात. औषधासाठी

पैसे मागतात आणि दुसरं काय, पेथिड्रिन घेतात ! एखाद्या ओळखीच्या माणसाकडे कोंबड्या पाळलेल्या असतील तर जाऊन म्हणतील— 'मुलांनी बऱ्याच दिवसात अंडी खाल्लेली नाहीत.' जी काय अंडी मिळतील ती सिंध्याला विकून टाकतील आणि मग त्याचे पेथिड्रिन ! जगणं कठीण करून टाकलंय ! इन्शुरन्सवाल्यांकडून घराचं जे काही भाडे मिळते ते याच भानगडीत उडवून टाकतात. जमीलला आता चोरीशिवाय सट्ट्याचाही नाद लागलाय ! इकडे भाभीचेही वागणे पहा ! नसीरनही त्यांच्याच मार्गाने चालली आहे...! कुठल्या कुठल्या हरामजाद्यांबरोबर उघड्या जीपमधून फिरत असते कुणास ठाऊक ! धाकट्या दोघी पोरी हेच करणार ! साराह आणि समीना यांची लग्नं होऊन गेली हे नशीबच म्हणायचे. मियाँ, आम्ही तरी तिकडे जायचे सोडूनच दिले आहे. अम्मीच्या आयुष्याचे तर वाट्टोळेच झाले. तू स्वत:ही ऐकले असशील. फलक मंझिलच्या नावाशी जोडला गेला नाही असा कुठला अपमान शिल्लक उरला आहे ? आणि शिवाय माझे मला प्रॉब्लेम्स आहेत. अखेर किती काळ...?''

''आणि असदमियाँची आई ?''

''बदनशीब आहे ! ती धाय मोकलून रडत रडत म्हणाली होती—जीवन आणि मरण दोन्ही बाजूंनी बदनशीब ! जसा जगला तसाच मरणार ! रमजानच्या मंगलमासात त्या गुन्हेगाराला मरायचं भाग्यही मिळणार नाही...!''

जफरमियाँना काहीच न सांगता मी त्या खोलीबाहेर आणि नंतर फलक मंझिलच्या बाहेर आलो.

मोकळ्या रस्त्यावर आल्यावर हलकासा थंडपणा जाणवला होता. बऱ्याच अंतरावर पुढे स्ट्रीट लॅंप पेटलेला होता आणि तिथपर्यंत दाट अंधार होता. मेन रोडपर्यंत जायला मला बरेच चालावे लागले. पाठीमागून येणाऱ्या स्कूटरच्या उजेडाने आणि आवाजाने रस्त्यावर पसरलेला अंधार जणू काही धडधडला. पुन्हा निस्तब्धता आणि अंधार एकमेकात मिसळून लांबवर पसरत गेले.

जीवनात देण्याघेण्याचे काही कायदे बहुधा लिहिलेच गेले नसावेत ! जे काही आपल्याला कुणाच्या त्यागामुळे वा वारशामुळे मिळाले ते आपले समजून आपण त्याचा गुणाकार करण्याचे मार्ग शोधू लागतो, याला काय म्हणावे ? पणास लावून जिंकलेल्या वस्तूवरच आपला हक्क सांगतात आणि तिलाच स्पर्श करतात, त्यांच्यासाठीच फक्त ते न लिहिलेले कायदे असतात. बाकी सगळे तर जमान्याने लादलेले ओझे असते ! एकदा खूप जास्त दारू प्यायल्यानंतर माझ्यासमोरच असदमियाँ म्हणाले होते की त्या रात्री जुगारात ते वीस हजार रुपये हरून आले आहेत. तेव्हा जफरमियाँ आणि शहनाजआपा यांच्या लग्नाला दोन वर्षे झालेली होती. आणि मी अलिगढहून सुट्टीचे काही दिवस घालवण्यासाठी शहनाजआपाकडे आलेलो होतो. असदमियाँ का आवडायचे ते मला माहीत नाही. त्यांची आणि माझी दोस्ती वाढू लागली हे पाहून शहनाजआपाने मला

समजावून सांगितले होते की मी त्यांच्याकडे जाऊ नये; कारण लोक तिथे जुगार खेळण्यासाठी आणि दारू पिण्यासाठी येत असतात.

मग हळूहळू सगळ्याच गोष्टी उघड झाल्या. असदमियाँनी फलक-मंझिल दोन-तीन वेगवेगळ्या लोकांच्याकडे गहाण टाकली होती...इन्शुरन्स कंपनीकडे आणि आणखी काही श्रीमंत शेठजींकडे ! पाहता पाहता वसुलीचे हुकुमनामे येऊ लागले होते. आणि फलक मंझिलचा एक बराच मोठा भाग फ्लॅट्समधे परिवर्तित करण्यात येऊन भाड्याने देण्यात आला होता— देणेकऱ्यांचे हप्ते फेडण्यासाठी. असदमियाँच्या आईने सुरवातीला खूप सहन केले; कारण असदमियाँ कसेही असले तरी तिचे लाडके चिरंजीव होते— ''नबाबांपेक्षाही जास्त लाडाने वाढवलेय मी याला !'' डोळ्यात पाणी आणून ती म्हणायची; पण नंतर इस्टेट आपल्या नावावर असल्यामुळे आपण जिवंत असेपर्यंत ती गहाण ठेवण्याचा हक्क असदमियाँना नाही यासाठी त्यांनी दावेही लावले होते. हायकोर्टात खटला चालू होता आणि जफरमियाँना आणि शाहिदाला असदमियाँचा वाटा सोडून बाकीच्यावर हक्क प्राप्त होईल अशी आशा वाटत होती.

शाहिदाच्या विचाराने माझे तोंड कडू झाले. अलिगढला जायच्या आधी मी शाहिदाच्या खूप जवळ आलो होतो आणि माझ्या भविष्यकाळातील बहुतेक सर्व प्लॅन्समध्ये शाहिदा सामील आहे असे मी गृहीत धरलेले होते. प्री-मेडिकलला मेडिकल कॉलेजात प्रवेश मिळण्याएवढे गुण मला मिळू शकले नाहीत. तीन वर्षानंतर मी कायमचा म्हणून या शहरात परतलो होतो, तेव्हा शाहिदाने मुलांना शिकवण्यासाठी घरी येणाऱ्या मास्तरशी—साजिदशी—लग्न केलेले होते. साजिद गरीब घरचा मुलगा होता आणि आपल्या घराण्याची दिवसेंदिवस बिघडत चाललेली परिस्थिती पाहून शाहिदाला कदाचित तोच एकमात्र आधार वाटला असावा. तात्पर्य, या गोष्टीलाही आता पाच वर्षे होऊन गेली होती. शाहिदा आणि साजिद यांना एक मुलगा होता आणि आता असदमियाँ आणि जफरमियाँची आई पण आपल्या मुलीकडे अन जावयाकडेच राहत होती.

रस्त्याच्या पुढच्या वळणावरचा बल्ब कोणीतरी फोडून टाकलेला होता. अंधार तसाच पसरलेला होता. फक्त जवळच्या हवेलीतून मंद प्रकाश येत होता. माझी पावले हळूहळू पडत होती.

जफरमियाँनी परिस्थितीशी मुकाबला करण्याचा प्रयत्न केला. आता त्यांच्या दोस्तांच्या मैफिली कमी झाल्या होत्या. सहली कमी झाल्या होत्या. ब्यूकमधे पेट्रोल टाकणेही कठीण होऊन बसले होते. शहनाजआपा चांगले दिवस यावेत म्हणून लॉटरीची तिकिटेही विकत घेत होती. तरी पण त्यांची वाईट अवस्था एका विशेष स्टेजपर्यंत येऊन थांबलेली होती. एखाद्या हिरव्यागार वेलीप्रमाणे आपल्याला सर्वात जवळ असणाऱ्या भिंतीचा आधार घेताना शाहिदाचाही नाइलाज झालेला होता. पण असदमियाँ कुठलाही बदल न करता काळाबरोबर खाली खचत गेले होते. त्यांच्या दृष्टीने जणू जे काही घडत

होते, फक्त तेवढेच घडू शकत होते... शहरातल्या वेगवेगळ्या भागातल्या किती लोकांकडून खोटे बोलून त्यांनी पैसे घेतले होते कुणास ठाऊक... कुणाला उत्कृष्ट काडतुसे आणून देण्याच्या, तर आणखी कुणाला आणखी कसली तरी वस्तू आणून देण्याच्या थापा; कुणाला आजारपणाच्या, तर कुणाला भूक लागल्याच्या थापा. पण चेहऱ्यावर शरमेचा कसलाही भाव मुळीच नसायचा. एवढेच नव्हे तर अलीकडे ते पीर-फकिरांच्या कबरीजवळ जाऊन बसायला लागले होते... भेटी, नजराणे आणि नैवेद्य मिळण्याच्या आशेने. जमील चोरी करायला शिकला होता. पण त्याच्या चोरी करण्याबद्दल मियाँनी कधी हरकत घेतली नव्हती. सगळे घर त्यांना विसरून, त्यांच्या तब्बेतीकडे दुर्लक्ष करून ईदच्या तयारीला लागले होते. जफरमियाँकडे तर एका आठवड्यापासून घराची साफसफाई चाललेली होती. शाहिदा आणि जफरमियाँ यांच्याकडे मुलांचे कपडे शिवले जात होते. शीरखुर्म्यासाठी खोबरे किसले जात होते. बदामपिस्ते धुवून-कापून ठेवून वाळवले जात होते.

असदमियाँना या सगळ्या लोकात—बहीण, भाऊ, आई आणि मित्र यांच्यामध्ये पाहून का कोण जाणे, मला नेहमीच असे वाटत आले आहे की फक्त असदमियाँ एकटेच स्वस्थानी आहेत आणि बाकीचे सगळे जग बदलून गेले आहे.

फलक मंझिलचा बाहेरचा भाग अंधारात बुडून गेला होता. कंपाउंडच्या भिंतीला ठिकठिकाणी भेगा पडलेल्या होत्या आणि आत जायला सोयीचे जावे म्हणून लोकांनी भिंतीला अनेक ठिकाणी भगदाडे पाडलेली होती. प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूला सिमेंटचे फक्त पिलर्स राहिलेले होते. समोर पोर्चमध्ये जफरमियाँची ब्यूक उभी होती. उजवीकडे शाहिदा आणि साजिद यांचा भाग होता. त्याच्याबाहेर एक सायकल उभी होती. त्याच्या वरचा आणि पुढचा बराचसा फलक मंझिलचा भाग आणि जमीन भाड्याने दिलेली होती. आपल्या वकिलांच्या आणि मित्रांच्या सल्ल्यामुळे जमिनीचा बराचसा भाग गहाण ठेवण्यापासून वाचवण्यात जफरमियाँ यशस्वी झाले होते. शहनाजआपाने आपले दागिने गहाण ठेवून या भागात एक लहानसा फ्लॅट बांधला होता. त्यात मिलिटरीतला कुणीतरी मेजर भाड्याने राहत होता. उजवीकडे कंपाउंडमध्ये खूप गवत उगवलेले होते. मध्यभागी असलेल्या सुरेख हौदाला आणि कारंजाला ते गिळू पाहत होते.

पोर्चमधून आत गेल्यावर फलक मंझिलचा जो भाग येतो, त्यात असदमियाँ राहत होते. त्यांच्या खोलीतला मंद उजेड मला दुरूनही दिसत होता. दूर, सुमारे पन्नास फूट खालच्या अंगाला तलाव होता. त्याच्या लाटा दिसत होत्या. खोलीच्या बाहेर असलेल्या युकॅलिप्टसच्या तळाशी उभा राहून पावसाळातल्या निस्तब्ध चावऱ्या वाऱ्यांच्या रात्री मी बऱ्याच वेळा पाण्याच्या लाटांचा आणि यूकॅलिप्टसच्या पानांच्या सळसळाटीचा संमिश्र कोरस ऐकला होता. या वेळी दोन्ही गोष्टी नीरव होत्या.

पायऱ्या चढण्यापूर्वी क्षणभर थांबलो. दूर उजवीकडे वृक्षांनी आणि जंगली गवताने वेढलेल्या लाकडाच्या अर्धवट मोडक्या शेड्स दिसत होत्या. छप्पर पडलेल्या किंवा छपरावरचे पत्रे काढून विकलेल्या शेडमधल्या एका भागावर वरच्या कुठल्या तरी खोलीतला उजेड एका लाकूड कापण्याच्या मशीनवर पडलेला होता. ते मशीन कसे काय जागेवर राहिले होते कोण जाणे ! एखादी कमरेत वाकलेली मूर्ती आश्रय शोधण्यासाठी तिथे जाऊन लपली आहे किंवा तिथून आश्रय मिळावा म्हणून मान वर उचलून उभी आहे की काय असे वाटत होते. माझ्या डोळ्यांसमोर वर्कशॉपचे जुने चित्र उभे राहिले. असदमियाँचे वडील हे त्या काळातले या प्रांतातले सर्वात मोठे लाकूड-व्यापारी आणि फर्निचर डीलर होते. एका वेळी दीडशेच्या आसपास मजूर त्यांच्या शेडमध्ये काम करीत असत.

दार उघडे होते. असदमियाँची बेचैन नजर माझ्यावर स्थिरावली. ते बिछान्यावर उठून बसले होते. क्षणभर त्यांनी काही तरी विचार केला, मग माझ्या हातातली इंजेक्शने घेतली.

''कोण टोचणार ?'' मी थोडी हिंमत करून विचारले. उत्तरादाखल असदमियाँ हसत बिछान्यावरून उठले. उभे राहण्याच्या प्रयत्नात आधी लटपटले. मग स्वत:ला सावरून अनवाणीच आतल्या खोलीत गेले. थोड्या वेळाने सिरिंज हातात घेऊन आले आणि पाहता पाहता ती तिन्ही इंजेक्शने त्यांच्या स्वत:च्या हातून त्यांच्या रक्तात मिसळून गेली. त्यांच्या कपाळावर घामाचे लहानलहान थेंब चमकू लागले होते आणि तोंडातून 'स् स्' असा आवाज निघत होता. थोडा वेळ डोळे मिटून, मान ताठ करून अगदी शांत बसून राहिले. नंतर त्यांनी डोळे उघडले तेव्हा वेदना आणि त्रास यांचा परिणाम संपून गेलेला होता.

आपण कशाची तरी वाट पाहत आहोत असे मला एकदमच वाटून गेले... एका अशा गोष्टीची की जी होऊ नये असे आपल्याला वाटते आहे; पण तरीही तिची वाट पाहत आहोत... असदमियाँच्या पुढच्या प्रश्नाची.

''यार, कुणाकडे तीनशे बोअरची काडतुसं मिळतील का ? आबिदमियाँना हवी आहेत. 'पीस कोर' मधला कोणीतरी माणूस विकतो आहे असे कळले !'' यानंतर थोडा वेळ निस्तब्धतेत गेला. असदमियाँ आता बिछान्यावर माझ्याकडे वळून पडलेले होते. असदमियाँच्या डोक्यावर फार थोडे केस उरले आहेत हे प्रथमच मला दिसले. केसातून त्यांचा टाळू स्पष्टपणे दिसत होता. केसांचा रंग काळा नव्हता किंवा पांढराही नव्हता. अगदी राखेसारखा झालेला होता.

''आणि तुझ्या शेताची काय परिस्थिती आहे ?'' आवाजात काहीतरी लपलेलं आहे असे मला जाणवले. चेष्टा, व्यंग किंवा आणखी काही, पण काय ते मी समजू शकलो नाही.

‘‘ठीक आहे. ट्रॅक्टर चालू आहे,’’ मी उत्तर दिले.

‘‘तू आता जरा गंभीरपणे शिकावेस असा माझा सल्ला आहे. या शेताबितात काही अर्थ नाही ! आज बहीण आहे. उद्या भाचे मोठे झाले म्हणजे काय करशील ? हे काही तुला जमणारे नाही. मेव्हण्याच्या मृत्यूनंतर भाऊ, बहीण आणि भाचे यांच्यासाठी किती करतोस म्हणून आता सगळे खुश आहेत; पण नंतर हे सगळं हळूहळू बदलून जाईल. अरे हो, तू कधी एखाद्या भुताला पाहिलं आहेस का सांग ?’’

‘‘जी ?’’ मला खरेच वाटले नाही.

‘‘भूत.. म्हणजे मला भूतपिशाच्चांबद्दल म्हणायचे आहे. लोक नमाज-मंत्र वगैरे पढून त्यांना आपल्या काबूत ठेवतात. काय म्हणतात त्यांना ? समंध. समंध ज्याच्या ताब्यात असतो त्याची प्रत्येक इच्छा पूर्ण होते. तो सर्व कामं करतो. कसल्याही प्रकारची. आज एक महाशय सांगत होते की एके काळी त्यांनी भूत-समंध वगैरेंना पाहण्यासाठी आणि ताब्यात ठेवण्यासाठी खूप प्रयास केले होते म्हणे. स्मशानात जाऊन मंत्र म्हटले. ओसाड आणि निर्जन मशिदीत जाऊन बांग दिली. पण त्यांना कधीही कोण्या भुताने माणसाच्या रूपात दर्शन दिले नाही. हो, एका सापाच्या रूपात मात्र दिसले होते म्हणे ! साधारण दीड वीत लांबीचा खूप सुंदर लाल रंगाचा साप होता. आता तो भूतच आहे हे त्यांना कसे समजले हे खुदाच जाणे ! भुतांना पाहावे अशी इच्छा तुला कधी होते का ?’’

‘‘जी, नाही.’’ मला हुडहुडी भरल्यासारखे झाले होते.

‘‘कोणे एके काळी एका शहरात एक पोहोचलेली बाई होती. तिच्या काबूत एक समंध होता असे म्हणतात. तो तिच्या सर्व इच्छा पूर्ण करायचा हे सांगायला नकोच. पण बिचारी अखेर गरिबीतच मेली. का कुणास ठाऊक, कधी काबूत आली तर समजेल !’’ आणि असदमियाँ हसू लागले.

‘‘तू गावाकडे कधी परत जाणार आहेस ?’’ त्यांनी विचारले.

‘‘ईदच्या दुसऱ्या दिवशी नाहीतर पुढच्या दिवशी.’’

‘‘शेतासाठी खताची काही सोय झाली की नाही ?’’

‘‘अजून तरी नाही.’’

‘‘अरे हो, फर्टिलायझर कार्पोरेशनचे शर्माजी माझ्या ओळखीचे आहेत.’’ अचानक असदमियाँ माझ्या चेहऱ्याकडे न पाहता दुसरीकडेच कुठेतरी पाहू लागले. जणू माझ्या डोळ्याला डोळा द्यायची त्यांची इच्छा नसावी. ‘‘सहजच सांगितले मी. तुला हवं असेल तर मी खत द्यायला...’’ पण त्यांनी वाक्य पूर्ण केले नाही.

आता असदमियाँ छताकडे पाहू लागले होते. मग थंड श्वास घेत ते खूप थकलेल्या आवाजात म्हणाले— ‘‘बास, आता तू जा. मी अगदी ठीक आहे.’’ आणि त्यांचे डोळे लुकलुकू लागले.

सर्वांनी जणू काही या दुर्घटनेची तयारी ठेवलेली होती. खोलीत संपूर्ण फलक मंझिल गोळा झालेली होती.

असदमियाँच्या गळ्यातून विचित्र आवाज निघत होते आणि त्यांचे तोंड वासून उघडे पडले होते. गळ्याच्या आणि कपाळावरच्या शिरा ताणल्या गेल्यामुळे स्पष्ट दिसत होत्या आणि चेहऱ्यावर निळसर झाक येऊ लागलेली होती... बर्फात ठेवलेले मांस जसे निळसर होते, अगदी तसलाच निळसरपणा. सुहेलाभाभी त्याच फिकट गुलाबी साडीत त्यांचे डोके आपल्या मांडीवर घेऊन बसलेल्या होत्या आणि त्यांच्या चेहऱ्यावर विचित्र वैराणपणा पसरलेला होता. त्यांच्या सुंदर साडीवर असदमियाँचा मळकट चेहरा खूप आउट ऑफ प्लेस वाटत होता.

''यासीन शरीफ (मरणाऱ्याला ऐकवला जाणारा कुराणातील एक मंत्र) वाचा मियाँ !'' सैयदानी आत्या जफरमियाँना म्हणाली आणि जफरमियाँ त्वरेने धावत गेले. काही क्षणातच ते पंचसूरा (कुराणाचे पाच लघुमंत्र) घेऊन खोलीत परत आले. टोपी घातल्यामुळे त्यांच्या चेहऱ्यावर एक विचित्र प्रकारचा भोळेपणा किंवा मूर्खपणा निर्माण झाल्यासारखे वाटत होते. चष्म्याच्या आड त्यांचे डोळे बेचैन होते. असदमियाँच्या उशाशी बसून त्यांनी मंद आवाजात यासीन पढायला सुरवात केली होती... मृत्यूच्या वेदना कमी करण्यासाठी कुठून तरी कुणाच्या तरी हुंदक्यांचा आवाज येत होता. मी पाहिले, असदमियाँची आई आपलं डोकं त्यांच्या पायावर ठेवून रडत होती.

क्षणभरासाठी जणू सर्व काही थांबले होते. असदमियाँचे शरीर निश्चल झाले होते. पण सुहेलाभाभींनी किंकाळी फोडायच्या आधीच असदमियाँनी डोळे उघडले आणि अगदी निरागसपणे त्यांनी आपल्या सभोवताली जमलेल्या गर्दीकडे पाहिले.

जफरमियाँनी यासीन शरीफ पढायचे थांबवले होते. सुहेलाभाभींच्या चेहऱ्यावर उपरोधपूर्ण स्मित पूर्ववत खेळू लागले होते. एका चमच्याने असदमियाँच्या घशात त्या पाणी घालू लागल्या होत्या. मी घड्याळ पाहिले, रात्रीचे साडेबारा वाजून गेले होते.

''...काहीतरी बोल बेटा...! तब्बेत कशी आहे ? काय झाले होते ?'' असदमियाँची आई बोलत होती. ग्रामोफोनची रेकॉर्ड कमी स्पीडवर वाजावी तसा तिचा आवाज वाटत होता. डोळ्यांतून आसवे ओघळत होती. दुपट्ट्याच्या पदराने ती ते अश्रू पुसत होती. एके काळी खूप मऊ आणि नाजूक असलेले तिचे हात आता लांबूनही खरखरीत दिसताहेत हे मी पाहिले.

जफरमियाँ उभेउभे सारखे टोपीचा अँगल बदलत होते. पंचसूरा अजूनही त्यांच्या हातात होता. नंतर सुहेलाभाभींनी असदमियाँचे डोके उशीवर ठेवले. असदमियाँची नजर सगळीकडे भिरभिरत होती. सगळे काही असीम नीरवतेत बुडून गेलेले होते. फक्त असदमियाँच्या आईचे हुंदके ऐकू येत होते, हळूहळू मंद होत चाललेले.

थोड्याशा प्रयत्नानंतर असदमियाँ उशांच्या आधाराने उठून बसले. त्यांच्या चेहऱ्यावरचे स्मित प्रतिक्षणी गूढ होत चालले होते. खोलीतले कुणीही आपल्या जागेवरून हललेदेखील नाही. अचानक आपलं शरीर दुबळं असूनही खणखणीत आवाजात असदमियाँ म्हणाले— ''काही नाही. मी अगदी ठीक आहे ! घाबरू नका. काही होणार नाही... निदान रमजानच्या उद्याच्या संध्याकाळपर्यंत तरी काही होणार नाही ! विश्वास ठेवा.'' असदमियाँ कुणाला म्हणत होते ते खुदालाच ठाऊक. पण त्यांच्या त्या स्मितात हजारो हास्यं भरलेली आहेत असे मला वाटले.

नंतर हळूहळू लोक असदमियाँच्या खोलीतून जाऊ लागले. थोड्या वेळाने त्या खोलीत मी एकटाच राहिलो. सुहेलाभाभी बहुतेक आतमध्ये कपडे बदलत होत्या. आणि मुले झोपी जाण्यासाठी आडवी झालेली होती. मी मूकपणे खाली जमिनीवर अंथरलेल्या गालिच्याकडे निरखून पाहत राहिलो. त्याचे डिझाइन, त्याचा रंग याबद्दल विचार करीत राहिलो. अखेर असदमियाँना झोप लागली आणि ते घोरूही लागले.

उठताना मला वाटले की त्या रात्री असदमियाँच्या खोलीतून प्रत्येकजण उदास-निराश होऊनच परत गेला असावा.

दुसऱ्या दिवशी सायंकाळी साडेचार वाजता जफरमियाँच्या खोलीत बसून मी ईदच्या खरेदीच्या बजेटचा विचार करीत होतो. शहनाजआपा आणि जफरमियाँना शेवटच्या रोज्याच्या इफ्तारीचे निमंत्रण होते आणि तन्नू शाहिदाकडे गेलेला होता. सकाळी मी असदमियाँना पाहायला गेलो होतो. ते कुठलं तरी पुस्तक वाचताहेत हे खिडकीतून दिसल्यावर परत आलो होतो. मी लिस्ट तयार करीत होतो. एवढ्यात जमील धावतच खोलीत आला.

''तुम्हाला अब्बूनी बोलावलं आहे. त्यांना धाप लागलीय.''

''अम्मी घरी आहे ?'' मी विचारले.

''कुणीच नाहीय...!''

''तब्बेत कशी आहे त्यांची ?''

''आहे तशीच. छातीत दुखतेय. तुम्हाला लगेच बोलावलेय.'' जमील माझ्या उत्तराची वाट पाहत होता.

''तू चल, मी आलोच.'' ते कशासाठी बोलावीत आहेत ते मला ठाऊक होते. पेथिड्रिन. मी पाच रुपयांची नोट माझ्या खिशात ठेवली.

असदमियाँची अवस्था पुन्हा रात्रीसारखी झालेली होती. रंग निळा झाला होता. डोळ्यातली बुबुळे फिरली होती आणि मोठ्या कष्टाने श्वास घेत होते. अचानक का कुणास ठाऊक मला भीती वाटली. वाटले मी एखाद्या निर्जन वाटेवर एकटाच उभा आहे.

थोड्या वेळातच खोलीत माणसे गोळा होऊ लागली. मी डॉक्टरना बोलावण्याच्या विचाराने धावतच बाहेर आलो. बरेच चालल्यावर एक टॅक्सी मिळाली. डॉक्टरांना घेऊन

टॅक्सी फलक मंझिलमध्ये येईपर्यंत खूप उशीर झालेला होता.

संध्याकाळच्या लांब सावल्या जमिनीवर पसरू लागल्या होत्या. खोलीत हुंदकेच हुंदके ऐकू येत होते.

असदमियाँचे डोळे उघडे होते. विचित्रपणे कुठेतरी पाहत होते. मंद उजेडात त्या डोळ्यात जणू अजूनही राग आणि हसणे एकत्रच दिसत होते. मी त्यांच्या चेहऱ्याकडे घाबरून पाहतच राहिलो. मग पुढे जाऊन डोळे बंद केले. डॉक्टरांनी त्यांच्या शरीरावर पांढरी चादर पांघरली.

अचानक माझे विचार असदमियाँच्या मृत चेहऱ्याकडून माझ्या स्वत:कडेच वेधले गेले. दारं, भिंती सगळं काही हादरून गेल्यासारखे झाले. कुठला तरी गोळा फलक मंझिलच्या अगदी वर येऊन फुटला होता.

...दोन, तीन, चार... तोफा चालू होत्या. रोज्यांच्या इफ्तारीच्या...ईदच्या चंद्राच्या. रमजानचे दिवस आता संपले होते.

# लेखक-परिचय

**मुक्तिबोध :** कै. गजानन माधव मुक्तिबोध. जन्म 13 नोव्हेंबर 1917 श्योपूर, मध्यप्रदेश. समकालीन हिंदी साहित्यातील (विशेषत: काव्यातील) सर्वांत महत्त्वाचे आणि चर्चित कवि-समीक्षक. **प्रकाशित कृती :** *कामायनी : एक पुनर्विचार, भारत : इतिहास और संस्कृती* (जप्त झाले होते), *चाँद का मुँह टेढा है, एक साहित्यिक की डायरी, नयी कविता का आत्मसंघर्ष, काठ का सपना, सतह से उठता आदमी, विपात्र, भूरी भूरी खाक धूल, समीक्षा की समस्याएँ, आखिर रचना क्यों,* आणि *मुक्तिबोध रचनावली* (सहा खंड). कथा-कादंबरीतील वेगळ्या जाणिवेबद्दल प्रसिद्ध. कथेत नवीन मांडणी आणि रूपात्मक प्रयोगांसाठी उल्लेखनीय.

**भीष्म साहनी :** जन्म 8 ऑगस्ट 1915. झाकिर हुसेन कॉलेज, दिल्ली आणि दिल्ली विद्यापीठ येथे इंग्रजीचे प्राध्यापक. सोव्हिएट रशियात 1957-63पर्यंत अनुवादक. शिरोमणी लेखक सन्मान 1975. लोटस अवॉर्ड 1980. वीसच्या आसपास ग्रंथरचना. *झरोखे* (1967), *तमस* (1974), *भाग्यरेखा* (1953), *भटकती राख* (1965), *कथा हानूश* (1977), (नाटक : मध्यप्रदेश साहित्य परिषद पुरस्कृत), *बलराज- माय ब्रदर* (1981), (इंग्रजीत चरित्र), 25 रशियन क्लासिक्सची हिंदी भाषांतरे. अनेक रचनांची पंजाबी आणि हिंदीत भाषांतरे. 'तमस'साठी साहित्य अकादमी पारितोषिक (1975) राष्ट्रीय पुरोगामी लेखक महासंघाचे सरचिटणीस. हिंदी कथेतील पुरोगामी जाणिवेचे महत्त्वाचे लेखक.

**अमृत राय :** जन्म 15 ऑगस्ट 1921. संपादक : *हंस* (1942-52), *नई कहानियाँ* (1967-71). एकूण प्रकाशन संख्या जवळपास पस्तीस. **उल्लेखनीय रचना :** *बीज* (1953), *धुआं* (1977). **कादंबऱ्या :** *आदि विद्रोही, अग्निदीक्षा, समरगाथा.* **अनुवाद :** *सरगम* (1977). **कथा :** *आनन्दम्.* **ललित निबंध :** *प्रेमचंद : कलम का सिपाही* (चरित्र), शिक्षण मंत्रालय भारत सरकारचे उत्कृष्ट अनुवाद पारितोषिक 1958, सोव्हिएट लँड नेहरू अवॉर्ड (1958), नेहरू फेलोशिप (1977-79); साहित्य अकादमी पारितोषिक (1963), साहित्याचे अनेक भारतीय आणि परदेशी भाषांत अनुवाद. हिंदी कथेतील पुरोगामी जाणिवेचे आणि वास्तववादी विचारांचे महत्त्वाचे कथाकार.

**हरिशंकर परसाई :** जन्म 22 ऑगस्ट 1924. जमानी, होशंगाबाद, मध्यप्रदेश. 1957पर्यंत अध्यापन. नंतर स्वतंत्र लेखन. 1956मधे *'वसुधा'* या साहित्यिक नियतकालिकाचे प्रकाशन, संपादन. **प्रकाशित ग्रंथ :** *हंसते हैं, रोते हैं, भूत के पांव पीछे, तबकी बात और थी, जैसे उनके दिन फिरे, सदाचार का तावीज, पगडाण्डियों का जमाना, रानी नागफनी की कहानी, वैष्णव की फिसलन, शिकायत मुझे भी है, अपनी अपनी बीमारी, ठिठुरता हुआ गणतंत्र, निठल्ले की डायरी, बोलती रेखाएँ, एक लडकी पाँच दिवाने, तिरछी रेखाएँ, और अन्तमे, तट की खोज, माटी कहे कुम्हार से, पाखण्ड का अध्यात्म, सुनो भाई साधो, विकलांग श्रद्धा का दौर,* आणि *परसाई रचनावाली* (सहा खंड). जबलपूर विद्यापीठाची सन्माननीय डी.लिट. 1982मध्ये साहित्य अकादमीचे पारितोषिक. मध्यप्रदेश सरकारचा 'शिखर सन्मान' 1983. बहुतेक सर्व भारतीय भाषांत अनुवाद. मल्याळममध्ये चार पुस्तकांचा अनुवाद. हिंदीत व्यंग साहित्याला सन्मानाचे आणि रचनाशीलतेचे स्थान मिळवून देणारे एकमेव कथाकार. मध्यप्रदेश पुरोगामी लेखक संघाचे अध्यक्ष. विश्वशांती सम्मेलनात भारतीय प्रतिनिधी मंडळाचे सभासद म्हणून रशियाचा प्रवास.

**धर्मवीर भारती :** जन्म 25 डिसेंबर 1926. प्रयागमधल्या अतरसुइया मोहल्ल्यात. 1960 पर्यंत प्रयाग विद्यापीठाच्या हिंदी विभागात अध्यापन. *'अभ्युदय'*, *'संगम'*, *'निकष'*, आणि *'आलोचना'* यांचे संपादन. बराच काळ *'धर्मयुग'*चे संपादन. इंग्लंड, जर्मनी, इंडोनेशिया, थायलंड, बांगला देश येथे प्रवास. 1972मध्ये पद्मश्री. **प्रकाशन : कथा संग्रह :** *मुर्दों का गांव, चांद और टूटे हुए लोग, बंद गली का आखिरी मकान.* **कविता :** *ठंडा लोहा, अंधा युग, सात गीत वर्ष, कनुप्रिया.* **कादंबऱ्या :** *गुनाहों का देवता, सूरज का सातवा घोडा.* **निबंध :** *ठेलेपर हिमालय, कहनी-अनकहनी, पश्यंती.* **समीक्षा :** *प्रगतिवाद एक समीक्षा, मानवमूल्य और साहित्य.* **एकांकिका :** *नदी प्यासी थी.* **संशोधन :** *सिद्ध साहित्य.* **अनुवाद :** *ऑस्कर वाइल्ड की कहानियाँ, देशांतर.* **रिपोर्टिंग :** *युद्ध यात्रा.* हिंदी कथेत नव्या प्रयोगांसाठी प्रसिद्ध.

**कृष्ण बलदेव वैद :** जन्म 27 ऑगस्ट 1927. **प्रकाशन-कादंबऱ्या :** *उसका बचपन* (1957), *विमल उर्फ जाएं तो जाएं कहां* (1974), *नसरीन* (1975), *दूसरा न कोई* (1976), *दर्द ला दवा* (1980), *गुजरा हुआ जमाना* (1981). **कथासंग्रह :** *बीच का दरवाजा* (1962), *मेरा दुश्मन* (1966), *दूसरे किनारे से* (1970), *लापता* (1970), *उसके बयान* (1974), *मेरी प्रिय कहानियां* (1978), *वह और मैं* (1980). **अनुवाद :** *गोडो के इंतजार में (सॅम्युएल बेकेट)* (1970), *आखिरी खेल* (1991), इंग्रजीत - *डेज ऑफ लाँगिंग* (निर्मल वर्मा) (1972), *बिटर स्वीट डिझायर* (श्रीकांत वर्मा) (1975), **समीक्षा : (इंग्रजीत)** *टेकनिक इन दि टेल्स ऑफ हेन्री जेम्स.* **इंग्रजीत प्रकाशने -** *स्टेप्स*

*इन डार्कनेस* (1962), *बिमल ईज बोग*-दोन खंड (1972), *सायलेन्स अँड अदर स्टोरीज* (1972). अनेक वर्षे अमेरिकेत इंग्रजीचे व्हिजिटिंग प्रोफेसर. हिंदी कथेत नव-प्रयोगांबद्दल चर्चित व उल्लेखनीय.

**रामकुमार :** जन्म ऑक्टोबर 1924, सिमला. दिल्ली विद्यापीठातून अर्थशास्त्रात एम.ए. शारदा उकील स्कूल ऑफ आर्टस् दिल्ली येथे कलाशिक्षण. पॅरिसमध्ये आंद्रेल्होत व फरनांदलेजमध्ये कलाशिक्षण. सिमला, दिल्ली, पॅरिस, मुंबई, प्राग, कोलंबो, वॉर्सा, क्राकोव्ह, कलकत्ता इ. ठिकाणी चित्रप्रदर्शने. लंडन, न्यूयॉर्क, व्हेनिस, टोकियो येथे समूह प्रदर्शनात सम्मिलित. आंतरराष्ट्रीय ख्यातीचे चित्रकार. प्रख्यात हिंदी कथाकार. **प्रकाशने - कथासंग्रह :** *हुस्नाबीबी-एक चेहरा, समुद्र, झींगुरों के स्वर, मेरी प्रिय कहानियाँ.* **कादंबऱ्या :** *घर बने, घर टूटे, देर सबेर.* **प्रवासवर्णन** : युरोप के स्केच. **कला** : ललित कला अकादमीत अनेक मोनोग्राफ्स. 1976मध्ये *'मेरी प्रिय कहानियाँ '*ला उत्तर प्रदेशचे प्रेमचंद पारितोषिक. 1972मध्ये पद्मश्री. सहज प्रयोगशीलतेसाठी प्रसिद्ध.

**महीपसिंह :** जन्म 15 ऑगस्ट 1930. एम्.ए.,पीएच्.डी.; खालसा कॉलेज, दिल्ली विद्यापीठात ज्येष्ठ प्राध्यापक. **प्रकाशन - कथासंग्रह :** *सहा आणि एक.* **कादंबरी :** *यह भी नहीं.* याशिवाय समीक्षेची संपादित व भाषांतरित अशी विसाहून अधिक पुस्तके प्रकाशित. जपान येथील कान्साई विद्यापीठात 1974-75पर्यंत व्हिजिटिंग प्रोफेसर, कॅनडा, अमेरिका आणि इंग्लंडचा वाङ्मयीन प्रवास 1982. बँकॉक, सिंगापूरचा प्रवास 1983. गेली अठरा वर्षे साहित्यिक नियतकालिक *'संचेतना'*चे संपादन. *'नयी कहानी '* चळवळीनंतर *'अकहानी '* आणि *'सचेतन कहानी '* या चळवळीतील सक्रिय नाव.

**शानी :** पूर्ण नाव गुलशेरखान शानी. जन्म 16 मे 1933. **प्रकाशन : कादंबऱ्या :** *कालाजल, सांप और सीढी, फूल तोडना मना है, एक लडकी की डायरी, पत्थरों में बंद आवाज, कस्तूरी, नदी और सीपियाँ.* **कथासंग्रह :** *बबूल की छाँव, डाली नहीं फूलती, छोटे घेरे का विद्रोह, एक से मकानों का नगर, युद्ध, मेरी प्रिय कहानियाँ, संपूर्ण कहानियाँ* (एकत्र दोन भाग) **आठवणी** : *शालवनोंका द्वीप.* **निबंध** : *एक शहर में सपने बिकते है.* **संपादन :** *पोट्टे काट की श्रेष्ठ कहानियाँ.* साहित्य अकादमीचे त्रैमासिक 'समकालीन भारतीय साहित्य', मध्यप्रदेश साहित्य परिषदेचे चिटणीस, *'साक्षात्कार'* मासिकाचे संस्थापक संपादक. अनेक भारतीय भाषांत व झेक, रशियन, इंग्रजी आणि लिथुनियन भाषेत अनुवाद. उत्तर प्रदेश सरकारद्वारा पुरस्कृत. मध्यप्रदेश शासनाचा 'शिखर सम्मान' पुरस्कार. मध्यमवर्गीय मुस्लिम कुटुंबाचे वास्तववादी चित्रकार. बस्तरमधील आदिवासी जनजीवनाचे सच्चे कथाकार.

**कामतानाथ :** पूर्ण नाव कामतानाथ श्रीवास्तव. जन्म 22 सप्टेंबर 1935. **प्रकाशन-कथासंग्रह :** *छुट्टियाँ, तीसरी साँस, सब ठीक हो जाएगा.* **कादंबऱ्या :** *समुद्रतटपर खुलनेवाली खिडकी, सुबह होने तक, एक और हिन्दुस्थान, तुम्हारे नाम.* **नाटक :** *दिशाहीन.* **संपादन :** *कथांतर* (संकलन) आणि '*समांतर*' - साहित्यिक मासिक. '*समांतर*' कथा चळवळीचे मुख्य प्रवक्ता-कथाकार.

**राजी सेठ :** जन्म 4 ऑक्टोबर 1935. एम्.ए.(इंग्रजी, भारतीय तत्त्वज्ञान आणि तुलनात्मक धर्म.) **प्रकाशन - कथासंग्रह :** *अंधे मोड से आगे* 1979, *तीसरी हथेली* - 1981. **कादंबरी :** *ततसम* 1983. 'तीसरी हथेली'चा पंजाबीत अनुवाद. 1974 पासून लेखनकार्य. हिंदी कथा-कादंबऱ्यांत सूक्ष्म मानसशास्त्रीय तपशील भरणाऱ्या म्हणून उल्लेखनीय.

**कै. रमेश बक्षी :** जन्म 15 ऑगस्ट 1936. माळवा, मध्यप्रदेश. 1964पर्यंत म. प्र. सरकारी महाविद्यालयातून अध्यापन, '*ज्ञानोदय*'चे संपादन. '*शंकर्स वीकली*' (हिंदी चे संपादन. **प्रकाशन : कथासंग्रह :** *मेजपर टिकी कुहनियाँ, दुहरी जिंदगी, कटती हुई जमीन, एक अमूर्त तकलीफ, मेरी प्रिय कहानियाँ, पिता-दर-पिता, शवासन.* **कादंबऱ्या :** *हम तिनके, घिसा हुआ चेहरा, किस्से ऊपर किस्सा, अठारह सूरज के पौधे, बैसाखियों वाली इमारत.* **व्यंगरचना :** *गुस्ताखी मुआफ, लतीफे अपने अपने, ललित क्रोध, एक और पंचतंत्र.* **नाटक :** *देवयानी का कहना है.* **फिल्म :** *27 डाउन.* साहित्यिक मासिक '*आवेश*'चे संपादन. हिंदी कथेत नव्या प्रयोगांमुळे चर्चेत आणि उल्लेखनीय.

**गिरिराज किशोर :** जन्म 8 जुलै 1937. **प्रकाशन : कथासंग्रह :** *नीम के फूल* (1964), *चार मोती बेआब* (1964), *पेपरवेट* (1967), रिश्ता (1969), *शहर-दर-शहर* (1976), *हम प्यार कर लें* (1960), *जगतारिणी* (1980). *लहू पुकारेगा* (संपादन 1981). **कादंबऱ्या :** *लोग* (1966), *चिडियाघर* (1968), *यात्रायें* - (1971), *जुगलबंदी* (1973), *दो* (1974), *इन्द्र सुने* (1978), *दावेदार* (1978), *तीसरी सत्ता* (1982), *यथा प्रस्तावित* (1982), *परिशिष्ट* (1984). **नाटक :** *प्रजाही रहने दो* (1977), *घास और घोडा* (1980), *चेहरे चेहरे किसके चेहरे* (1983), *केवल मेरा नाम लो* (1984). **एकांकिका :** *बादशाह, गुलाम, बेगम* (1979). **समीक्षा :** *संवाद सेतू* (1983). **मुलांसाठी लेखन :** *बच्चों के निराला, सोने की गुडिया, पके सोने के पेड.* इंग्रजी, जर्मन आणि अनेक भारतीय भाषांत अनुवाद. साहित्यिक नियतकालिक '*निरंतर*'चे संपादन. हिंदी कथेत वास्तववादी जाणिवेसाठी उल्लेखनीय.

**कै. रामनारायण शुक्ल :** जन्म 27 ऑक्टोबर 1937. हुसेनगंज, फत्तेहपूर, उत्तर प्रदेश. शिक्षण कलकत्ता विद्यापीठात 1962मध्ये '*कहानी*' मासिकाचे सहाय्यक संपादक. 1966मधे सोव्हिएट माहिती केंद्राच्या '*युवक दर्पण*' मासिकात. 1968मध्ये दिल्लीत आकस्मिक मृत्यू. 1971मध्ये सरस्वती प्रेस, अलाहाबादतर्फे '*सहारा*' कथासंग्रह प्रकाशित. **तीन कथासंग्रह** : *किसी शनिवार को, महेंद्र का भाई* आणि *डाब.* बंगालीतून अनेक अनुवाद प्रकाशित. हिंदी कथेतील मध्यमवर्गीय आणि कनिष्ठ मध्यमवर्गीय कुटुंबाच्या संघर्षपूर्ण जीवनाचे सच्चे कथाकार.

**ओमप्रकाश मेहरा :** जन्म 16 डिसेंबर 1937. जबलपूर आणि बर्मिंगहॅम विद्यापीठात शिक्षण. भारतीय प्रशासन सेवेत सचिव. **प्रकाशन - कथासंग्रह :** *फिर एक बार, अलाव, सीढियों के बीच एक सच, पालवाली नाव, जिंदगी एक मोडपर.* '*पालवाली नाव*'ला म.प्र. साहित्य परिषदेकडून पारितोषिक. नवकथेच्या आरंभापासून लेखन. आपली मुळे आणि परिसर यांचे वास्तववादी चित्रण करणारे कथाकार म्हणून उल्लेखनीय.

**गोविंद मिश्र :** जन्म 8 ऑगस्ट 1939. **प्रकाशन : कादंबऱ्या** : *वह अपना चेहरा, उतरती हुई धूप, लाल पिली जमीन, हुजूर दरबार.* **कथासंग्रह :** *नये पुराने माँबाप, रगडखाती आत्महत्याएँ, अन्त:पुर, घांसू, खुदके खिलाफ, अपाहिज, मेरी प्रिय कहानियाँ.* **प्रवासवर्णन इ.** : *धुंधभरी सुर्खी, दरख्तों के पार शाम.* **संपादन** : *स्थितियाँ.* **रेखांकित कथासंग्रह** : *खाक इतिहास. अंत:पुर, घांसू* आणि *धुंधभरी सुर्खी* यांना उत्तर प्रदेश सरकारची पारितोषिके. '*लाल पीली जमीन*'ला ऑथर्स गिल्ड ऑफ इंडियाचा सन्मान. स्थानिक परिसरातील संघर्षाचे वास्तव जाणिवेचे कथाकार.

**रमाकांत श्रीवास्तव :** जन्म 1942. एम्.ए.,पीएच्.डी. इंदिरा कला संगीत विद्यापीठ, खैरागढ येथे हिंदी विभाग प्रमुख. **प्रकाशन : कथासंग्रह :** *मध्यान्तर, स्याही सोख्ते, खानदान में पहली बार.* **कादंबरी :** *टूटे पुल, बेटे को क्या बतलायेंगे.* **कथासंग्रह :** '*स्याही सोख्ते*'ला म.प्र. साहित्य परिषदेचे पारितोषिक. वास्तववादी आणि पुरोगामी जाणिवेचे उल्लेखनीय कथाकार.

**सत्येनकुमार :** जन्म 20 एप्रिल 1944. सागर विद्यापीठातून फार्मसीचे अध्ययन. अनेक वर्षे गांधी मेडिकल कॉलेज, भोपाळ येथे अध्यापन. सध्या स्वतंत्र लेखन. **प्रकाशन- कथासंग्रह :** *जहाज तथा अन्य कहानियाँ, बर्फ तथा अन्य कहानियाँ, एक नाम और तथा अन्य कहानियाँ.* **नाटक :** *एक था बादशाह* (मंजूर एहतेशाम सह) 1973. जहाज कथेला 'कहानी' मासिकाचे पारितोषिक. सूक्ष्म तपशील आणि सखोल निरीक्षण यासाठी उल्लेखनीय कथाकार.

**स्वयंप्रकाश :** पूर्ण नाव स्वयंप्रकाश भटनागर. जन्म 20 जानेवारी 1947. राजभाषा अधिकारी. **प्रकाशन : कथासंग्रह :** *मात्रा और भार, सूरज कब निकलेगा, आसमाँ कैसे कैसे.* **कादंबऱ्या :** *ज्योतिरथ के सारथी, जलते जहाजपर.* **नाटक :** *फीनिक्स.* **निबंधसंग्रह :** *स्वान्तःसुखाय, परमाणुभाई की दुनिया में* (वैज्ञानिक बाल कादंबरी). **अनुवाद :** अनेक भारतीय भाषात. **संपादन :** जनवादी मासिक '*क्यों*'. '*सूरज कब निकलेगा*' ला राजस्थान साहित्य अकादमीचे पारितोषिक. हिंदी कथेतील पुरोगामी आणि वास्तववादी प्रवाहातले उल्लेखनीय कथाकार.

**मंजूर एहतेशाम :** जन्म 3 एप्रिल 1948. स्वतंत्र लेखन. इंजिनियरिंगचे शिक्षण. **प्रकाशन :** *रमजान में मौत तथा अन्य कहानियाँ.* **कादंबरी :** *कुछ दिन और.* **नाटक :** *एक था बादशाह.* सत्येनकुमारसह वास्तववादी जाणिवा आणि सखोल सूक्ष्म निरीक्षण यासाठी उल्लेखनीय कथाकार.

**धनंजय वर्मा :** 'समकालीन हिंदी कथा' या संग्रहाचे संपादक. जन्म 14 जुलै 1935. एम्.ए.,पीएच.डी., मध्यप्रदेश सरकारी महाविद्यालयात अध्यापन. **प्रकाशन :** *निराला काव्य और व्यक्तित्व, आस्वाद के धरातल, अंधेरा नगर, हस्तक्षेप. निराला.* काव्य : *पुनर्मूल्यांकन. आलोचना की रचना यात्रा, आधुनिकता के बारे में तीन अध्याय. अंधेरे के वर्तुल.* **संपादन :** *प्रासंगिक कहानियाँ. आसपास की दुनिया.* 1960 पासून सतत कथा-समीक्षेच्या क्षेत्रात क्रियाशील. नवकथेच्या आरंभापासून कथा-समीक्षेला एक नवी रचनात्मक दिशा. '*अंधेरा नगर*' आणि '*अंधेरे के वर्तुल*' रमणीय रचना. '*आस्वाद के धरातल*' समीक्षेला म.प्र.साहित्य परिषदेद्वारा आणि '*हस्तक्षेप*' हे समीक्षालेखन उत्तर प्रदेश सरकारद्वारा पारितोषिक प्राप्त.

Lasertypeset at Bhandari Mudranalaya, Pune-411051
and printed at Shivam Offset Press, New Delhi-110028